


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'तपशील' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (द्वैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे प्रकाशक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादकमंडळातील सदस्य ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादक-मंडळ ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या (द्वैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि तपशील संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका




# तपशील

अंक पहिला, वर्ष पहिले १९९५

**संपादक :**

डॉ. मीना वैशंपायन
डॉ. मंगला सरदेशपांडे
डॉ. आनंद जोशी
श्री. नाना जोशी

**रचना :**

हेमचंद्र कराडकर

**मुद्रण व्यवस्था :**

पुष्पम प्रिंटर्स
भायखळा, मुंबई – २७.
☎ ३७२७३००

**मालक, मुद्रक, प्रकाशक आणि पत्रव्यवहार**

श्री. नाना जोशी
४-अ, सोमणनगर,
क्रांतिवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई ४०० ०१२

## अनुक्रमणिका





अनुक्रमणिका



## संपादकीय

रसिक वाचकहो,

'तपशील' या द्वैमासिकाचा हा पहिला अंक आपल्या हाती ठेवताना आम्हा सर्वांना फार आनंद हेत आहे.

'तपशील' मध्ये साहित्यविषयक लेख देण्याची आमची योजना आहे. भारताबाहेर प्रसिद्ध होणाऱ्या साहित्याची, तेथील साहित्यजगतातील घडामोडींची मराठी वाचकाला फारशी ओळख नसते ही वस्तुस्थिती आहे. अनेकदा मराठी साहित्यविश्वाशी समांतर किंवा पूर्णपणे विरोधी अशा घटना बाहेरच्या साहित्यविश्वात घडतात असे लक्षात येते. त्यांची दखल घ्यावी आणि आपले आकलनक्षेत्र विस्तृत करावे, आपल्या आनंदात आपणासारख्या रसिकांनाही सहभागी करून घ्यावे अशा हेतूने हे द्वैमासिक आम्ही सुरू करीत आहोत. अशा प्रकारच्या, विशिष्ट हेतुप्रधान नियतकालिकांची आजची स्थिती पाहता असे एखादे द्वैमासिक सुरू करणे व्यावहारिकदृष्ट्या शहाणपणाचे ठरणारे नाही याची जाणीव आम्हास आहे. शिवाय हे द्वैमासिक सुरू करून आम्ही काही मोठे सामाजिक कार्य करतो आहोत असाही आमचा दावा नाही. संपादक आणि या द्वैमासिकाला अर्थसाहाय्य करणारे मित्र यांची हौस व साहित्यप्रेम हीच या द्वैमासिकामागची प्रेरणा आहे.

या द्वैमासिकाला नाव सुचवले ते प्रख्यात नाटककार महेश एलकुंचवार यांनी. या 'तपशील' चे आणखी एक स्नेही श्री. निशिकांत पिपळापुरे यांनी प्रा. एलकुंचवार यांच्याशी चर्चा करून हे नाव ठरविले. आम्ही या दोघांचेही आभारी आहोत.

आपण या द्वैमासिकाबद्दलच्या आपल्या सूचना व अभिप्राय जरूर पाठवावेत. त्यांचे स्वागत होईल.

लोभ असावा ही विनंती.

– संपादक

**'तपशील'चा तपशील :**

★ सुट्या अंकाची किंमत रुपये १००/-

★ (६ अंकाची) वार्षिक वर्गणी रु. २०१/-

★ प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५.

★ वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात दुसऱ्या अंकाला वर्गणी पाठवली तरी पहिल्या अंकापासूनच अंक देण्यात येतील.

अनुक्रमणिका



# लेखमाला

## असा हा वाचनछंद

डॉ. मीना वैशंपायन

अब्राहम लिंकन अमेरिकेसारख्या मोठ्या राष्ट्राचे अध्यक्ष झाले. त्यांच्यासारख्या अप्रसिद्ध माणसाला हे राष्ट्राध्यक्षपद मिळाल्यावर या राजकीय मोठेपणामागचे रहस्य जाणण्याचा प्रयत्न अनेक अभ्यासकांनी केला, पण त्यांच्या मानसिक घडणीतील एका महत्त्वाच्या भागाकडे अभ्यासकांचे फारसे लक्ष गेलेले दिसत नाही. १८४० मध्ये लिंकन वॉशिंग्टन (अमेरिकेची राजधानी) येथे राहात असत. त्यावेळी ते अमेरिकन काँग्रेसचे (अमेरिकन लोकसभा) सभासद होते. या काळात त्यांचा दिनक्रम कसा होता आणि अमेरिकेचे माजी राष्ट्राध्यक्ष थॉमस जेफरसन यांचा त्यांच्यावर कसा प्रभाव पडला याकडे कोणी विशेष लक्ष दिलेले दिसत नाही. म्हणूनच त्यांच्या जीवनातील तो कालखंड तसा अज्ञातच आहे.

१९०९ साली लिंकन यांची जन्मशताब्दी होती. त्याप्रसंगी व्याख्यान देताना ह्यूबर्ट स्कीनर यांनी असे सुचविले की, 'राजकीय क्षेत्रातील आपल्या मोठेपणाचा पाया लिंकननी या वॉशिंग्टन वास्तव्यात घातला. याच काळात त्यांनी 'लायब्ररी ऑफ काँग्रेस' या वाचनालयाचा भरपूर फायदा घेतला. त्या ग्रंथालयात जाऊन, अमेरिकन इतिहासातील महत्त्वाच्या कागदपत्रांचा ते अभ्यास करीत असत. वॉशिंग्टनमधील लोकांना ते एकांडे वाटत. त्यांच्या सहकाऱ्यांना ते करमणुकीचा विषय होते, कारण लिंकन दारू पीत नसत, सिगारेट-चिरूट ओढीत नसत, जुगार खेळत नसत. फार काय कोणालाही शिव्या देत नसत. बरं, याउलट ते अत्यंत कर्मठ आणि पारंपरिक विचारांचे, चर्चमध्ये नियमित जाणारे गृहस्थ होते का? तर तसेही नव्हते. ते ख्रिश्चन धर्मातील कोणत्याही एका पंथात नव्हते, वॉशिंग्टनमध्येही थोड्याच दिवसात त्यांची गणना 'पाखंडी' लोकांमध्ये होऊ लागली होती. मग प्रश्न असा होता की, हा माणूस आपला मोकळा वेळ कसा घालवतो? तर 'लायब्ररी ऑफ काँग्रेस' या जुन्या वाचनालयात जाऊन ते संशोधन व अभ्यास करीत. त्यांचे काँग्रेसमधील सहकारी तुच्छतेने म्हणत, "ह्यँ, तो तर पुस्तकातला किडा आहे."

स्कीनर यांनी आपल्या या विधानांच्या समर्थनार्थ कोणताही लेखी पुरावा दिलेला नाही. डिसेंबर १८४७ ते मार्च १८४९ या दरम्यान लिंकन वॉशिंग्टन येथे नेमके काय करीत, आपला वेळ कसा घालवीत याबद्दल थोडीच माहिती उपलब्ध आहे. परंतु ते या वाचनालयात वारंवार जात हे मात्र निश्चित! लिंकन ज्या रस्त्यावर राहात होते, त्याच रस्त्यावर ते वाचनालय होते. आपल्या वसतिगृहासमोरच



अनुक्रमणिका

असणाऱ्या या वाचनालयाचे त्यांना प्रचंड आकर्षण होते. तेथे ते वारंवार जात असत, असे दाखवणारा पुरावा उपलब्ध आहे. त्या काळी हे वाचनालय अमेरिकन कॉंग्रेसच्या आवारात एका अत्यंत देखण्या इमारतीत होते. (सध्या लायब्ररी ऑफ कॉंग्रेस वेगळ्याच आणि एका प्रचंड व देखण्या वास्तूत आहे.) सर्वच कॉंग्रेस सभासदांना एकमेकांच्या भेटीगाठीसाठी ही जागा एकदम पसंत होती. लिंकन त्यावेळी एकटेच राहात आणि लोकांना भेटण्याची त्यांना आवड होती. त्यामुळे हे ठिकाण त्यांना फार आवडत असे. त्यांनी कॉंग्रेसमध्ये अनेक भाषणे केली. ही भाषणे तयार करताना लागणारे संदर्भ शोधणे, आवश्यक ते संशोधन करणे यासाठी त्यांनी या वाचनाल्यातील अमोल अशा साहित्याचा उपयोग केला. लिंकनना या वाचनाल्याचे आकर्षण असण्याचे आणखी एक कारण होते. या वाचनालयातील अनेक ग्रंथ एकेकाळी थॉमस जेफरसन यांच्या मालकीचे होते. लिंकन यांच्या अगदी आरंभीच्या काळातील 'हिरो' म्हणजे थॉमस जेफरसन! त्यामुळे आपल्या 'हिरो'ने या वाचनाल्याला दिलेल्या ग्रंथांचे वाचन करण्याची ओढ लिंकनना वाटावी हे साहजिकच होते. १८१४ साली ब्रिटिश फौजांनी 'कॅपिटॉल' या वॉशिंग्टनमधील भागाला (येथेच अमेरिकन सरकारच्या सर्व मध्यवर्ती कचेऱ्या आहेत) आग लावून दिली आणि तत्कालीन कॉंग्रेसचे वाचनालय त्यात भस्मसात झाले. या आगीत नष्ट झालेल्या पुस्तकांची जागा भरून काढण्यासाठी जेफरसन यांनी आपली पुस्तके देऊ केली. वस्तुतः जेफरसन यांनी हा संग्रह परिश्रमपूर्वक तयार केला होता. पण आपली ही किंमती, चांगली, दुर्मिळ पुस्तके कॉंग्रेसच्या वाचनालयाला देताना त्यांनी खरोखरी क्षणाचाही विचार केला नाही. या पुस्तकांची संख्या ६७०० होती. त्या वाचनाल्यात असणाऱ्या पुस्तकांच्या संख्येच्या दुप्पटीहून जास्त अशी ही संख्या होती. जेफरसन यांच्या या देणगीने आणखी एक फायदा झाला. हे वाचनालय फक्त अमेरिकन कॉंग्रेसच्या सभासदांकरिताच उपलब्ध न ठेवता इतरांनाही त्याचा लाभ घेता यावा असा विचार मांडण्यात येऊ लागला. या विचारातून ते वाचनालय सर्व राष्ट्रासाठी व सर्वांसाठीसुद्धा खुले असावे अशी मागणी होऊ लागली. आज वॉशिंग्टनमध्ये 'लायब्ररी ऑफ कॉंग्रेस' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या वाचनालयाचे मूळ, जेफरसन यांच्या त्या देणगीत आहे.

जेफरसन यांनी आपल्या या संग्रहाची वर्गवारी चातुर्याने आणि एका विशिष्ट पद्धतीने केलेली होती. ही वर्गवारी कॉंग्रेसच्या वाचनाल्यातही तशीच ठेवण्यात आली होती. या वाचनालयातील ग्रंथांची सूची प्रसिद्ध करतेवेळी, त्या सूचीच्या पहिल्या पानावरच, ग्रंथांच्या वर्गवारीची पद्धत कोणती हे ठळकपणे व जेफरसनीय रचनेत छापले जाई. ही सूची चाळताना लिंकनना या साऱ्या गोष्टी त्यामुळे सहजच समजत असत. शिवाय जी पुस्तके पूर्वी जेफरसन यांच्या संग्रहात होती, त्यापुढे 'जे' असे इंग्रजी अक्षर असे. सूचीच्या पहिल्या पानावर तत्संबंधी खुलासाही असे. जेफरसन यांचे कागदपत्र खरेदी करण्याबद्दल अमेरिकन कॉंग्रेसमध्ये ठराव झाला. आपल्या कॉंग्रेस सदस्यत्वाच्या पहिल्या वर्षातच, या ठरावाच्या बाजूने मत देण्याची

संधी लिंकनना मिळाली.

लिंकन आपल्या अभ्यासासाठी या वाचनालयातून पुस्तके घेऊन जात, तशीच अमेरिकन सुप्रीम कोर्टाच्या वाचनालयातूनही नेत असत. ही सारी पुस्तके घरी नेण्याची लिंकनची स्वतःची खास पद्धत होती. ठिपक्या ठिपक्यांच्या कापडाचा एक भला मोठा रुमाल ते घेत. त्यात ही पुस्तके बांधून त्याचे गाठोडे तयार करीत. ते गाठोडे एका काठीच्या टोकाला टांगून, ती काठी खांद्यावर बंदुकीसारखी ते धरत व पुस्तके घेऊन जात. त्या रुमालातील अनेक पुस्तके जेफरसन यांच्या संग्रहातीलच होती. कारण लिंकनच्या काळात तरी त्या वाचनालयातील बहुतेक ग्रंथ जेफरसन यांच्या संग्रहातून आलेले होते.

जेफरसन आणि लिंकन अतिशय भिन्न कालखंडात व भिन्न परिस्थितीत लहानाचे मोठे झाल्याने, त्यांच्या व्यक्तिमत्वांची घडणही भिन्न प्रकारेच झाली. या दोघांबद्दल अनेक दंतकथा व आख्यायिका प्रसिद्ध आहेत. जेफरसन यांच्याविषयीच्या 'कथां' च्या मानाने लिंकन यांच्याविषयीच्या कथा अधिक रंगतदार व संख्येनेही अधिक! पण अजूनही दोघांबाबत अशा 'कथा' तयार होतच असतात. त्यापैकी एक अशी – एकदा नोबेल पारितोषिक मिळालेल्या विद्वानांची एक सभा अमेरिकन अध्यक्षांच्या घरात झाली. त्या सभेत बोलताना अध्यक्ष जॉन केनेडी म्हणाले, "आज या व्हाइट हाऊसमध्ये विविध ज्ञानशाखांतील ज्ञान प्रथमच एवढ्या प्रचंड प्रमाणात एकाचवेळी एकत्र येत आहे. मात्र याला अपवाद एकच असावा – तो म्हणजे जेव्हा जेफरसन यांनी व्हाईट हाऊसमध्ये अगदी एकट्याने जेवण घेतले असेल तेव्हाचा!"

आरंभी जेफरसन आणि लिंकन यांची आर्थिक व सामाजिक परिस्थिती दोन टोकाची असल्याने, त्यांची जडणघडणही भिन्न प्रकारे झाली असणार हे तर उघडच आहे. लिंकन अगदी गरिबीत जन्माला आले, तर जेफरसन यांचा जन्म एका सधन कुटुंबात झाला. असे असले तरी, या दोघांच्या जीवनात काही बाबतीत आश्चर्य वाटावे असे साम्य होते. या दोघांनाही माता आणि पिता यापैकी एकाचा कायमचा वियोग फारच लहानपणापासून सहन करावा लागला होता. जेफरसन यांचे वडील फार कर्तबगार आणि सामाजिक चळवळीत सक्रिय भाग घेणारे गृहस्थ होते. जेफरसनची त्यांच्यावर भक्ती होती. जेफरसन चौदा वर्षांचे असताना, त्यांचे वडील मृत्यू पावले आणि थॉमसचे संगोपन त्याच्या आईने केले. वयात येणारी मुले सामान्यतः 'स्त्री' द्वेष्टी असतात. तसेच थॉमसचेही होते. पुढे सुद्धा जेफरसननी आपल्या आईबद्दल एक शब्दही उच्चारला नाही किंवा तिचा प्रेमाने कधी उल्लेखही केला नाही. यावरून सूचित होते की, त्यांचे आपल्या आईबरोबर तितकेसे पटत नसावे. लिंकन यांच्या बाबतीतही साधारण असाच प्रकार होता. लिंकनची आई ते नऊ वर्षांचे असतानाच वारली. आपल्या वडिलांच्या द्वितीय पत्नीबद्दल त्यांना आदर व प्रेम वाटत असले तरी, त्यांचे आपल्या वडिलांबद्दल प्रेम दिवसेंदिवस कमी

कमी होत गेले व सरतेशेवटी ते आपल्या वडिलांना मानही देत नाहीसे झाले. जेफरसन आणि लिंकन या दोघांना बहीण होती. पण आपल्या लाडक्या बहिणीचा मृत्यू पाहाण्याचा दु:खद आणि दुर्दैवी अनुभव त्या दोघांनाही आपल्या तारुण्यातच घ्यावा लागला. दोघेही आपल्या राज्याच्या स्थानिक विधिमंडळात वयाच्या पंचविसाव्या वर्षी निवडून गेले. इतक्या तरुण वयात या दोघांनाही तो मान मिळाला होता.

परंतु त्या दोघांमधील साम्य इथेच संपते. त्यांच्यातील फरक प्रचंड होता. जेफरसन हे व्हर्जिनिया राज्यातील एका धनवान, प्रतिष्ठित कुटुंबातील सुपुत्र. जमीनजुमला, गुलाम आणि संपत्ती त्यांच्याकडे वारसाहक्कानेच आलेली! याउलट लिंकन यांचे वडील छोटे जमीनदार असले तरी अगदी नगण्य. शिवाय ही थोडीशी जमीनही स्वत:च्या ताब्यात राखून ठेवण्यासाठी त्यांना फार कष्ट होत असत. अखेरीस त्यांनी इंडियाना राज्याच्या ईशान्येला सहकुटुंब प्रयाण केले. १८१६ साली हा भाग म्हणजे जंगलच होते. या ठिकाणी या कुटुंबाला अपार दारिद्र्य सोसावे लागले. लिंकन त्यावेळी घरीच तयार केलेल्या कापडाचे कपडे वापरीतच मोठे झाले.

दोघांच्या शिक्षणातही असाच प्रचंड फरक होता. धनिक घरात जन्मलेल्या जेफरसनना अत्युत्तम शिक्षण मिळाले. वयाच्या पाचव्या वर्षीच त्यांनी शालेय शिक्षणास आरंभ केला. तेथे त्यांना लॅटिन व ग्रीक या भाषा शिकविण्यात आल्या. प्राथमिक शाळेनंतर दोन वर्षे कॉलेज. त्यानंतर एका कायदेपंडिताकडे उमेदवारी. तत्कालीन अमेरिकेतील नामवंत व विद्वान शिक्षकांकडून जेफरसन यांना शिक्षण मिळाले. व्हर्जिनिया राज्याचे गव्हर्नर फ्रान्सिस फ्रोक्यूईएर यांच्या पंगतीचा लाभही जेफरसन यांना मिळत असे. फ्रान्सिस फ्रोक्यूईएर हे बहुश्रुत व सुसंस्कृत गृहस्थ असल्याकारणाने त्यांचा सहवास जेफरसनना फलदायी ठरला नसता तरच नवल!

याउलट लिंकनना शालेय शिक्षण जवळजवळ मिळालेच नव्हते असे म्हणावे लागते. त्यांचे आईवडील तसे निरक्षरच. शिक्षण घेण्याची महत्त्वाकांक्षा अजिबात फोफावणार नाही अशा वातावरणात ते वाढले असे लिंकननीच लिहून ठेवले आहे. त्यांनी स्वयं-अध्ययनाचा मार्ग स्वीकारला. ज्या मागासलेल्या भागात ते, राहात तेथीलच शाळेत ते मधूनमधून जात. तेथील अध्यापकवर्गही फारसा शिक्षित व अध्यापनास लायक असा नसे. लॅटिन येते आहे असा बोलबाला असलेला शिक्षक त्या आडगावात चुकून आलाच तर तो एक जादूगार आहे असे लोक समजत. त्यामुळे ज्या वयात जेफरसन लॅटिन वाचत होते, ग्रीकसारखी प्राचीन किंवा फ्रेंचसारखी आधुनिक भाषा आत्मसात करून त्यावर प्रभुत्व संपादन करीत होते, त्याच वयात लिंकन स्वत:च स्वत:ला इंग्रजी व्याकरण शिकवीत होते. समाजात मान्य ठरेल इतक्या दर्जाचे इंग्रजी लिहिता व बोलता यावे एवढाच माफक हेतू त्यामागे होता. असा दोन टोकांचा फरक असला तरी एक गोष्ट मात्र समान होती. त्यांच्या समकालीनांमध्ये हे दोघेही तरूण अत्यंत मेहनती विद्यार्थी म्हणून प्रसिद्ध होते. आपला नियोजित अभ्यास पूर्ण करूनच जेफरसन आपल्या शाळा सोबत्यांबरोबर खेळावयास जात.



अनुक्रमणिका

ग्रीक व्याकरणाचे पुस्तक ते सतत आपल्याबरोबर बाळगत असत, असे त्यांच्याविषयीच्या आठवणीत नमूद केलेले आहे. महाविद्यालयात असताना ते दररोज किमान पंधरा तास तरी अभ्यास करीत असत. त्यांचे वर्गबंधू जॉन-पेन म्हणत, "आपल्या अभ्यासविषयाकडे धाव घेण्यासाठी, आपल्या जवळच्या मित्रालाही दूर करण्यात जेफरसन यांना वाईट वाटत नसे." कायद्याचा अभ्यास करावयाचा असे ठरविल्यानंतर, वकिलीची सनद मिळावी यासाठी जेफरसन यांनी परीक्षा दिली. या परीक्षेसाठी इतरांनी फारतर पाचसहा महिने खर्च केले असते. पण जेफरसननी मात्र त्यासाठी तीन वर्षे अभ्यास केला होता. पहिला दावा हातात घेण्याअगोदर त्यांनी कायदेविषयक प्रबंध, अहवाल, यातून चांगली विस्तृत अशी अनेक टिपणे काढली होती. कायदेविषयक पुस्तकांप्रमाणेच ते साहित्य व तत्त्वज्ञान यासंबंधीचे वाचनही करीत. जे काही चांगले वाचलेले असेल त्याची टिपणे काढीत. त्यांची नोंद ठेवीत. अठराव्या शतकात अशा नोंदी एकत्रितपणे ठेवण्यासाठी 'नोंदवही' असे. जेफरसन यांच्याकडे टिपणांनी भरलेल्या कितीतरी 'नोंदवह्या' होत्या.

लिंकन यांच्या बालपणीच्या सवंगड्यांना लिंकन हा मुलखावेगळा, अभ्यासू सवंगडी म्हणून आठवतो. हा मुलगा आपल्या हाती जे काही पडेल ते सारे वाचून काढी, असे त्यांचे त्यावेळचे सवंगडी नमूद करतात. लिंकनच्या कुटुंबियांनी देखील लिंकनच्या वाचनप्रेमाबद्दल लिहिले आहे. वयाच्या १० व्या वर्षानंतर त्यांचे वाचनवेड अगदी शिगेला पोहोचले. त्या वयात ते सतत वाचतानाच आढळायचे. वाचलेल्याची टिपणे काढावयास, हाताशी कागद नसला तर ते चक्क फळकुटावर ते टिपण लिहून ठेवीत, असे त्यांच्या कुटुंबियांनीच नमूद करून ठेवले आहे. त्यांची सावत्र आई म्हणते– "जे शब्द, कल्पना आणि परिच्छेद त्यांना समजत नसत, त्यांच्याबरोबर ते मोठ्या चिकाटीने कुस्ती करीत व अखेरीस विजयी होत." न्यू सालेम या विभागात लिंकन राहात होते तेव्हा त्यांच्या शेजाऱ्यांना या मुलाचे फार आश्चर्य वाटे. हा मुलगा इतक्या एकाग्रपणे, इतके वाचतो, इतका अभ्यास करतो तरी कसा हे त्यांच्या दृष्टीने कोडेच होते. या ठिकाणी राहात असताना, इतिहास आणि चरित्रवाङ्मय तर त्यांनी वाचलेच पण त्याबरोबरच व्याकरण, कायदा, सर्वेक्षण (सर्व्हेयिंग) या विषयांची, आणि तंत्रवैज्ञानिक अशा स्वरूपाची पुस्तकेही मोठ्या प्रमाणात वाचली; व त्या विषयांचा अभ्यास केला. कायद्याचा अभ्यास करताना त्यांनी जी प्रचंड मेहनत घेतली, त्यामुळे त्यांच्या मित्रांना त्यांच्या तब्येतीची काळजी वाटू लागली. त्याच सुमारास ॲन रूटलेज या त्यांच्या मैत्रिणीचा मृत्यू झाला. तिच्याशी लग्न करण्याचा त्यांचा बहुधा विचार होता. या मृत्यूचा मानसिक धक्का सहन करता न आल्यानेही त्यांची तब्येत बिघडली असावी. पण काही मित्रांच्या मते, लिंकन यांनी स्वतःच्या तब्येतीला झेपणार नाही एवढा अभ्यास केल्यानेच त्यांची तब्येत बिघडली असावी.

जेफरसन आणि लिंकन या दोघांनी वयात येण्याअगोदरच्या काळात काय काय वाचले याचा अभ्यासही उद्बोधक ठरेल. जेफरसन कुटुंबियांत अशी आख्यायिका



अनुक्रमणिका



प्रचलित होती की, जेफरसन पाच वर्षांचे होण्याअगोदरच त्यांनी आपल्या वडिलांच्या ग्रंथसंग्रहातील सर्व पुस्तके वाचून काढली होती. त्यांचे वडील पीटर जेफरसन मृत्यू पावल्यावर म्हणजे – जेफरसनच्या १४व्या वर्षी – त्यांच्या खाजगी ग्रंथसंग्रहात २४ च्या आसपास पुस्तके होती. त्यात (१) बायबल (२) शद्बकोश आणि (३) व्हर्जिनिया राज्यातील प्रचलित कायदेविषयक पुस्तके यांचा समावेश होता. काही वाङ्मयीन आणि राजकीय ग्रंथही होते, रापिन यांचा इंग्लंडचा इतिहास – द स्पेक्टॅटर – त्यात होता. तरूण जेफरसन यांच्या 'नोंदवहीत' पुढील नोंदी आढळतात. होरास, व्हर्जिल, सिसरो आणि ओव्हिड यांच्या लॅटिन वाङ्मयातील उतारे, पोप, मिल्टन आणि शेक्सपियर या इंग्रजी लेखकांच्या वाङ्मयातील उतारे! या नोंदी त्यांच्या वयाच्या १५ ते १९ च्या दरम्यानच्या आहेत. लॅटिन व इंग्रजी भाषेतील जे मान्यवर लेखक होते, त्यांचा परिचय जेफरसन करून घेत होते हे या नोंदींवरून सूचित होते.

'बायबल' हे लिंकन यांनी वाचलेले पहिले पुस्तक. याबद्दल काहीही शंका नाही. कारण लिंकन यांच्या घरात जी अगदी थोडी पुस्तके होती त्यात बायबलचा समावेश होता. डिलिंगवर्थ यांचे स्पेलिंग बुक आणि तशाच तऱ्हेची इतर शालोपयोगी पुस्तके लिंकन यांनी वाचली होती. लिंकननी 'स्वयंअध्ययन' केले होते याची आठवण या ठिकाणी ठेवावयास हवी. त्यांनी या काळात जी इतर पुस्तके वाचली, ती त्यांनी आपल्या शेजाऱ्यांकडून आणलेली होती. शेजाऱ्यांकडून पुस्तके मागून आणून वाचावयाचे लिंकनना वेडच होते. लिंकननी सुद्धा 'नोंदवही' ठेवली होती. पण दुर्दैवाने आज त्या नोंदवह्या उपलब्ध नाहीत. इंडियानातील त्यांचे शेजारी व इतर परिचित यांची त्यांच्या वाचनवेडाविषयी एकवाक्यता आहे. शेजाऱ्यांकडून मिळालेली, इतर मार्गांनी हाती येतील ती सारी पुस्तके लिंकननी वाचून काढली. अगदी त्यांची पारायणे केली. पण ही सारी शेजारीमंडळी, लिंकनचे आईवडील अशिक्षितच होते. त्यामुळे त्यांच्या घरात असलेली पुस्तकेही प्राथमिक दर्जाची व संख्येने बेताचीच असणार, हे उघड आहे. त्या पुस्तकांमध्ये खालील पुस्तकांचा समावेश होता – इसापच्या गोष्टी, बुनयान यांचे 'पिलग्रिम्स प्रोग्रेस', डेफोचे रॉबिन्सन क्रूसो, जेम्स रिलेचे नॅरेटिव्ह, बेंजामिन फ्रॅन्कलिन यांचे चरित्र, मेसन विम्सलिखित, तसेच डेव्हिड रम्सेलिखित अशी दोन 'वॉशिंग्टन' यांची चरित्रे इत्यादी.

जेफरसन आणि लिंकन यांच्या भिन्न परिस्थितीमुळे त्यांच्या वाचनात मोठाच फरक होता हे तर खरेच, तथापि ते बालवयातही जगावेगळ्या बुद्धिमत्तेचे होते आणि त्या बुद्धिमत्तेची मशागत ते काळजीपूर्वक करीत होते याची कल्पना येते. या दोघांनीही बालपणी आणि तारुण्यात, वाचन करण्यासाठी म्हणून ज्या ज्या संधी उपलब्ध होत्या त्या सर्वांचा भरपूर व पूरेपूर फायदा घेतला.

जेफरसन यांनी तरुणपणी आपल्या आवडीच्या विषयांचा अभ्यास केला तर लिंकन यांना मात्र प्राप्त परिस्थितीत जे शक्य होते त्याचाच अभ्यास करावा

लागला. मात्र अभ्यास करताना दोघांनी कमालीचे परिश्रम घेतले, अगदी समर्पित अशा वृत्तीने. वाचन आणि अभ्यास यांच्या मदतीने आपले उद्दिष्ट गाठण्याचा निश्चय आणि त्यासाठी आवश्यक असलेली शिस्त ही त्या दोघांकडेही सारख्याच प्रमाणात होती. परंतु दोघांच्याही उद्दिष्टांचे हेतू भिन्न होते हे स्पष्टच होते. एक विद्वान गृहस्थ होण्याचे उद्दिष्ट समोर ठेवून जेफरसन कामास लागले होते. १८ व्या शतकात विद्वान माणसाने तत्त्वज्ञ Philosopher बनण्याचे ध्येय बाळगणे व त्यासाठी परिश्रम करणे मानाचे समजले जाई. जेफरसन यांची बालपणापासून तशीच मनीषा होती. १८ व्या शतकातील तत्त्वज्ञ हा सर्व ज्ञानशाखांचे चांगले ज्ञान असणारा असे. ग्रीक, लॅटिन आणि इतर प्राचीन संस्कृती या सर्वांस पायाभूत मानून हे ज्ञान मिळवले जाई. या तत्त्वज्ञाची बांधीलकी तर्क आणि बुद्धिवाद यांच्याशी असे, तसेच 'सत्या' चा पाठपुरावा करण्याचा तो प्रयत्न करीत असे. जेफरसन यांनी आपल्या वैयक्तिक आनंदासाठी वैचारिक धन प्राप्त करून घेतले असले, तरी त्याचा उपयोग समाजासाठीही झाला पाहिजे, केला पाहिजे असे त्यांना वाटे. पण मुख्य उद्दिष्ट हे वैयक्तिक समाधानाची प्राप्ती हे होते. ते अनेकवेळा म्हणत की, राजकारण करण्यास अनुकूल अशी त्यांची परिस्थिती नाही. कदाचित त्यांनी आपले सर्व जीवन अभ्यास करण्यातच घालवले असते, पण ते ज्या काळात जगत होते, त्यात घडणाऱ्या अपघातांमुळे त्यांना तसे करणे शक्य झाले नाही.

लिंकन यांची प्रेरणा वेगळीच होती. ते तत्त्वज्ञ नव्हते व तत्त्वज्ञ बनणे हे त्यांचे उद्दिष्टही नव्हते. मागासलेल्या भागातील व एका गरीब कुटुंबातील हुषार मुलगा सामान्यपणे चौकस असतो. बाहेरच्या जगातून प्रचंड ज्ञान प्राप्त करून घेण्याची त्याची इच्छा असते. या चौकसवृत्तीने लिंकन प्रेरित झाले असावेत. आपल्या दारिद्र्यातून बाहेर पडणे व आपला अभ्युदय करून घेणे ही त्यांची महत्त्वाकांक्षा होती. गरीब परिस्थितीत जन्मलेल्या त्या तशा जीवनात देहकष्ट त्यांच्या नशिबी होते. हातात नांगर आणि कुऱ्हाड घेऊनच सारे जीवन व्यतीत करणे भाग होते. अभ्यास करणे, शिकणे या उद्दिष्टांशी लिंकनची बांधीलकी होती. पण त्याचा विपरीत अर्थ त्यांचे वडील व इतर शेजारी करीत असत. त्यांच्या मते शिक्षण, अभ्यास म्हणजे आळशीपणा. अर्थात ही त्यांची समजूत निराधारच होती. लिंकन अभ्यास करीत, शिक्षणाचा आग्रह धरीत याचे कारण आत्मज्ञान करून घेण्याचा त्यांचा तो उघड प्रयत्न आहे असे त्यांना वाटे. आपण इतरांपेक्षा वेगळे आहोत याची जाणीव लिंकनना फार लहानपणीच झाली होती; व या वेगळेपणात त्यांनी स्वतःला मनमुराद बुडवून टाकले. ते तारुण्याच्या उंबरठ्यावर असताना आपल्या वेगळेपणाने इतरांपेक्षा उठून दिसत. वीस वर्षानंतर अमेरिकन कॉंग्रेसमधील इतर सभासदांच्या लक्षात लिंकन यांचे वेगळेपण आलेले होते. आपणा सर्वांपेक्षा लिंकन यांचे व्यक्तित्व निराळे आहे हे त्यांनी जाणले होते आणि या साऱ्यांच्या खुणा त्यांच्या बालवयापासूनच प्रकटत होत्या. मद्यपान, धूम्रपान यापासून कटाक्षाने दूर राहणे, अपशब्दांचा वापर न करणे ही त्यांची वैशिष्ट्ये त्यांच्या तारुण्याच्या सुरुवातीपासूनच दृग्गोचर होत होती.



अनुक्रमणिका



वॉशिंग्टनसारख्या राजधानीत एखाद्या अमेरिकन कॉंग्रेस सदस्याने इतके सोवळेपणाने वागणे हे जसे आश्चर्यजनक होते; त्याचप्रमाणे अमेरिकेच्या मध्य-पश्चिम भागाच्या सीमेवर राहणाऱ्या, या तरूण लिंकनने अशा सोवळेपणाने वागणे हेही तेथील लोकांच्या दृष्टीने आश्चर्यजनकच होते.

लिंकनच्या सावत्र आईच्या आठवणीनुसार १८२७ ते १८३० या काळातील छोटा लिंकन वृत्तपत्रांचे व ग्रंथांचे वाचन सारख्याच आवडीने व सातत्याने करीत असे. ही वृत्तपत्रे पक्षपाती असून एकाच बाजूनी वकिली करीत व त्यातील बातम्या एकांगी असत. त्यांच्या वाचनाने लिंकनच्या राजकारणविषयक आत्मीयतेला चांगलीच धार आली. इंडियाना राज्यातील त्यांच्या मित्रांच्या आठवणीनुसार याच सुमारास त्यांनी आपल्या मित्रमंडळींची व शेजाऱ्यांची साथ सोडून दिली व त्यांच्या बरोबरचे आपले मतभेदही जाहीर केले. अमेरिकेचे तत्कालीन अध्यक्ष जॅकसन यांना असणारा आपला विरोधही प्रकट केला. एका मित्राने त्याचवेळी थॉमस जेफरसन यांचा अग्रलेख असणारे वृत्तपत्र लिंकनना वाचावयास दिले.

वाचन, अभ्यास यातील एकाग्रता, दुसऱ्याकडून पुस्तके आणून वाचणे या संबंधीच्या लिंकनविषयीच्या आख्यायिका या त्यांच्या तारुण्यातील, ते वयात येते वेळच्या आहेत. एकदा यशस्वी संसदपटू झाल्यानंतर आणि वकिलीची सनद मिळाल्यानंतर, कडी मेहनत करणारे आपले विद्यार्थीपण लिंकननी मागे टाकले. त्यानंतर गंभीर स्वरूपाच्या ग्रंथांचे वाचन त्यांनी फारसे केलेच नाही. मात्र राजकारण आणि वकिलीचा धंदा यांना आवश्यक असणाऱ्या ग्रंथांचे वाचन ते पूर्वीप्रमाणेच मन लावून करीत.

वकिलीच्या धंद्यात लिंकनचे भागीदार असणारे विल्यम एच. हेरनडॉन ह्या गृहस्थांचे वाचन अफाट होते. त्यांचा ग्रंथसंग्रहही मोठा होता. त्यांनी असे ठासून सांगितले आहे की, लिंकन फारच कमी वाचन करीत. लिंकन विचारी, तत्त्वज्ञ होते हे निःसंशय. पण ते फक्त दैनिके आणि वृत्तपत्रे वाचीत. अधूनमधून हेरनडॉन यांच्या संग्रहातील विज्ञान आणि तत्त्वज्ञान या विषयांवरील पुस्तके ते चाळत पण त्यांनी त्यातले एकही पुस्तक संपूर्ण वाचले नव्हते. हेरनडॉन यांच्या शद्बात हेच सांगावयाचे झाल्यास, 'अमेरिकेत लिंकन यांच्या कार्यकक्षेत वावरणाऱ्या अन्य कोठच्याही माणसापेक्षा लिंकन अधिक विचार करीत. परंतु गेल्या किंवा चालू शतकातील कोठचाही महान ग्रंथ त्यांनी वाचला होता असे ठासून सांगता येणार नाही.

लिंकन आपल्यासमोर एखादे उद्दिष्ट ठेवीत आणि त्याच्या पूर्तीसाठी शिस्तबद्ध वाचनाची गरज असेल तर ते करीत. उदा. युक्लिडने लिहिलेल्या भूमितीचे पहिले सहा खंड वाचून त्यावर प्रभुत्व मिळवण्याचे त्यांनी ठरविले आणि ते तसे मिळवलेही. लिंकनचा मुलगा रॉबर्ट याला, आपले वडील युक्लिडच्या खंडाचा मन लावून अभ्यास करीत असल्याचे आठवते. लिंकन ज्या विभागात वकिली करीत

होते, त्या विभागातले इतर वकीलही युक्लिडचा अभ्यास करीत होते. आपण युक्लिडचा अभ्यास मन लावून केला व त्यावर प्रभुत्व मिळवले याचा लिंकनना अभिमान होता. आपल्या आत्मचरित्रात्मक टिपणात त्यांनी आपले हे कर्तृत्व नमूद केले आहे.

आरंभापासूनच त्यांना काव्याची आवड होती व ही आवड त्यांच्या नंतरच्या दिवसातही तशीच राहिली. काव्यवाचनाने मनाला विरंगुळा मिळतो असे ते म्हणत. त्यांचे अनेक मित्र असे सांगत की लिंकनना बर्न या कवीच्या कविता मुखोद्गत होत्या. एकांतात बसून काव्यवाचन करण्यापेक्षा जाहीरपणे काव्यवाचन करणे त्यांना अधिक आवडे. आपल्या कचेरीत बसून लिंकन जे वाचीत ते चांगले मोठ्याने-शब्द डोळ्यांनी पाहणे व कानांनी ते ऐकणे या दोन्ही क्रिया केल्याकारणाने त्यावरच्या अर्थावर आपली पकड अधिक घट्ट होते असे लिंकनना वाटे. परंतु या सवयीने त्यांच्या वकिलीतील भागीदारास फारच त्रास होई, तो अगदी त्रासून जाई. वयात आल्यानंतर किंवा परिपक्व झाल्यानंतर लिंकन कशाचाच अभ्यास मन लावून करीत नसत हे खरे, पण त्याला अपवाद होता तो शेक्सपियरचा. हेरनडॉन यांच्या सांगण्यानुसार – 'लिंकन जेव्हा लहान होते तेव्हा ते बायबल वाचीत आणि वयात आल्यानंतर ते शेक्सपियर वाचीत. शेक्सपियरची पुस्तके त्यांच्या मनात व हातात सदैव असतात. आपल्या मनातून व हातातूनही ते त्यांना कधीच दूर करीत नसत.

जेफरसन यांच्या आयुष्याकडे नजर टाकता असे दिसते की, त्यांनी आयुष्यभर आपली विद्यार्थीदशा सोडलीच नाही. त्यांच्या वाचनाची व्याप्ती आणि ज्ञानाची खोली एवढी प्रचंड होती की त्यावर विश्वास ठेवणे कठीण! त्याविषयी अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. त्यांच्या ज्ञानाने आणि वाचनाने त्यांच्या मित्रांप्रमाणेच अमेरिकन आम जनता आणि युरोपियन विद्वानही प्रभावित होत. काळजीपूर्वक व मन लावून केलेले वाचन व अभ्यास यांच्या जोरावरच जेफरसन यांनी ही ज्ञानप्राप्ती करून घेतली होती. संशोधनाला पर्याय नाही. मग ते संशोधन कितीही किचकट असो, ते करायचेच अशी जेफरसन यांची श्रद्धा होती व ते तसे बोलून दाखवीत. Notes on Virginia (व्हर्जिनिया राज्यासंबंधी टिपणे) या ग्रंथाचे वाचन करताना त्यांनी एक तळटीप लिहिली आहे. त्यात ते म्हणतात – "घटनांचा शांतपणे, धीराने पाठपुरावा करून, त्यांची तुलना करून त्या घटनांना अतिशय सावधपणे एका साखळीत गुंफणे हे अतिशय कंटाळवाणे काम आहे हे खरेच. पण पक्की सत्यप्राप्ती करून घेण्याची इच्छा असलेल्या मानवास या कंटाळवाण्या कामाची सक्ती त्या मानवनिर्मात्या ईश्वरानेच केली आहे."

जेफरसनच्या दृष्टीने हाती घेतलेले कार्य पूर्ण करण्याची हत्यारे म्हणजे ग्रंथ होते. कायदेपंडित, शेतकरी, स्थापत्यशास्त्रज्ञ, संसदपटू वा क्रांतिकारी मुत्सद्दी यापैकी प्रत्येक भूमिका बजावताना, प्रत्येक वेळी ग्रंथ हीच हत्यारे आहेत असे जेफरसन यांनी मानले. जॉन ॲडम्सबरोबरचा जेफरसनचा पत्रव्यवहार प्रसिद्ध आहे.



अनुक्रमणिका

त्या पत्रव्यवहारातील पुस्तकांच्या नामनिर्देशावरून वा संदर्भावरून जेफरसनच्या चौफेर व सातत्यपूर्ण वाचनाची कल्पना येऊ शकते. त्यांचा सर्वसामान्य स्वरूपाचा पत्रव्यवहार आणि इतर लेखन यात या ग्रंथांचे वारंवार उल्लेख आढळतात. त्यांचा आधार घेतल्याचे पण आढळते. आयझॅक जेफरसन हे अध्यक्ष थॉमस जेफरसन यांच्या मॉटोचेवो येथील घरात एक गुलाम म्हणून लहानाचे मोठे झाले. ते म्हणतात 'माझे मालक – अध्यक्ष जेफरसन – हे आपल्या घरातील वाचनालयात, जमिनीवर ग्रंथ पसरून बसत. त्यातील अनेक ग्रंथांतील मजकूर ते बारकाईने नजरेखाली घालीत. अशावेळी जर कोणी त्यांना भेटावयास आले आणि त्या व्यक्तीने एखादा प्रश्न विचारला तर त्या प्रश्नाला उत्तर म्हणून अध्यक्ष जेफरसन सरळ आत संग्रहालयात जात. तो ग्रंथ बाहेर काढीत आणि प्रश्न विचारणाऱ्याला त्या प्रश्नाचे सविस्तर उत्तर देत.

जेफरसन आणि लिंकन हे दोघेही वकील होते. या दोघांनीही विस्तृत वाचन केले, खोलात जाऊन अभ्यास केला, त्या धंद्यात प्रवेश करण्यासाठी तयारी केली. पण एकदा वकिलीची सनद मिळाल्यानंतर त्यांचे मार्ग भिन्न झाले. १७७० मध्ये जेफरसन यांचा सर्व ग्रंथसंग्रह आगीत भस्मसात झाला. त्यानंतर जेफरसन यांनी आपल्या मित्रास हताश होऊन लिहिले की, 'ग्रंथ हाताशी नसले तर आपल्या अशिलांची बाजू मांडणे मला शक्य होणार नाही.' वास्तविक असे वाटण्याचे कारण नव्हते पण जेफरसन यांना मात्र तसे वाटत होते. कायद्याच्या क्षेत्रात त्यांनी जे लिहून ठेवले आहे, त्यावरूनही ही गोष्ट स्पष्ट होते. 'केस लॉ' म्हणून तत्कालीन अमेरिकेत जे ग्रंथ छापण्यात आले होते आणि कायद्याच्या क्षेत्रातील अधिकारी व्यक्तींनी जी मते नमूद करून ठेवली होती त्यांचा संदर्भ जेफरसन आपल्या लिखाणात वारंवार देत. यावरून असे दिसते की, कायद्याच्या क्षेत्रातील प्रचंड ज्ञान हेच जेफरसन यांचे शक्तिकेंद्र होते.

कायद्याबाबतीतील विद्वान म्हणून लिंकनची ख्याती नव्हती, पण ज्यूरींच्या समोर चालणाऱ्या खटल्यातील फौजदारी वकील म्हणून लिंकन प्रख्यात होते. या संदर्भातील अनेक आठवणींपैकी एक महत्त्वाची आहे. लिंकनचा फार दिवसांचा मित्र जॅक आर्मस्ट्रॉंग व त्याची पत्नी हॅना यांचा मुलगा डफ आर्मस्ट्रॉंग यावर खुनाचा आरोप आला. त्यातून त्याची सुटका करताना लिंकननी पंचांगाचा (Almanac) उपयोग मोठ्या चातुर्याने केला. एका विशिष्ट दिवशी चंद्रप्रकाश किती होता याबद्दल या खटल्याच्या एका साक्षीदाराने उल्लेख केला होता. ती माहिती पूर्णपणे बरोबर नाही, हे पंचांगातील त्या दिवशीची तिथी दाखवून लिंकन यांनी सिद्ध केले. परंतु डफ आर्मस्ट्रॉंग केवळ पंचांगाच्या चतुर उपयोगाने सुटले असे नाही. त्यास आणखी कारण होते. लिंकन कोठल्याही खटल्यातील ज्यूरीबरोबर वैयक्तिक स्वरूपाचे संबंध प्रस्थापित करीत असत. हे संबंध अगदी घनिष्ट स्वरूपाचे असत आणि त्यांचे आवाहनही भावनात्मक असे. आपल्या या गुणांच्या जोरावर लिंकन न्यायालयातील सर्व वातावरण बदलून टाकीत. डफ यांच्या खटल्यात लिंकननी

त्यांची बाजू इतक्या नाट्यमय पद्धतीने मांडली की त्यावेळी न्यायालयात हजर असलेली प्रत्येक व्यक्ती टिपे गाळू लागली असे तत्कालीन वृत्तांत सांगतात. वातावरणनिर्मितीच्या या लिंकनच्या गुणाला येथे अधिक महत्त्व आहे. केवळ चंद्रप्रकाशासंबंधीच्या त्यांच्या युक्तिवादाला नव्हे.

यावुलट जेफरसन यांचे मात्र कायदाविषयक ज्ञानच प्रभावी ठरत असे. जेफरसन आणि दुसरे एक प्रख्यात अमेरिकन वकील पॅट्रिक हेन्री या दोघांच्या कायदाविषयक बुद्धिमत्तेची तुलना एडमंड रँडाल्फ या लेखकाने केली आहे. ती फारच प्रसिद्ध आहे. ते म्हणतात, "कायद्याच्या गाभ्यात खोलवर जाणे जेफरसनना फार आवडे. त्या सखोल ज्ञानातून 'अनंत हस्ते कमलावराने' अशा वृत्तीने ते स्फूर्ती घेत; उलट पॅट्रिक हे मानवाच्या हृदयातील गाभ्यालाच हात घालीत." नेमका असाच फरक लिंकन व जेफरसन यांच्या युक्तिवादाबाबत दाखवता येतो.

लिंकन आपल्या मंत्रिमंडळातील सदस्यांना गोष्टी सांगत, प्रख्यात विनोदी लेखकांच्या लेखनातले उतारे वाचून दाखवीत, वाङ्मयाचा वारंवार प्रयोग करीत. ही वस्तुस्थिती निश्चितच लक्षणीय आहे. अमेरिकेच्या अध्यक्षपदावरून लिंकननी इंग्रजीतील काव्याचा उपयोग व संदर्भ जितक्यावेळा दिला आहे, तेवढ्या प्रमाणात दुसऱ्या कोठल्याही अमेरिकन अध्यक्षाने दिलेला नाही. आपल्याला आवडलेल्या अनेक जुन्या कविता ते आपल्या मंत्रिमंडळातील सदस्यांना पाठ म्हणून दाखवीत. उदा. 'O, Why should the spirit of mortal be proud' आणि होमची 'The last leaf' या दोन. लिंकन अध्यक्ष असताना, अमेरिकेतील उत्तर-दक्षिण या दोन विभागात मोठे यादवी युद्ध झाले. या युद्धाचे परिणाम इतक्या वर्षानंतरही आजसुद्धा अमेरिकन जीवनात दिसत आहेत. या यादवी युद्धाने मर्त्य मानवाबद्दलचे विचार लिंकनच्या मनात येणे स्वाभाविक होते. हे विचार चांगल्या व आनंदी गोष्टींबद्दलचे नव्हते, तर मानव हा मर्त्य आहे या वस्तुस्थितीच्या दुःखद भागाकडेच अधिक झुकणारे होते. वर उल्लेख केलेल्या कवितांत हाच विचार प्रामुख्याने सांगितलेला आहे. मन दुःखी व खिन्न करणाऱ्या अवतीभोवतीच्या वातावरणावर उतारा म्हणून ते थॉमस हूड या कवीच्या कविता म्हणून दाखवीत, पण त्यांना खरी आवड होती शेक्सपियरची. आपल्या पौगंडावस्थेतच त्यांनी शेक्सपियर वाचायला सुरुवात केली होती. विल्यम स्कॉट यांचे Lessons In Elocution (वक्तृत्वासाठी पाठ) नावाचे पुस्तक आहे. ते बहुधा छोट्या लिंकनच्या वाचनात आले असावे. लिंकन पुढे उत्तम वक्ता म्हणून गाजले त्याची सुरुवात या पुस्तकाने केली. शेक्सपियरच्या नाटकातील स्वगते, उतारे ते जेव्हा म्हणून दाखवीत तेव्हा त्यांच्यातील वक्तृत्वगुण आणि शेक्सपियरचे प्रेम या दोन्ही गोष्टींचा मिलाफ झालेला दिसे. शेक्सपियरशी बालवयातच परिचय झाल्यावर त्यांना या महान लेखकाच्या लिखाणाबद्दल गोडी उत्पन्न झाली आणि त्यांचे हे शेक्सपियरविषयक आकर्षण आयुष्याच्या शेवटापर्यंत टिकून होते. शेक्सपियरच्या नाटकांत काम करणारा जेम्स हॅकेट नावाचा अमेरिकन नट होता. त्याला लिहिलेल्या पत्रात लिंकन म्हणतात – "शेक्सपियरच्या नाटकांपैकी

काही मी कधीच वाचली नाहीत. पण एखादा धंदेवाईक वाचक जितक्या वेळेस शेक्सपियरचे नाटक वाचील तितक्या वेळेत मी शेक्सपियरची अनेक नाटके वाचली आहेत. माझ्या मते वाचनीय, अशा या विभागात 'किंग लियर', 'रिचर्ड थर्ड', 'हेन्री एट्थ', 'हॅम्लेट' आणि खास करून 'मॅकबेथ' या नाटकांचा समावेश आहे. मला असे वाटते की, मॅकबेथची बरोबरी करील असे दुसरे कोठचेही नाटक नाही.''

लिंकन अध्यक्ष असताना, ज्या ज्या वेळी त्यांना एखाद्या पेच प्रसंगास सामोरे जावयाचे असे आणि एखादी जटिल समस्या त्यांना भेडसावीत असे, त्या त्या वेळी एक विसाव्याचे आणि ज्यापासून शक्ती प्राप्त होईल असे मूलस्थान म्हणून लिंकन शेक्सपियरच्या नाटकांकडे जात. याविषयीचा भरपूर पुरावा उपलब्ध आहे. एका समीक्षकाने लिंकन यांना शेक्सपियरबद्दल एवढे प्रेम का वाटे याबद्दल विवेचन केले आहे. अमेरिकन यादवी युद्धातली आपली भूमिका आणि त्या युद्धात जो प्रचंड मानवी संहार झाला त्याची जबाबदारी सरतेशेवटी आपल्यावर आहे याची लिंकन यांना तीव्र जाणीव होती, हे त्या शेक्सपियरप्रेमामागचे कारण असावे असे त्या समीक्षकाचे मत आहे. आपल्या अनुभवात आणि शोकांतिकेच्या खोलवर जाणीवेत, लिंकननी शेक्सपियरच्या नाटकांचे सार व मथितार्थ सामावून घेतले होते. त्यांची व्याप्ती किती होती याचा अंदाज बांधणे कठीण. ही आपली सहजप्रवृत्ती आहे, अशाच प्रकारे त्यांनी ते केले होते.

जेफरसन यांनाही आपल्या तारुण्यात काव्याची अतिशय आवड होती. त्यांच्या वाङ्मयीन नोंद-वह्यांवरून ही गोष्ट सिद्धच होते. शिवाय इतरही पुरावा उपलब्ध आहे. त्यांची काव्याबद्दलची जाण मोठी होती. काव्याचे वाचनही दांडगे होते. असे होते तरी परंपरागत काव्यच ते पसंत करीत. ओसियन या तिसऱ्या शतकातील कवीच्या काव्यरचनेने ते वेडे झाले होते. (खरे म्हणजे ओसियन हे तिसऱ्या शतकातले काव्यच नव्हते. जेम्स मॅकफरसन नावाच्या माणसाने केलेली ती काव्यरचना होती हे अर्थात पुढे अनेक वर्षांनी ज्ञात झाले.) ओसियन काव्याकडे जेफरसन आकर्षिले गेले याचे एक कारण असे की, या 'कवी' ची काव्यरचना आणि होमर व व्हरजिल या प्राचीन कवींच्या काव्यरचना यात सारखेपणा आहे असे भासे. होमर व व्हरजिल हेही जेफरसन यांचे आवडते कवी. थोडक्यात अभिजात – अक्षर वाङ्मयात ज्यांची गणना झाली आहे अशा, ग्रीक-रोमन काळातील सर्व अभिजात लेखकांना जेफरसन झुकते माप घालीत, याबद्दल शंका नाही. ज्ञानयुगात सर्वांचा आवडता ठरलेला होरेस त्यांना आवडत असे. जेफरसनच्या काळातील बहुसंख्य वाचकांप्रमाणे जेफरसन यांनाही शेक्सपियर आदरणीय असाच लेखक होता. त्याचा अभ्यास काळजीपूर्वक व बारकाईने झाला पाहिजे असे त्यांचे मत होते. त्यांच्या स्वतःच्या वाचनालयात शेक्सपियरच्या निरनिराळ्या आवृत्त्या होत्या. १८ व्या शतकात शेक्सपियरचे वाङ्मय संपादन करण्याची स्पर्धाच चालू असे. कोणाची आवृत्ती बिनचूक आहे किंवा आपल्या आवृत्तीचा अस्सलपणा सिद्ध करण्यासाठी संपादक कोणते प्रयत्न करीत आहेत या सर्व गोष्टी जेफरसन यांना

परिचित होत्या.

वाढत्या वयानुसार जेफरसन यांची काव्यविषयक आवड कमी होत गेली. अमेरिकेच्या अध्यक्षपदाची सूत्रे हाती घेतल्यावर एका पत्रकाराजवळ त्यांनी या प्रकारची कबुली दिलेली दिसते. ते म्हणतात – 'तारुण्यात मला जशी काव्याची आवड होती, ती तेवढ्या प्रमाणात आता राहिली नाही.' येथे लिंकन व जेफरसन यांच्यातील फरक लक्षात येईल. लिंकनप्रमाणे राज्यकारभार करताना त्यांनी वाङ्मयाचा आधार घेतलेला नव्हता. अध्यक्ष म्हणून येणाऱ्या पेचप्रसंगांना तोंड देण्यासाठी किंवा त्यातून सोडवणूक करून घेताना स्फूर्ती यावी, निराळा दृष्टिकोन प्राप्त व्हावा यासाठी ते वाङ्मयाकडे वळले नाहीत. दुसऱ्या माणसाला मोठ्याने वाचून दाखवणे, नुसता एखादा वाङ्मयीन परिच्छेद, काही भाग किंवा सर्व ग्रंथ वाचून दाखवणे यापैकी काहीच त्यांच्या प्रकृतीत बसणारे नव्हते. त्यामुळे आपल्या मंत्रिमंडळातील सदस्यांना काही वाचून दाखवण्याची गोष्ट लांबच राहिली. अध्यक्ष झाल्यामुळे कदाचित वैयक्तिक वाचनासाठी त्यांना फारच थोडा वेळ उपलब्ध होत असावा. पण यालाही लक्षणीय अपवाद आहेत. ते अध्यक्ष असतानाच जॉन वेबस्टर यांच्या 'इंग्लंडचा इतिहास' या ग्रंथाचा शोध त्यांना लागला. त्यावर त्यांचे फारच प्रेम बसले. डेविड ह्यूम यांच्या 'दगलबाज' इतिहासाऐवजी हा इतिहास लोकांनी वाचावा अशी शिफारस ते मोठ्या उत्साहाने करीत. 'बायबल' हा आणखी एक अपवाद. नव्या कराराचे वाचन ते मुद्दाम बुद्धिपुरस्सर करीत. त्यांच्या मते त्यावेळी ज्ञात असणाऱ्या 'गॉस्पेल्स' ची संहिता भ्रष्ट होती. त्या संहितेत अवांतर गोष्टींची भेसळ होती. या भ्रष्ट ग्रंथातून अस्सल, शुद्ध व खऱ्याखुऱ्या ख्रिश्चन धर्माची 'माणसे' शोधून काढण्याचा त्यांचा प्रयत्न होता. मात्र त्यांनी आपला हा 'प्रकल्प' अगदी गुप्त ठेवला होता. त्याची वाच्यता त्यांनी कोठे केली नाही आणि होऊ दिली नाही. आपल्याला भेटावयास आलेल्या व्यक्तीला शेक्सपियरचे उतारे वाचून दाखवणे हा लिंकनचा छंद होता. जेफरसनचा हा प्रकल्प आणि लिंकनचा हा छंद म्हणजे एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. जेफरसनना आपल्या अभ्यासिकेत 'विश्रांतीसाठी' (प्रकल्पाच्या कामासाठी) परतावेच लागे. शिवाय या प्रकल्पाद्वारे असेही सूचित होते की, जेफरसन यांना 'करमणुकी'च्या कृतींवर लक्ष केंद्रित करण्याची गरज होती. फक्त या 'करमणुकी'च्या कृतींना ते 'उपयुक्त उद्दिष्टे' म्हणत एवढेच!

जेफरसन आणि लिंकन या दोन महान व्यक्तींतील वेगळेपणा मोठ्या प्रकर्षाने व नाट्यमय पद्धतीने जाणवतो तो त्यांच्या खाजगी ग्रंथसंग्रहालयांमधील पुस्तके जमा करण्याच्या पद्धतीतून! जेफरसन यांचा विख्यात ग्रंथसंग्रह म्हणजे त्यांच्या मालकीच्या वस्तूंमधली सर्वात आवडती वस्तू. या संग्रहातील पुस्तके जमविण्यासाठी त्यांनी अमाप वेळ व पैसा खर्च केला होता. एक चांगला वाचक आणि ग्रंथसंग्राहक म्हणूनच त्यांनी आपल्या आयुष्याची सुरुवात केली होती. ते सव्वीस वर्षांचे झाले तेव्हा त्यांचा ग्रंथसंग्रह चांगला मोठा झाला. त्यांच्या आईच्या घराला आग लागली त्यावेळी त्या आगीत त्यांना आपली बरीचशी पुस्तके गमवावी लागली. म्हणून त्यापेक्षा

अधिक मोठा संग्रह तयार करण्याचा त्यांनी निश्चय केला. तीन वर्षांच्या आतच आगीत भस्मसात झालेल्या ग्रंथसंग्रहाच्या तीन ते चार पट मोठा संग्रह त्यांनी उभा केला. हे ग्रंथसंग्रहाचे काम त्यांना अतिशय कठीण परिस्थितीत करावे लागले. एकीकडे अमेरिकनांची इंग्रजांबरोबर लढाई सुरू होती. क्रांतिकारी घडामोडींची ती वर्षे होती. युरोपमधून पुस्तके येणे बंद झाले होते. तेथून पुस्तके मागवणेही कठीण होते. अशा बिकट परिस्थितीतही जेफरसन यांनी आपला ग्रंथसंग्रह हळूहळू उभा केला. १७८३ साली आपल्याकडे २६४० ग्रंथ होते असे त्यांनी नमूद करून ठेवले आहे. त्याकाळच्या व आजच्याही काळात हा फारच मोठा संग्रह होता. इतके ग्रंथ जमा केल्यावरही परदेशात, युरोपमध्ये कोठचे ग्रंथ विकत घ्यायचे याची भली मोठी यादी त्यांनी तयार केली होती. फ्रान्समध्ये अमेरिकेचे वकील म्हणून त्यांचे पाच वर्षे वास्तव्य होते. त्या काळात त्यांनी आपला ग्रंथसंग्रह दुपटीने वाढविला. या त्यांच्या संग्राहक वृत्तीमुळे अमेरिकन अध्यक्षपदावरून निवृत्त होतेवेळी त्यांचा ग्रंथसंग्रह प्रचंड मोठा होता. यात कोणतीच अतिशयोक्ती नाही. आपल्या या संग्रहाचा त्यांना अभिमान होता आणि त्यांची खात्री होती की आपला हा ग्रंथसंग्रह अमेरिकेतील एकमेव असा, वेचक पुस्तकांचा संग्रह आहे.

गरिबीत जन्मलेल्या लिंकनचे बालपण गरिबीतच गेले आणि तरुणपणी ते सदैव कर्जात पार बुडालेले असत. म्हणून लिंकनकडे त्यांच्या मालकीची पुस्तके फारच थोडी होती. कालांतराने पुस्तके विकत घेण्याएवढी त्यांची आर्थिक स्थिती सुधारल्यावरही त्यांनी पुस्तके घेण्याचा, मिळविण्याचा फारसा प्रयत्न केला नाही. त्यामुळे त्यांच्या पुस्तकखरेदीबद्दल कागदोपत्री पुरावा मिळणे कठीण! न्यू सालेममध्ये राहात असताना, इंग्रजी व्याकरणाचा अभ्यास करण्यासंबंधीचा सल्ला लिंकनचे शिक्षक ग्रॅहॅम यांनी त्यांना दिला. त्यावेळी कैक किलोमीटर चालत जाऊन किरखान यांच्या व्याकरणाची प्रत त्यांनी हस्तगत केली असे सांगितले जाते पण त्या पुस्तकावर एकदा प्रभुत्व मिळविल्याबरोबर त्यांनी ते आपल्या मैत्रिणीला – ॲन सरवेजला – देऊन टाकले. कायदेविषयक सल्ला देणाऱ्या त्यांच्या कंपनीतील एक भागीदार हेरनडॉन यांचा मागे उल्लेख केला आहे. त्यांनी असे नमूद केले आहे की, 'लिंकन यांच्या मालकीचे कायदेविषयक ग्रंथ आणि त्यांच्या घरातील खोलीच्या मध्यभागी असलेल्या टेबलावरचे सोनेरी वर्खाच्या बांधणीतील थोडे ग्रंथ, या व्यतिरिक्त लिंकनकडे ग्रंथसंग्रह असा नव्हताच. (अतिशयोक्तीचा धोका टाळण्यासाठी हेरनडॉन हे असे म्हणत असावेत.)

आपल्या वडिलांकडे, काही ग्रंथ घरी होते असे लिंकनच्या मुलाला – रॉबर्ट लिंकनलाही आठवते. हे ग्राह्य मानले तरीही आपल्या मालकीचा मोठा ग्रंथसंग्रह असावा अशी मनीषा लिंकननी बाळगली नव्हती. हा हेरनडॉनचा निष्कर्षही योग्य वाटतो.

स्प्रिंगफिल्डहून वॉशिंग्टनला मुक्काम हलवतेवेळी आपली बहुतेक पुस्तके लिंकननी हेरनडॉनना भेट दिली होती.

आपल्या आयुष्यातील सर्वश्रेष्ठ कामगिरी पूर्ण करेकरेतोच लिंकनना हौतात्म्य पत्करावे लागले. जेफरसन मात्र अध्यक्षपदावरून निवृत्त झाल्यावरही अनेक वर्षे हयात होते, चांगले हिंडते-फिरते होते. पण निवृत्तीकाळात ते फारसे कोठे जात नसत, या कुणात मिसळत नसत. तरीही १७ वर्षांच्या आपल्या निवृत्तीकाळात त्यांनी विविध प्रकारची कामे केली. 'मान्टीचेलो'चा शहाणा मनुष्य या नावाने त्यांची कीर्ती सर्वत्र पसरली. (मॉन्टेचेलो या गावी जेफरसनचा वाडा आहे व अजूनही तो पाहावयास मिळतो.)

'आपले कुटुंब, आपली शेती व आपला ग्रंथसंग्रह' ही जेफरसन यांची प्रिय त्रिसूत्री होती. अध्यक्षपदाची सूत्रे खाली ठेवल्यावर आपण खाजगी आयुष्य जगू आणि आपल्या या प्रिय त्रिसूत्रीकडे परत फिरू अशी उमेद ते अनेक वर्षे बाळगून होते. या त्रिसूत्रीतील पहिल्या दोन गोष्टींच्या बाबतीत – कुटुंब व शेती – त्यांच्या पदरी कडवट निराशा आली. आपल्या कुटुंबातील भांडखोर आणि मित्रत्वाची बूज न राखणाऱ्या व्यक्तीबरोबर समझोता करण्यास ते असमर्थ ठरले. त्याचप्रमाणे आपल्या मालकीच्या जमिनीतून काही उत्पन्न मिळेल आणि दिवसेंदिवस वाढणाऱ्या कर्जाचा बोजा हलका होईल ही त्यांची इच्छाही फलद्रूप झाली नाही. फक्त ग्रंथालयातच त्यांना विसावा आणि मुक्ती होती. त्यांनी वर्णन केल्याप्रमाणे या सर्व वर्षांमध्ये आपली वाचनाची अतृप्त भूक भागविण्यास त्यांनी स्वतःस बुडवून टाकले. जॉन ॲडॅम्सजवळ त्यांनी अशी कबुली दिली की, 'ग्रंथाशिवाय मला जीवन अशक्य आहे.' अगदी काळजीपूर्वक निवडलेले दोन हजारांच्यावर ग्रंथ त्यांनी आपल्या आयुष्याच्या अखेरच्या वर्षात जमवले होते. काँग्रेसला दिलेल्या ग्रंथसंग्रहाची जागा या ग्रंथसंग्रहाने घेतली.

लिंकननी स्वतःचे शिक्षण स्वतःच केले. त्यांना कोणी मार्गदर्शक नव्हता. त्यांचे चरित्रकार त्यांच्या वाचनाचे फार अवडंबर माजवितात. डेव्हिड मेअरसन यांनी लिहिलेला लिंकनवरचा ग्रंथ या विषयावरील सर्वोत्कृष्ट ग्रंथ समजला जातो. त्यात त्यांनी असे नमूद केले आहे की, लिंकनच्या चरित्रकारांनी लिंकनच्या वाचनाचे फाजील कौतुक केले आहे. जे ग्रंथ लिंकन यांनी वाचले असावेत असे हे चरित्रकार म्हणतात, ते ग्रंथ वाचून लिंकन यांनी ग्रहण केले असणे, पचवले असणे केवळ अशक्य आहे. जेफरसन यांच्या अफाट वाचनाची व्याप्ती आणि आवाका याबद्दल अतिशयोक्तीने बोलणेही कठीण आहे.

लिंकन यांच्या बाबतीत शृंगापत्ती वेगळ्याच कारणासाठी उभी राहते. एकतर त्यांची विद्वत्ता तशी बेताबाताचीच होती. परंतु त्यांनी जे ग्रंथ वाचले होते, त्याचा त्यांच्या जडणघडणीवर आणि एकंदर कर्तृत्वावर जबरदस्त ठसा उमटलेला होता. त्यांच्या वाचनाने त्यांच्या सर्वच जीवनात अतिशय महत्त्वाची भूमिका बजाविली होती. एकीकडे ते विद्वान नव्हते असे म्हणणे आणि दुसरीकडे ग्रंथांच्या वाचनाने त्यांचे सारे आयुष्य बदलले हे मान्य करणे या दोहोंचा मेळ कसा घालायचा?



अनुक्रमणिका

त्यांच्या जीवनाला न्याय देणे सोपे नाही. लिंकन यांनी ग्रंथच वाचले नसते तर एका सामान्य मजुराच्या जीवनातून ते कधीच बाहेर पडू शकले नसते. मग अमेरिकेचे अध्यक्षपद भूषविण्याचे लांबच! दुसऱ्या अनेक लेखनशैलींना मागे टाकणारी, अमेरिकन-इंग्रजीत आपल्या वैशिष्ट्याने झळकणारी लिंकनशैली ग्रंथवाचनाशिवाय निर्माण होणे कठीण होते. या शैलीत गद्य लिहिणे लिंकनना कठीण होते. इंग्रजी भाषेचे वैभव समजले जाणारे लिंकनचे अनेक प्रसंगीचे उद्‌गार वा त्यांचा एकूणच विकास ही लिंकनच्या ग्रंथवाचनाची साक्ष देतात. ग्रंथांच्या वाचनाशिवाय – विशेषतः बर्नस् हा कवी आणि शेक्सपियर या दोघांच्या साहित्यवाचनाशिवाय – लिंकनची घडण काही निराळीच झाली असती. मानवी संवेदना आणि अनुभवातील गुंतागुंतीची बूज राखणे हे दोन्ही गुण या दोन लेखकांच्या वाचनानेच त्यांनी विकसित केले. या दोन्ही लेखकांच्या वाचनाने त्यांच्या महत्त्वाकांक्षेला माणुसकीचे अस्तर मिळाले आणि ते महानतेच्या पातळीपर्यंत पोचले. लिंकन जे जे वाचीत आणि त्यातले त्यांना जे आवडे त्याचा ते अगदी आठवून आठवून आस्वाद घेत. त्यांची स्मरणशक्तीही दांडगी होती. आपण वाचलेल्यातले जे काही चांगले आहे असे त्यांना वाटे ते ते आपल्या स्मृतिमंजूषेत साठवीत. अनेकवेळा त्याचा संदर्भ देत, आवडते परिच्छेद पाठ म्हणून दाखवीत. हे सारे जरी खरे असले तरी एकंदर त्यांच्या वाचनाचा आवाका मर्यादित होता. विशेषतः जेफरसन यांच्याशी तुलना करता त्यांचे मर्यादित वाचन जाणवते.

खरे म्हणजे वाचन ही एक प्रक्रिया आहे. एखाद्या वाचलेल्या पानावरची माहिती जाणणे एवढी ती सरळसोट नाही. या प्रक्रियेत वाचणाऱ्याच्या मनात परिवर्तन घडवण्याची क्रियाही अनुस्यूत आहे. लिंकन आणि जेफरसन या दोन्ही महान व्यक्तींच्या जीवनात वाचनाने मोठीच क्रांती केली हे निःसंशय! परंतु वाचनाचे महत्त्व किती, वाचनाने त्यांच्या आयुष्यात नेमकी कोठची भूमिका बजावली याबद्दल अंदाज घेताना, त्याचे मोजमाप करताना आणि हे कसे करावे यासंबंधी विचार करताना आपणास एमिली डिकन्सन यांच्या कवितेची आठवण होते. या कवितेची सुरुवात एका उपमेने होते आणि शेवट दुसऱ्या उमपेने होतो.

ग्रंथासारखी दुसरी कोठचीही युद्धनौका नाही जी आपणास दूरवरच्या प्रदेशात घेऊन जाईल.

कोणताही चपळ घोडा, उद्दाम व उमदा,
काव्यातील पानासारखा,
पण तो घोडाही आपणास असे दूर नेणार नाही
गरीबातला गरीबही हा प्रवास करतो
दस्तुरीचे नियम न मोडता.
हा रथ तसा किती काटकसरी
मानवी आत्मा दूर घेऊन जाणारा.

या कवितेत वाचन – एक प्रवासाचे साधन या स्वरूपात रसिकासमोर आहे. कवयित्रीने हे साधन एकापेक्षा अनेक स्वरूपे धारण करते हे मान्य केले आहे. युद्धनौका ही चांगली वेगवान, चौफेर दृष्टी ठेवून चालणारी, अनेक गोष्टींना सामावून घेण्याइतकी विस्तृत आणि सरतेशेवटी पृथ्वीप्रदक्षिणा करण्याच्या तयारीत. एक उपमा म्हणून त्याकडे पाहिले असता, ही उपमा 'वाचन' या क्रियेत कोठच्या सुप्त शक्ती अनुस्यूत आहेत हे सांगते – अगदी बारीक सारीक तपशील देऊन व आवाका सांगून! पण युद्धनौकेतून प्रवास करणे हे जवळजवळ कोणालाच शक्य नाही. याउलट वाचन हे सर्वांच्याच आवाक्यातले आहे. (यावरच या कवितेचा भर आहे) कोठच्याही गरीब माणसाला दस्तुरीचे नियम न मोडता वाचनाच्या मदतीने 'प्रवास' करता येतो. कवयित्रीने एवढे सांगितल्यावर वाचक पुढील विचार ऐकण्यास उत्सुक होतो. युद्धनौकेच्या मानाने अगदी साध्या, जराशा भव्य दिसणाऱ्या वैभवी वाहनातून – रथातून – प्रवास असे रूपक तिने योजिले आहे. एका बाजूस महासागर पार करून जाणारी युद्धनौका, दुसऱ्या बाजूस अगदी सजविलेला असला तरी तो साधा रथच. या दोघांच्या आवाक्यात जबरदस्त फरक असणारच. हे जरी खरे असले तरी 'वाचना' चे जे अत्यंत महत्त्वाचे कार्य मानवी हृदयाला एका जागेपासून दुसरीकडे नेणे ते तो साधा रथही करतो.

जेफरसन यांचा मुळातच, अभ्यास करणे, वाचन करणे, यातच सारे जीवन व्यतीत करावे याकडे ओढा होता. त्यांचा स्वतःचा वैयक्तिक ग्रंथसंग्रह मोठा होता. त्यांना सोळा भाषा येत होत्या. या दोन्हीच्या मदतीने त्यांना बौद्धिक क्षेत्रात चांगला दूरवर प्रवास करणे शक्य होते. एमिली डिकन्सन यांच्या कवितेतील युद्धनौकेला जसे जगातील कोठल्याही बंदरात नांगर टाकून उभे राहता आले असते तसेच जेफरसन यांचे होते. विद्वत्तेच्या जगातील कोठच्याही बंदरात त्यांना मुक्काम करता आला असता. त्यांचे ज्ञान आणि अनेक भाषांवरील प्रभुत्व यामुळे त्यांना ते सहजशक्य झाले असते. लिंकन मात्र कवितेतील 'काटकसरी रथा' प्रमाणे होते. 'काटकसरी' हे विशेषण वैशिष्ट्यपूर्ण आहे. कोठचेही व कसल्याही प्रकाराचे वाहन वापरले तरी वाहनाचे मूलभूत कार्य प्रवाशांना एका जागेहून दुसऱ्या जागेकडे नेणे हेच असते. काटकसर हे विशेषण वापरताना या दोन्ही वाहनांच्या मूलभूत प्रकृतीकडे लक्ष वेधावे असे एमिली डिकन्सन यांना वाटत असावे. 'वाहन' हे रूपक त्यामुळे अधिक काही सांगून जाते. आरंभीच्या दारिद्र्यावस्थेत 'दस्तुरीचे नियम न मोडता' वाचनापासून होणारा फायदा लिंकनना घेता आला. 'वाचक' म्हणून त्यांनी आपल्या आयुष्यातील जो काळ घालवला त्याला अगदी वैशिष्ट्यपूर्ण अशा मर्यादा होत्या. परंतु त्या मर्यादा असूनही त्यांच्या वाचनाने काहीतरी सखोल आणि त्यांना मोठेपणा मिळवून देणारे असे काहीतरी करून दाखवले. लिंकनचे वाचनाचे 'वाहन' जेफरसन यांच्या युद्धनौकेसारखे प्रचंड व भव्य नसेल पण काहीही झाले तरी ते वाहन होतेच. केवळ कल्पनेच्या मदतीने अस्तित्वात आलेले ते वाहन! लिंकन त्याच्या साहाय्याने गतकाळात झालेल्या घटनांमध्ये सामील होत, त्या काळातील दुर्दैवी घटनांचा

आणि जगातील सर्वश्रेष्ठ अश युगपुरुषांच्या कर्तृत्वाचा अनुभव घेत.

जगातील इतर अनेक श्रेष्ठ व मोठ्या राजकीय नेत्यांशी तुलना करता जेफरसन आणि लिंकन हे एका बाबतीत नक्की वेगळे होते. मन आणि कल्पनाविश्व यामध्ये जे जे श्रेष्ठ असे होते त्या सर्वात ते सहभागी होत. इतर श्रेष्ठ राजकीय नेत्यांच्या बाबतीत असे आढळून येत नसे. लिंकन आणि जेफरसन यांच्या विचारांमुळे वा भाषणांमुळे त्यांना अमेरिकेत मान मिळत नाही. अमेरिकन व्यक्तीला आजही त्यांचे जे शद्ब आणि कल्पना स्फूर्ती देतात, आव्हान देतात ते परिपक्व अशा अनुभवाचे फळ आहे आणि त्यामुळेच ते दोघे आदरणीय आहेत यात शंका नाही.

या दोन महान व्यक्तींच्या बाबतीत एक गोष्ट शेवटी निश्चित लक्षात ठेवावयास हवी की – या सार्‍या परिपक्व अनुभवात वाचन – मग ते युद्धनौका वापरून केलेले असो किंवा काटकसरी रथाच्या मदतीने केलेले असो – हा एक अत्यावश्यक भाग होता.

(टिप – प्रकाशन संस्थांकडे प्रकाशनांसाठी अनेक हस्तलिखिते येतात. ती हस्तलिखिते वाचणे मोठे कंटाळवाणे काम असते. काही वेळा त्या हस्तलिखितांवर संपादकीय संस्कार होऊन त्यांचे पुनर्लेखन लेखक करीत असतो. अशावेळी ती हस्तलिखिते अनेकवेळा वाचावी लागतात. ही हस्तलिखिते वाचण्यासाठी तेथे पगारी माणसे – ज्यांना साहित्याचीही थोडीफार जाण आहे – नेमली जातात अशांना धंदेवाईक वाचक – Professional Readers असे म्हणतात.)

●

---

## अविश्वसनीय सत्ये –

अ) १९८० च्या आरंभासच इंग्लिश लेखिका बार्बारा कार्टलॅंड (जिच्या कादंबरीच्या नायिका नेहमीच सुंदर, तरूण, कुमारिका असतात) – आणि लुई लॅमर – (ज्याने अमेरिकन 'काऊबॉय' बद्दल स्वच्छंदी, धाडसी तरुणांबद्दल ७६ कादंबर्‍या लिहिल्या आहेत) – यांची १०० लाखांच्यावर पुस्तके खपली आहेत. १९४८ ते १९८१ पर्यंत हॅरॉल्ड रॉबिन्सनच्या १५ कादंबर्‍यांच्या २० कोटी प्रती खपल्या आहेत. कारण त्यांच्या रोज जवळजवळ ४०००० प्रती खपतात.

ब) १६६० मध्ये ॲमस्टरडॅमच्या व्यापार्‍यांनी दुसर्‍या चार्लस् राजाला जगाचा भव्य ॲटलास भेट दिला. आता तो ॲटलास ब्रिटिश म्युझियममध्ये आहे. त्याची उंची ५ फूट १० इंच असून रूंदी ३ फूट ६ इंच आहे. ज्यावेळी तो उघडायचा असतो, त्यावेळी त्याला चाकांवरच चढवावं लागतं.

---

# लेखकांचा परिचय

## फ्रान्सिस्को जोसे

### नाना जोशी

फ्रान्सिस्को जोसे हे फिलिपाईन्सच्या एका महान लेखकाचे नाव. ते आपल्या पुस्तकात एफ. सिओनिए जोसे या नावाने अवतरतात. फ्रँकी या नावाने फिलिपाईन्समध्ये सर्वत्र ते ओळखले जातात. आपल्या देशातील सर्व लेखकांच्या रांगेत अगदी पहिल्या श्रेणीतील पहिल्या रांगेत त्यांचे स्थान आहे. १९९० सालच्या उन्हाळ्यात मला ते आपल्या मोटारीतून उत्तर लुझान परगण्यातील खेड्यांचा दौरा करण्यास घेऊन गेले. खेड्यांमागून खेडी आम्ही पार करीत होतो. जोसे एकीकडे गाडी चालवीत व त्याचवेळी, त्यांना लेखनाला स्फूर्तीदायक ठरलेला परिसर दाखवीत. त्यांच्या अनेक कादंबऱ्यातले प्रसंग त्या प्रदेशातील काही वास्तूत घडलेले होते, अथवा त्याच प्रदेशात अन्यत्र घडलेले होते असे त्यांचे म्हणणे. मी अमेरिकेसारख्या प्रचंड देशातून (अर्थात फिलिपाईन्सशी तुलना करता) आलो असल्याकारणाने फिलिपाईन्ससारख्या छोट्या देशाला भेट देताना माझ्या मनात अपराधीपणाची भावना होतीच. कारण माझ्या मनात सारखे असे येत होते की, मी अमेरिकेत असतो, तर अमेरिकेतल्या महान लेखकांपैकी पहिल्या तीनातील एकाही लेखकाने, मला अशी राजेशाही वागणूक दिली नसती, याबद्दल मला खात्री होती. मनात अपराधीपणाची भावना होती ती त्या कारणासाठी. छोट्या देशाला भेट देण्याचा फायदा असतो तो हाच. एक फायद्याचे सोडून द्या. त्या भेटीपासून निर्भेळ असा आनंदही आपणास प्राप्त होतो. परंतु त्याचबरोबर आणखीही एक विचार माझ्या मनात येऊन गेला. अमेरिकेसारख्या खंडतुल्य (खंडप्राय) देशात, तसा महान राष्ट्रीय लेखक कोणी असतच नाही. त्याचे असे आहे, अमेरिकेत लेखक हा सर्वसामान्यपणे फक्त लेखकच असतो. अर्थात अगदी थोडे अपवाद सोडता. फिलिपाईन्समध्ये जोसे हे अनेक कादंबऱ्यांचे लेखक, सामाजिक आणि राजकीय या दोन्हीही क्षेत्रातील संघटक, संपादक, पत्रकार आणि सर्वात कडी म्हणजे, नव्या कल्पना घेऊन धंदा करणारा गृहस्थ. अमेरिकेत असा मनुष्य शोधूनही सापडणार नाही.

लेखक म्हणून जोसे हे दोन मालिकांसाठी प्रसिद्ध आहेत. त्यापैकी रोसालेस (Rosaless) ही एक मालिका. हा पाच भागांचा संच. प्रसिद्धीकाळ साधारण वीस वर्षांचा. ही मालिका फिलिपाईन्समध्ये, आजकाल एक राष्ट्रीय गाथा मानण्यात येते. फिलिपाईन्समधील रहिवाश्यांच्या दृष्टिकोनातून फिलिपाईन्सच्या इतिहासाकडे पाहाणे, हा या मालिकेतील पात्रांचा दृष्टिकोन. सर्वसामान्यपणे, महादुष्ट, चांडाळ व दडपशाही करणाऱ्या साम्राज्यवाद्यांनी फिलिपाईन्समधील जनतेच्या आकांक्षा दडपून

टाकल्या, त्याची ती कथा. प्रथम स्पॅनिश, त्यानंतर अमेरिकन, मग अनेक भ्रष्ट असे फिलिपाईन्समधील 'आहेरे' वर्गातील लोक, आणि सरतेशेवटी मारकोस, अशी ही त्या महादुष्ट, चांडाळ व दडपशाही करणारांची मालिका. लॅटिन अमेरिकेप्रमाणेच, फिलिपाईन्समध्येही, दुष्ट व स्वार्थी राज्यकर्त्यांपुढे देशातील जनता किती हतबल झाली आहे, ती कशी अगतीक आहे, हे व्यक्त करणाऱ्या कादंबऱ्या महत्त्वाच्या मानण्यात येतात. राष्ट्रीय अस्मितेतील तो एक अतिशय महत्त्वाचा भाग आहे. या उलट जपानचे आहे. जपान हा आत्मसंयमन, स्वतःचे प्रयत्न, दृढ निश्चय इत्यादींच्या मदतीने थोडक्यात, स्वतःच्या सामर्थ्यावर, स्वतःच्या प्रयत्नाने यशस्वी झालेला समाज आहे. त्या समाजात रोसालेससारख्या मालिकांना महत्त्व नाही व स्थानही नाही. जोसे रिझाम या लेखकाने 'नोळी मे तानगेरे' नांवाची एक कादंबरी प्रसिद्ध केली, एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस. अमेरीकेत प्रसिद्ध झालेल्या 'अंकल टॉम्स केबिन' या कादंबरीशी या कादंबरीचा चेहरा मिळता-जुळता आहे. स्पॅनिश राज्यकर्त्यांविरुद्ध लिहिण्यात आलेली ही कादंबरी. रोसालेस ही मालिका, अंकल टॉम्स केबिन या कादंबरीचा आधुनिक अवतार आहे. तसे असले तरी वाङ्मयीन दृष्ट्या ती कितीतरी श्रेष्ठ आहे.

रोसालेस या मालिकेतील कादंबऱ्यांचा काळ हा १८८० ते १९७० असा एकंदर नव्वद वर्षांचा काळ आहे. या प्रदीर्घ कालखंडात घडलेल्या साऱ्या ऐतिहासिक घटनांची नोंद या कादंबऱ्यात आहे. उदा. स्पॅनिश राजवटीचा १८९८ सालात झालेला अंत. त्यानंतर थोड्याच वर्षांच्या आतच झालेला अमेरिकन राज्यकर्त्यांचा अंमल. जोसे यांनी या मालिकेतील एका भागात एका महत्त्वाच्या लढाईचे वर्णन केले आहे. फिलिपाईन्सच्या फौजा दोन आघाड्यांवर लढत होत्या. एकीकडे त्यांना स्पॅनिश राज्यकर्त्यांचा पराभव करायचा होता. दुसरीकडे त्यांना अमेरिकन आक्रमण परतवून लावावयाचे होते. परंतु त्यांच्या दुर्दैवाने अमेरिकन फौजांनी त्यांचा पराभव केला. दुसऱ्या महायुद्धानंतर (कृष्ण मेनन व डांगे छाप जे कम्युनिस्ट होते) अशा कम्युनिस्टांनी हूक यांच्या नेतृत्वाखाली बंड केले. परंतु त्यांचा पराभव झाला. सरतेशेवटी त्या देशाची एवढी अधोगती झाली की मार्कोस यांचे भ्रष्ट शासन तेथे सत्तेवर आले. या राष्ट्रीय स्मरण-गाथेच्या पहिल्या भागात असे दाखवले आहे की, एक शेतकरी कुटुंब, वैराण अशा इलोकोस या विभागातून उत्तर लुझान या भागात स्थलांतर करते. रोसालेस या शहराच्या त्या मानाने, अधिक सुपीक अशा जमिनीवर येऊन ते कुटुंब वास्तव्य करते. रोसालेस हे शहर पानगासिनान या परगण्यात व त्यामानाने, फिलिपाईन्सची राजधानी, मॅनिला या शहराजवळ आहे. १८९८ साली स्पॅनिश राजवट जाऊन अमेरिकन राजवट आली. या राजवटीबरोबर अमेरिकन कायदेही आले. त्याचा फायदा घेऊन, फिलिपाईन्समधील जुना 'आहेरे' वर्ग, ज्या 'उपऱ्यांनी' जमीन व्यापलेली असते, त्यांना हुसकावून लावतो. फिलिपाईन्समधील 'आहेरे' वर्गाचे लोक जुने सरदार, सामंत, व्यापारी इत्यादी – बनावट कागदपत्रे तयार करून, 'उपऱ्यांनी' व्यापलेली जमीन ही आपली आहे,

असे कायदेशीरपणे सिद्ध करतात. या साऱ्या घटनेने त्या शेतकरी कुटुंबासही देशोधडीला लावण्यात येते. त्यांच्याबरोबर दुसरेही अनेक उपरे असतात. या ज्या साऱ्या घटना आहेत, त्या जोसे यांच्या स्वतःच्या कुटुंबाला अगदी समांतर अशा घटना आहेत. त्यांचे पूर्वजही रोसालेस या भागात स्थलांतर करून आले होते. त्यांचे वडील आग्लीपायन चर्च – या पंथाचे एक मिनिस्टर (चर्च अधिकारी) होते. आग्लीपायन चर्च ही ख्रिश्चन धर्मातील कॅथलिक पंथाचीच एक उपशाखा. फिलिपाईन्स या राष्ट्रातच फक्त या पंथाचे अस्तित्व आहे. फिलिपाईन्स राष्ट्रवादाचा तो एक हुंकार. व्हेटिकनला आपली निष्ठा वाहाण्याऐवजी, स्थानिक फिलिपिनो बिशपशी एकनिष्ठ राहाणे, फिलिपाईन्समध्ये तत्कालीन ख्रिश्चन नागरिकांना अधिक पसंत होते. जोसे कुटुंबाला जमीन गमवावी लागली. तसेच जोसे हा लहान मुलगा होता, तेव्हा त्याचे वडील, त्यांना सोडचिठ्ठी देऊ निघून गेले. हे सारे १९२० च्या आसपास घडले. जोसेलिखित या राष्ट्रीय स्मरणगाथेत, त्या शेतकरी कुटुंबातील मुले काहीना काही खटपट करून, शिक्षण पदरात पाडून घेण्यात यशस्वी होतात असे दाखविले आहे. शेती धंद्यातून ही मुले बाहेर पडतात. परंतु त्यांचा जसजसा अभ्युदय होतो, तसतशी त्यांची नैतिक अवनतीही होते. शहरी भागातील भ्रष्टाचाराच्या चिखलात त्या कुटुंबातील मुले अगदी गळ्यापर्यंत रुततात.

जोसे यांनी आपली पहिली कादंबरी १९६२ साली प्रसिद्ध केली. तिचे नाव आहे The Pretender (तोतया). परंतु स्मरणगाथा या मालिकेत या कादंबरीचा क्रमांक चौथा आहे. फिलिपाईन्समध्ये प्रसिद्ध होत असलेल्या एका मासिकाने या कादंबरीचे वर्णन पुढील शब्दात केले आहे. 'ही कादंबरी जवळ जवळ प्रत्येकाने वाचलेली असल्याकारणाने फक्त एकच मुद्दा सांगितल्यानंतर या कादंबरीवरच रेंगाळत वेळ घालविण्याची आवश्यकता नाही. तो मुद्दा म्हणजे अन्य दुसऱ्या कोठल्याही महान कादंबरीप्रमाणेच या कादंबरीचे आहे. आपण जेव्हा जेव्हा ही कादंबरी वाचतो, तेव्हा तेव्हा, आपणास त्यात काही नवे सापडते'. दि प्रिटेंडर या कादंबरीबद्दल याच प्रकारचे अभिप्राय हे आता फिलिपाईन्समध्ये नेहमीचे झाले आहेत. ही कादंबरी आन्टोनिओ सॅमसन या व्यक्तीला केंद्रस्थानी ठेवून रचलेली आहे. आन्टोनिओ सुरवातीच्या काळात स्थलांतर करून आलेल्या शेतकरी कुटुंबाचा एक वंशज. दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकेतल्या प्रख्यात हारवर्ड या विद्यापीठात शिष्यवृत्ती मिळविण्यात यशस्वी होतो. तो या अशा पहिल्या श्रेणीतीलही पहिल्या पाच विद्यापीठांपैकी एकात शिष्यवृत्ती मिळविण्यात यशस्वी होतो. यावरून त्याच्या तल्लख बुद्धीची कल्पना येईल. हारवर्ड विद्यापीठात शिक्षण पुरे करून तो मॅनिलाला परत येतो. पराकोटीचा ध्येयवाद आणि आशा या दोन गोष्टी बरोबर घेऊन. परंतु अखेरीस त्याला पराभव पत्करावा लागतो. जुन्या धनाढ्य वर्गातील, पैशाच्याच पाठीमागे सदैव असलेल्या व्यक्तींना त्याला आपली हुषारी विकणे भाग पडते. तो त्यांचा हरकाम्या ठेकेदार व 'जनसंपर्काधिकारी' होतो. रोसालेस या मालिकेतील इतर कादंबऱ्याही फिलिपाईन्स या राष्ट्राची प्रवृत्ती काय आहे? ग्रामीण भागातले

जीवन हे खरोखरच अधिक चांगले होते का? आधुनिक युगात फिलिपाईन्स या राष्ट्रात अनेक गोष्टी चुकीच्या मार्गाने का गेल्या? फिलिपाईन्सची अवनती का झाली? या प्रश्नांशीच निगडीत आहेत.

फिलिपाईन्समध्ये आणीबाणी जाहीर होण्यापूर्वीच्या काळात म्हणजे १९७० सालच्या आसपास, मास Mass (जनता) या कादंबरीचा काळ आहे. आन्टोनिओ सॅमसन यांना एक अनौरस मुलगा आहे. अतिशय हुषार आणि प्रतिभावंत. अगदी आपल्या वडिलांसारखा. तो आपल्या बापापेक्षाही, आणखीनच अत्यंत किळसवाण्या, गुन्हेगारीने भरलेल्या भ्रष्टाचाराच्या गर्तेत आणखीनच खोल रुतत जातो. आपल्या वडिलांना त्याने याबाबतीत मागे टाकलेले असते. आन्टोनिओंच्या हुषार चिरंजीवांची अशा प्रकारे अवनती होत असताना त्या चिरंजीवांचे मित्र त्यांना सोडून जातात आणि ते सारे मारकोसविरोधी डाव्या गटात सामील होतात.

कालानुक्रम लक्षात घेऊन या राष्ट्रीय स्मरणगाथेचा विचार करता, त्याचा अनुक्रम पुढीलप्रमाणे आहे. Po-on पो-ओन, ही पहिली कादंबरी. मुळातील इलोओस खेड्यासंबंधी आणि त्यानंतर स्थलांतर करताना, शेतकरी कुटुंबांना ज्या हालअपेष्टातून जावे लागले, त्यासंबंधी ही कादंबरी आहे. तिसरी 'माय ब्रदर माय एक्झीक्यूशनर' (माझा भाऊ, माझा खुनी) या कादंबरीत दोन भाऊ राजकीयदृष्ट्या दोन परस्परविरोधी गटात असतात. ही या पूर्वी उल्लेख येऊन गेलेल्या हुक उठावातील काळाच्या घटनेसंबंधी आहे. त्यानंतरची 'दि प्रिटेंडर्स' आणि मग 'दि मास'. १९८८ साली जोसे यांनी या मालिकेशी संबंधित असलेली सहावी कादंबरी प्रसिद्ध केली. तिचे नाव 'एरमिरा'. ही कादंबरी फिलिपाईन्स जपान्यांनी आपल्या कब्जात आणला होता त्या काळातील व त्यानंतरच्या थोड्या वर्षांच्या काळातील. रॅंडम हाउस ही अमेरिकेतील प्रख्यात प्रकाशन संस्था. १९९२ नंतर ही संस्था जोसे यांचे लिखाण अमेरिकेत प्रसिद्ध करणार आहे. या दरम्यानच्या काळात, कोणा एखाद्या रसिक वाचकाला जर ही मालिका हवी असेल तर ती त्याला सोलिडारीदार पब्लिशिंग हाऊस, पोस्ट बॉक्स नं.३९५९ मॅनिला, मूल्य ६० डॉलर – यांत टपाल खर्च आला, या ठिकाणाहून मिळेल.

जोसे यांनी लघुकथाही लिहिलेल्या असून त्यांनी आजवर चार लघुकथा-संग्रह प्रसिद्ध केले आहेत. 'दि गॉड स्टीलर', 'प्लॅटिनम्', 'ओलव्हिडॉन' आणि 'बायबाय' ही त्यांची नावे. या ठिकाणी 'प्रसिद्ध केले आहेत' याचे स्पष्टीकरण करणे जरूरी आहे. 'प्रसिद्ध केले' या शब्दप्रयोगाचा अर्थ अगदी शब्दशः घ्यावयाचा. जोसे यांची बहुतेक पुस्तके सोलीदारीदारतर्फेच छापली जातात. वास्तविक जोसे यांनीच ही संस्था स्थापन केली आहे. ही सोलीदारीदारने छापलेली पुस्तके, जोसे आणि त्यांची पत्नी यांनी चालविलेल्या मॅनिला शहरातील एरमिना या विभागात असलेल्या पुस्तकांच्या दुकानात विकली जातात. जोसे यांच्या लघुकथा प्रख्यात जुने अमेरिकन कथाकार ओ. हेन्री यांच्या लिखाणासारख्या आहेत. (मराठी वाचकाला

प्रा. ना. सी. फडके यांनी ओ. हेन्री यांचा चांगला परिचय करून दिलेला आहे.) जोसे कथारचना करण्यात कुशल आहेत. ते आपल्या कथातून अनेकवेळा उपरोधिक सूरही लावतात. हे सारे ओ. हेन्रीप्रमाणेच आहे. या सर्व कथांचा शेवट 'निराशे'त तरी असतो, अथवा नायक/नायिका हे स्वतःस विकून घेण्यात होतो. उदा. एका सरकारी कचेरीत, बिलाच्या ठिकाणी काम करणारी कारकून महिला ही अनेक वर्षे पै-पै करून पैसे जमा करते. उद्दिष्ट एकच. या पैशाच्या जोरावर मॅनिला-फिलिपाईन्सची राजधानी येथे जायचे, तेथे गेल्यानंतर, आपणास बढती मिळावी यासाठी मध्यवर्ती कचेरीत अर्ज करायचा. परंतु मॅनिला येथे येऊन पोचल्यानंतर या कारकून स्त्रीला अनपेक्षित असे अनुभव येऊ लागतात. एकतर कोठल्या ना कोठल्या स्वरूपात लाच घेतल्याशिवाय तिचे म्हणणे कोणी ऐकण्यासही तयार नसतो, असे तिला आढळून आले. भरपूर पैसे, आपली प्रतिष्ठा, मान इत्यादी गोष्टी या स्त्रीने अर्पण केल्या. अगदी शक्य नव्हते इतक्या प्रमाणात त्या तिने दिल्या. निदान त्यावेळी तरी तिला तसे वाटले. सरतेशेवटी तिला दुर्दैवांना सामोरे जावे लागलेच. तिची परिस्थिती ती मॅनिला येण्यापूर्वी होती त्याहीपेक्षा वाईट होते. दुसऱ्या एका कथेत, एक सुशिक्षित फिलिपिनो, पुन्हा एकदा 'डोंगरात' परतून अगदी प्राथमिक स्वरूपाचे ग्रमीण आयुष्य जगायचे ठरवितो. त्यासाठी तो युनायटेड स्टेट इनफरमेशन सर्व्हिस या संघटनेतील नोकरी सोडतो. जोसे हे स्वतः त्या संघटनेत एकेकाळी नोकरी करीत होते. 'ओलव्हीडोन' ही त्यांची आणखी एक गोष्ट. सर्वात अधिक लोकप्रिय अशी. या गोष्टीतील प्रमुख घटना पुढीलप्रमाणे : एक फिलिपिनो अमेरिकेत डॉक्टरीचा व्यवसाय करीत असतो. तेथे त्याचा जम चांगला बसलेला असून तो एक चांगला यशस्वी डॉक्टर मानला जात असतो. फिलिपाईन्समधील महान नेत्यावर उपचार करण्यासाठी म्हणून या डॉक्टरला फिलिपाईन्समध्ये मोठ्या इतमामाने आमंत्रण येते. (जोसे यांनी मारकोस यांचे व्यक्तिचित्र या महान नेत्याच्या रूपाने उभे केले आहे.) या महान नेत्याची कातडी पांढरी फटक पडत जाते. बघणारास घृणा यावी या पद्धतीने. या महान नेत्याच्या शरीराच्या गुप्त भागापासून या रोगास सुरवात होऊन, तो शरीराच्या इतर भागात पसरत जातो. डॉक्टर फिलिपाईन्स येथे आल्यानंतर त्यांची शाही बडदास्त ठेवण्यात येते. त्यांचे कौतुकही सर्वत्र होते. तो त्या नेत्यावर उपचार करीत असतो तोवर त्यास भरपूर पैसेही देण्यात येतात. या महान नेत्याच्या मगरमिठीतून सुटण्याच्या प्रयत्नात हा डॉक्टर असतो. अमेरिकेस पळून जाण्याचा त्याचा विचारही पक्का होतो. त्याचवेळी आणखी एक घटना घडते. त्याची प्रेयसी म्हणून एका तरूण स्त्रीची 'सरकारी' नेमणूक झालेली असते. या तरुणीला या डॉक्टरच्या कातडीवर, त्या महान नेत्याच्या कातडीवर जसे घृणास्पद पांढरे डाग होते, त्या प्रकारचा पहिला डाग आढळतो.

जोसे यांचे लिखाण एकीकडे चालू असताना ते जवळजवळ गेली तीस वर्षे सॉलिडेरिरी या मासिकाचे संपादन करीत आहेत. या मासिकात ललित साहित्य,

वार्तापत्रे, फिलिपाईन्सचे धोरण काय असावे आणि आशियाई खंडातील देशांनी कोणत्या क्षेत्रात कोठचे धोरण ठेवावे, यासंबंधी विश्लेषणात्मक लेख इत्यादी साहित्य प्रसिद्ध होते. या मासिकाला कॉंग्रेस फॉर कल्चरल फ्रिडम या संस्थेची मदत होती. ही संघटना, सी.आय.ए. या अमेरिकन गुप्त पोलिसांच्या खात्यानेच उभारलेली एक आघाडी होती. हेही सर्वश्रुतच आहे. १९६० साली एका वृत्तपत्रातील लेखात, जोसे हे सी.आय.ए. एजंट आहेत असा आरोप करण्यात आला. जोसे यांनी असे लिहिणाऱ्या लेखकावर अब्रुनुकसानीचा खटला भरला आणि तो जिंकला. या सर्व घडामोडींचा एक महत्त्वाचा परिणाम असा झाला की त्यांच्या पुस्तकांच्या दुकानात येणाऱ्या माणसांची वर्दळ वाढली. आता एकसारखी त्यांच्या दुकानात माणसे येतच असतात, पुस्तके खरेदी करण्यासाठी नाही, अमेरिकन व्हिसा मिळविण्यात जोसे यांची मदत घेण्यासाठी. जोसे यांनी आजवर जपान, सिंगापूर आणि श्रीलंका या देशातून वास्तव्य केलेले आहे. जोसे, आशियाखंडातील लेखक आणि सुधारक या दोघांचे एक प्रकारे केंद्र बनले आहेत. त्यांच्या पुस्तकांच्या दुकानाचे नांव सोलिदारीदाद. मॅनिला शहरात प्रख्यात असलेले हे केंद्र. बौद्धिक क्षेत्रातील सर्व प्रकारच्या चळवळीसाठी, इमारतीच्या तळमजल्यावर फिलिपाईन्समध्ये आणि परदेशातही प्रसिद्ध झालेली पुस्तके विकण्याची व्यवस्था आहे. पहिल्या मजल्यावर ते भोजन करतात आणि आपल्या मित्रांचे आगत स्वागत करतात. मार्कोस गेल्यानंतर कोराझोन आक्वीनो या सत्तेवर आल्या. या नव्या राजवटीचे दिवस आशादायक आहेत असे वाटणे हेही स्वाभाविकच होते. या काळात जोसे यांनी एक परिसंवाद आयोजित केला. त्या परिसंवादात झालेल्या चर्चेतून एक ग्रंथ तयार केला गेला. 'फिलीपीनो अजेंडा फॉर दि ट्वेन्टीफर्स्ट सेंचुरी' (एकविसाव्या शतकासाठी फिलीपीनो कार्यक्रम-पत्रिका) आर्थिक आणि सैनिकी धोरणातील जवळ जवळ प्रत्येक अंगाबद्दल या कार्यक्रमपत्रिकेत सूचना आहेत.

कथा, संविधानाचा सारांश आणि सुधारणा संबंधीच्या योजना, या स्वरूपात जोसे यांच्या साहित्याचा सारांश काढला तर त्यांचे वाङ्मय एकतर प्रचारी आहे असे वाटेल किंवा फारच गंभीर प्रकृतीचे आहे असा समज होईल. या दोहोंपैकी एकही निदान त्यांच्या लिखाणाला लागू पडणार नाही. त्यांनी इंग्रजीत लिहिण्याचा निर्णय घेतला. ही काही त्यांची मातृभाषा नाही. म्हणूनच त्यांना वाक्यरचनेबाबत स्वातंत्र्य घेता येते. असंभाव्य असे शद्ब वापरता येतात, याच कारणामुळे त्यांच्या लिखाणात अनेकवेळा एक प्रकारचा खेळकरपणा असतो. कदाचित्, नव्हे बहुतकरून, त्यांचे स्वतःचे जे व्यक्तिमत्व आहे, त्याच्याशी या खेळकरपणाचा अधिक जवळचा संबंध असावा.

जोसे हे तसे ठेंगू, गुबगुबीत, जवळ जवळ पार टक्कल असलेले सहासष्ट वर्षांचे गृहस्थ आहेत. ते चांगल्याच ढगळ अशा अर्ध्या चड्डया व बास्केट-बॉल खेळणारे खेळाडू ज्या प्रकारचे टी-शर्टस घालतात तसे टी-शर्टस घालतात. हे त्यांचे

रूप पाहून आग्नेय आशियातील सर्वसामान्य चिनी दुकानदार ते आहेत, असेच कोणास वाटावे. मी त्यांना जेव्हा जेव्हा पाहातो, त्या त्या वेळी मला एखाद्या लहान मुलाची आठवण येते. लहान मुले आपल्या शरीरास जसे झटके देतात, तसेच ते आपल्या शरीरास देतात. कोठल्याही प्रकारचा इषारा न देता लहान मूल जसे निःसंकोचपणे आपल्या शारीरिक हालचालीत बदल करते, तेही तशाच प्रकारचा बदल करतात. मी गेल्या उन्हाळयात त्यांच्याबरोबर पाच दिवस प्रवास केला. आमच्याबरोबर सोव्हियट ॲकॅडमीचा एक तरूण प्राध्यापक होता. जोसे स्वतः गाडी हाकीत होते. जोसे यांचे तरूणपण ज्या ठिकाणी गेले, ती ठिकाणे पाहाण्यासाठी ही सफर होती. आम्ही सारे एका रेल्वे यार्डातून गेलो. दुसरे महायुद्ध चालू असताना या ठिकाणी जपानी सैनिकांनी सतरा वर्षाच्या जोसेना कैद करून ठेवले होते. तेव्हा ते म्हणाले, 'मी इतका भ्यालो होतो.' हे सांगताना त्यांचा चेहरा, दहा वर्षाच्या मुलासारखा घाबराघुबरा झाला. ते पुढे म्हणाले 'मी तेव्हा अगदी छोटा आणि लुकडा होतो.' आणि त्यानंतर, आपल्या गरगरीत पोटावर थाप देत ते हसले 'हो हो'ही .... हो .... गाडी आणखी काही मैल गेल्यानंतर आम्ही हरएक ठिकाणी थांबत होतो. जोसे यांना उसाच्या रसापासून तयार होणारी बर्फी कशी लागते, त्या भागात मिळणारे पक्षी भाजल्यानंतर चवीला कसे लागतात अथवा इतर कांही स्थानिक खास पदार्थ चवीला कसे लागतात हे पहावयाचे होते. ते पदार्थ आपल्या तरूणपणी जितके चवदार होते तसेच अजूनही आहेत का? हे नक्की करायचे होते. संकल्पित जेवणात काय काय पदार्थ असावेत याचे नियोजन ते जेव्हा करीत नसत, तेव्हा ते आजूबाजूच्या स्त्रियांकडे स्वप्नाळू नजरेने पाहात. 'अहा, जिम, मी तुला सांगतो, डोळे कधीही कंटाळत नाहीत' असे ते, एका उपहारगृहात चार अत्यंत देखण्या तरुणी आमच्या टेबलाजवळून गेल्यानंतर म्हणाले, 'अंगातला जोर कमी होतो .... 'होहोहो...हो..' सरतेशेवटी मी त्यांना विचारले, 'हे तुमचे उद्योग पाहून तुमच्या पत्नीला काय वाटते?' त्यांच्या पत्नीचे नाव टेस्सी. तिच्याशी ४२ वर्षापूर्वी विवाह केला. मॅनिलातील सॅन्टोटोमास या विद्यापीठात ते दोघेही विद्यार्थी म्हणून होते. त्यांच्या कादंबऱ्यांना तरूण स्त्रियांची अगदी आसुसलेली व दर्दभरी अशी जी वर्णने येतात, त्याबद्दल टेस्सीचे मत काय आहे? असेही मी त्यांना विचारले. 'तिला माहीत आहे की मी तिचा बंदा आहे' असे सांगताना ते क्षणभर गंभीर झाले. 'ती माझ्या या असल्या उंडगेगिरीकडे क्षमाशीलतेने पाहाते' हे शब्द उच्चारताना पुन्हा एकदा हास्याचा प्रचंड धबधबा. माझ्या मनात असा विचार येऊन गेला की राबलेस (Rabelais) बरोबर प्रवास करताना, असेच काहीतरी घडत असले पाहिजे.

अशा प्रकारे जोसे यांच्या सहवासात, प्रवास करीत, अनेक दिवस घालविल्यानंतर माझ्या एक मुद्दा लक्षात आला. फिलिपाईन्समधील जोसे यांच्या वाचकांच्या लक्षात तो मुद्दा झटकन आला असणार. जोसे हे वैशिष्ट्यपूर्ण ठरण्याचे कारण, त्यांच्या अंगी असलेले गुण व लकबी. त्यांच्या लिखाणातून व त्यांच्या

सार्वजनिक जीवनातून ते सारे व्यक्त होतात. हे गुण व लकबी हे ते फिलिपिनो आहेत म्हणून त्यांच्या अंगी आलेले नाहीत. त्याचे खरे कारण ते 'इलोकोनो' आहेत हे आहे.

फिलिपाईन्स हे राष्ट्र अनेक बेटं एकत्र येऊन तयार झालेले आहे. त्यातले लुझान नावांचे बेट हे फिलिपाईन्सचे प्रमुख व सर्वात मोठे बेट. या बेटाचे डोके Tomahawk सारखे आहे. या बेटाच्या वायव्येच्या टोकाला जो भाग आहे तो कॅलीफोर्नियातील 'बिग-सूर' भागासारखा आहे. फक्त त्यात झाडे नाहीत असे समजावयाचे. चांगलाच चढ असलेले डोंगर आणि पश्चिमेकडे समुद्र अशा चिंचोळ्या पट्टीत वसलेल्या प्रदेशास इंग्रजीत 'इलोओस' हे नाव आहे. (महाराष्ट्रातल्या कोकणासारखा हा प्रदेश) स्पेनचे फिलिपाईन्सवर काही शतके राज्य होते. या काळात सर्व फिलिपाईन्सचे, अनेक प्रचंड मळे असलेला प्रदेश, असे रूपांतर होत होते. ही मळेजमीन वेठबिगार आणि गुलाम कसणार होते. परंतु या अशा प्रचंड प्रमाणावर, एखाद्या कारखान्याप्रमाणे शेतीउत्पादनाच्या दृष्टीने 'इलोओस' या विभागातील जमीन तशी सोइस्कर नव्हती. या विभागात ख्रिश्चन धर्मातील कॅथलिक पंथीयांनी प्रचंड वाडे बांधले. विशेषतः त्या पंथात ऑगस्टीनिअन या मठाचे जे अधिकारी होते त्यांनी इलोओस विभागातील रहिवाशांना ख्रिश्चन धर्माची (कॅथलिक) दीक्षा दिली. या सर्वांचा परिणाम आजही पाहावयास मिळतो. अखिल फिलिपाईन्समध्ये आजही इलोओस हा एकच विभाग असा आहे की, त्यात छोटे शेतकरी आपल्या स्वतःच्या जमिनी कसतात. इतर अनेक राष्ट्रांप्रमाणे फिलिपाईन्समध्येही वेगवेगळ्या विभागात, निरनिराळ्या प्रवृत्तीचे लोक राहातात. त्या प्रत्येकाचे काही स्थानिक, काही त्यांच्या टोळीची (ट्राईब्स) वैशिष्ट्ये असतात. तशीच फिलिपाईन्समध्येही आहेत. उदा. इमेल्डा मारकोस यांचेच उदाहरण घ्या. 'विसायन बेटे' या भागातून त्या आलेल्या आहेत. या भागातले लोक दाखवेगिरी करणारे, मिरवणारे, आणि उधळे असतात. इमेल्डा आपल्या भावी आयुष्यात ह्या 'छापाशी' इमान ठेवून वागली. खुद्द अमेरिकेतही अशा समजुती प्रचलित आहेत. उदा. लिंडन जॉनसन हे अमेरिकेचे अध्यक्ष, हे टेक्सास राज्यातून आलेले असल्याकारणाने, एखाद्या टेक्सनची जी प्रकृती असणार तशीच त्यांची होती. व त्याप्रमाणेच त्यांनी सर्व आयुष्यभर वर्तन केले असा सामान्य अमेरिकन माणसाचा ग्रह आहे. फिलिपाईन्स जीवनात प्रख्यात असलेले, फर्डीनांड मारकोस, फ्रान्की जोसे आणि इतर अनेक हे सारे 'इलोओस' या विभागात जन्माला आलेले व तेथे आयुष्यातील सुरुवातीचा काळ घालविलेले लोक. 'इलोओस' विभागावर पुढील प्रकारचा 'छाप' पडलेला आहे. या विभागातील लोक काटकसरी, आपल्या टोळीतील सभासदांशी निष्ठा ठेवणारे, पोलादी निश्चयाचे, आणि अथक श्रम करण्याकरता प्रसिद्ध आहेत. (फिलिपाईन्सचे भूतपूर्व अध्यक्ष फर्डीनांड मारकोस यांना काटकसरी कोण म्हणेल. परंतु इलोओसमधील रहिवाश्यांच्या मते त्यांच्या पत्नीने इमेल्डा मारकोसने त्यांना कुमार्गाला लावले!)

एखाद्या मानवी समूहावर अशा प्रकारे 'छाप' मारणे, हे कदाचित बरोबर असेल अथवा साफ चूकही असेल. इतर एथनिकस (एथनिक हा शब्द, वर्ण, टोळी समूह, सांस्कृतिक गट, इत्यादी तितक्याशा स्पष्ट नसलेल्या पण त्याचबरोबर एखाद्या राष्ट्रातल्या रहिवाश्यांना भावणाऱ्या गोष्टी यासाठी वापरण्यात येतो) संदर्भ सर्वसामान्य स्वरूपाचे जे निष्कर्ष असतात त्या सारखेच हे आहे. फिलिपाईन्सच्या संस्कृतीच्या संदर्भात, इलोओनो हा वारसा, 'आपण यशस्वी होणारच' अशी भावना व्यक्त करतो. अखेर फिलिपाईन्सचा विचार करता, हे सारे पराभव आणि आपणास कोणी तरी बळीचा बकरा करीत आहे, अशा भावनेने ग्रासलेले आहे. ह्या ज्या प्रतिमा आहेत, त्यांना अपवाद फक्त इलोओनोज आणि चिनी-फिलीपिनो हे एथनकिस. आपण एखाद्या यशस्वी व कार्यक्षम गटाचे सदस्य आहोत की नाही याचा त्या गटातील सदस्यांच्या वागणुकीवर फारच सामर्थ्यशाली असा प्रभाव पडतो. सर्वच आशिया खंडाच्या बाबतीत हे खरे असावेसे वाटते. उदा. मलेशियामध्ये, मलाय या एथनिकसनी एक सिद्धांत बसविलेला आहे. या सिद्धांतानुसार ते असे सिद्ध करतात की आर्थिक आणि शैक्षणिक अशा प्रकारच्या चढाओढीच्या बाबतीत चायनिझ-मायलेसियन गटाबरोबर त्यांना स्पर्धा करणे केवळ अशक्य आहे. अनेक मलेशियन आणि फिलीपीनो चायनिझ, कोरियन आणि सर्वसामान्यपणे जपानी या सर्व लोकांना अशी शिकवण देण्यात येते की त्यांनी प्रयत्न केला तर ते नक्की यशस्वी होतील, हे त्यांनी गृहीत धरावे. एथनिकस् या संघटनेत अनस्यूत असलेल्या धूसर अशा सांस्कृतिक घटनांच्या मदतीने महत्त्वाचे निष्कर्ष कोणी काढू नयेत हे खरे. परंतु जोसे यांच्या व्यक्तिमत्वात जे घटक एकत्रित आले आहेत, त्यांच्या मदतीने आपल्या राष्ट्राचे दुःख व विपन्नावस्था या दोहोंबद्दल पूर्णतः संवेदनाक्षम बनण्यास मदत झाली आहे हेही तितकेच खरे. हे सारे उद्योग करीत असताना, ते आपल्या लिखाणातल्या पात्रांच्या वागणुकीप्रमाणे, भ्रष्टाचाराला अथवा अगतिकतेला शरण जात नाहीत.

जोसे यांचा आपल्या देशाबद्दल जो दृष्टीकोन आहे, त्यात कणभरही आत्मसंतुष्टतेची अथवा श्रेष्ठत्वाची भावना नाही. इलोओसहून दक्षिणेकडे मनिलाच्या दिशेन मोटारगाडीतून चाललो होतो. वाटेत, आम्हाला लिगायेन बीचचा किनारा लागला. याच किनाऱ्यावर दुसऱ्या महायुद्धाच्यावेळी डग्लस मॅकआरथरही उतरले होते. जपान्यांनी शरणागती पत्करल्यानंतर, महाप्रचंड व बलाढ्य अशा अमेरिकन आरमाराने, आपल्याकडे असलेला सारा बॉंबसाठा समुद्रात फेकून दिला. अमेरिकन आरमाराने तेथून आपला तळ हलविल्याबरोबर फिलिपोनी कोळ्यांनी हे बॉंब हस्तगत करण्यासाठी पाण्यात बुड्या मारण्यास सुरवात केली. त्यामागे हेतू असा होता की, या बॉंबमध्ये जी स्फोटक रासायनिक द्रव्ये होती ती मासेमारी करताना वापरावयाची. पाण्याखाली बॉंबचा स्फोट झाला की मासे मरतात. हे मेलेले मासे, मग गोळा करायचे. अशा प्रकारे मासे मारणे व ते गोळा करणे, हे त्या कोळ्यांच्या नेहमीच्या सवयीचे. हे बॉंब जमा करताना अगणीत कोळी व त्यांची कुटुंबे मृत्युमुखी



अनुक्रमणिका

पडली. बॉबमधील रासायनिक द्रव्य नीट काढता आले नाही, तर त्याचा स्फोट होऊन आजूबाजूची सर्व माणसे मृत्युमुखी पडत. परंतु जेव्हा त्यातील रासायनिक द्रव्य कोणताही धोका उत्पन्न होऊ न देता, अलग करण्यात येई, तेव्हां त्याचा वापर करून, समुद्रात सारे खडक भुगा होतील अशा प्रकारे, या रसायनांनी भाजून काढले. जोसे यांनी ही गोष्ट सांगितली, निश्वास टाकला आणि 'ते इतके गरीब आहेत' हा आपला एकमेव निष्कर्ष काढला. या सफरीच्या सुरुवातीला आम्ही एका उपहारगृहात बसलो होतो. जोसे यांच्या मते त्या उपहारगृहाच्या मालकाला जाणवत नव्हते, इतक्या चांगल्या प्रकारे ते चालविता येईल. ''या उपहारगृहाच्या प्रवेशदारात, थोड्या फुलांच्या कुंड्या का ठेवित नाही? आणि या उपहारगृहाच्या जमिनीचा चांगला केर का काढीत नाही'' असे जोसे यांनी आपले बिल चुकते करताना मालकाला विचारले. 'या अशा जागेत काय काय करणे शक्य आहे!' असे ते पुढे म्हणाले.

आम्ही जेव्हा मनिलाला परत आलो, तेव्हा आमच्यासाठी वाईट बातमी वाट पाहात होती. ते अपेक्षितच होते. फिलिपाईन्सची अर्थव्यवस्था आणखी ढासळली होती. फिलिपाईन्स सरकारच्या विमान कंपनीचे पेट्रोल संपले होते. आक्वीनोविरोधी उठाव होणार या तर अफवा पूर्वीही एक सारख्या उठतच असत. त्या आता अधिक अधिक जोर धरू लागल्या. 'हे बघा तुम्हाला माहीत आहेच, या देशाला काहीही आशा नाही, या निष्कर्षाप्रत मी आलेलो आहे.' असे ते आपल्या घराबाहेर, आमची सफर संपता संपता म्हणाले. अर्थात हे अशा अर्थाचे विधान, ते प्रथमच करीत नव्हते. त्यांनी या पूर्वीही हे विचार मला अनेकवेळां बोलून दाखविले होते. 'युद्ध संपले, त्यावेळी सर्व आशियाखंडातील लोक आमचा हेवा करीत होते. उदा. कोरिया – तो आमची बरोबरी कधीच करणे शक्य नव्हता. टोकियो – स्वस्त वैश्या पैदा करण्याचे ते ठिकाण. आज आता आमच्याकडे पाहा'. विचार करीत ते क्षणभर थांबले. त्यांची पत्नी त्यांच्या दृष्टीस पडली. त्यांचा चेहरा उजळला. थोड्या वेळांनी ते उठून घरात गेले. आणि आपल्या कामाला पुन्हा एकदा त्यांनी सुरुवात केली.

**जेम्स फॅमोन**
यांच्या एका लेखावरून

---

लेखन म्हणजे मुख्यतः माझी करमणूक. (त्यामुळे होणारी) इतरांची करमणूक माझ्या दृष्टीने दुय्यमच.

*– जॉन मॅकडोनाल्ड*

---



अनुक्रमणिका

# डोस्टोएव्हस्कीचा कारावास
श्रीकृष्ण कामत

**२२ एप्रिल १८४९**

'थर्ड सेक्शन' चा (गुप्तचर विभाग) प्रमुख काऊंट आर्लोव याजकडून मेजर चुदिनोव याजकडे एक गुप्त खलिता रवाना झाला. त्यात निवृत्त लेफ्टनंट इंजिनियर आणि लेखक फ्योडोर मिखाइलोविच डोस्टोएवस्की यास पीटर्सबर्ग येथील त्याच्या राहात्या खोलीवर २३ एप्रिल रोजी पहाटे चार वाजता अटक करण्याचा हुकूम फर्मावण्यात आला होता. त्याच फर्मानात पुढील सूचना होत्या. "डोस्टोएवस्कीची सर्व पुस्तकं आणि कागदपत्रं ताब्यात घेऊन ती सीलबंद करावीत. काही पुस्तकं आणि कागदपत्रं दुसऱ्यांची आहेत यास्तव ती घेऊन न जाण्याची विनंती त्यानं केल्यास ती तात्काळ फेटाळून लावावी."

संध्याकाळी डोस्टोएवस्की पेत्राशेवस्कीकडे जाण्यासाठी घराबाहेर पडला. अचानक पाऊस कोसळू लागला. डोस्टोएवस्की भिजून चिंब झाला. वाटेत त्यानं आपला डॉक्टर यानोवस्की याचं घर गाठलं. तिथं त्यानं कपडे बदलले. भाडोत्री वाहनामधून जाण्यासाठी त्यानं डॉक्टरकडून थोडे पैसे घेतले आणि तो इच्छित स्थळी पोचला. तिथून तो घरी परतला तेव्हा मध्यरात्र उलटून गेली होती.

**२३ एप्रिल १८४९**

पहाटे चार वाजता डोस्टोएवस्कीच्या कानी शब्द पडले : 'उठा महाशय!' त्याला जाग आली. त्यानं अंधुक उजेडात पाहिलं. दारापाशी एक खड्गधारी रक्षक, एक स्थानिक पोलिस अधिकारी आणि गुप्तचर विभागाचा एक निळया गणवेषातील वरिष्ठ अधिकारी. डोस्टोएवस्की उठला. थरथरत्या बोटांनी त्यानं कपडे अंगावर चढवले. पोलिसांच्या या अवचित आगमनाचा त्याला काही अर्थबोध होत नव्हता. या आगंतुकांच्या हालचाली तो निमूट न्याहाळीत राहिला.

पोलिसांनी त्याच्या खोलीची कसून झडती घेतली. सर्व पुस्तकं आणि कागदपत्रं जप्त केली. त्यांना देण्यात आलेल्या सर्व सूचनांची त्यांनी काटेकोरपणे अंमलबजावणी केली. आपले कामकाज आटोपल्यानंतर त्यांनी डोस्टोएवस्कीला आपल्यासंगे बाहेर पडण्यास फर्मावले. त्याबरहुकूम त्यांच्यासंगे तो बाहेर पडला, रस्त्यावर उभ्या असलेल्या बग्गीमध्ये जाऊन बसला. बग्गी धावू लागली. अखेर 'थर्ड सेक्शन' च्या ठाण्यावर येऊन उभी राहिली. डोस्टोएवस्की बग्गीबाहेर पडला आणि त्यानं त्या इमारतीत पाऊल टाकलं.

दिवस उजाडता उजाडता एक एक करत बग्ग्या येत होत्या. त्यातून माणसं उतरत होती, इमारतीत शिरत होती. होता होता त्या प्रशस्त दालनात चाळीसएक माणसांची भर पडली. त्यातल्या प्रत्येकाच्या डोळयावर झोपेची झापड



अनुक्रमणिका

होती. या आकस्मिक अटकेनं प्रत्येकजण भांबावून गेला होता, गप्प होता. त्यातले बरेचसे एकमेकांच्या चांगल्या परिचयाचे होते.

अटक झालेल्यांना, का कुणास ठाऊक, चांगल वागवलं जात होतं. त्यांना चहा, कॉफी, ब्रेकफास्ट देण्यात आला. संध्याकाळी खास बनवलेलं भोजन, वर सिगार. जणू काही ही मंडळी 'थर्ड सेक्शन' चे पाहुणे असल्यागत त्यांचा पाहुणचार होत होता. फक्त एकमेकांशी बोलण्याची त्यांना मनाई होती.

दुपारी काऊंट ऑर्लोव्हने या 'पाहुण्यां' मधून फेरी मारली आणि एक छोटसं भाषण केलं. त्या भाषणाचा मथितार्थ असा होता : ''इथं या ठिकाणी जे जमलेले आहेत त्यांना रशियन नागरीक म्हणून प्रदान करण्यात आलेलं स्वातंत्र्य, हक्क, यांचा योग्य तऱ्हेनं वापर कसा करायचा हे दुर्देवानं ठाऊक नाहीये. त्यांच्या गुन्ह्यांची काळजीपूर्वक छाननी केल्यानंतर त्यांचा निवाडा करण्यात येईल. अंतिम निर्णय झारच्या दयाबुद्धीवर अवलंबून असेल.'' त्यानं कुठलेही आरोप केले नाहीत, त्यासंबंधीची पुसटती कल्पनाही दिली नाही.

दिवस मावळला. अकरा वाजले. प्रत्येकाचं नाव पुकारलं गेलं : पेत्राशेवस्की, डुरोव, डोस्टोएवस्की, स्पेशनेव..... नाव पुरकारलेला इसम बाहेरच्या आवारात उभ्या असलेल्या बग्गीत नेऊन बसवला जात होता. त्याच्या सोबतीला आत एक अधिकारी. सर्वजण बग्गीत जाऊन बसले. बग्ग्यांचे दरवाजे बंद करण्यात आले आणि बग्ग्यांच्या चाकांनी गती घेतली. बग्ग्या कुठं निघाल्या होत्या काळोखातून काही कळत नव्हतं.

अखेर बग्ग्या पीटर आणि पॉल किल्ल्याला जोडणारा छोटा पूल पार करून किल्ल्याच्या प्रवेशद्वारापाशी येऊन थडकल्या. कैदी बग्ग्यातून खाली उतरले. रक्षकाच्या खोलीत प्रत्येकाच्या अंगावर कैद्यांचे पोषाख चढवण्यात आले आणि त्यांना एकेका कोठडीत बंद करण्यात आलं.

नेव्हा बेटावर हा किल्ला थोर पीटरनं बांधला होता. किल्ल्यामधील तुरुंगही पीटरच्या कारकीर्दीत बांधण्यात आला. या तुरुंगात पीटरनं आपला मुलगा ॲलक्सिस याला डांबला होता, त्याचा छळ केला होता व अखेर शिरच्छेद केला होता. त्यानंतरच्या झारांनाही हा तुरुंग सोयिस्कर वाटत होता. ज्या बड्या उमरावांवर त्यांची मर्जी खफा होत असे त्यांची रवानगी या तुरुंगात केली जात असे. थोर कॅथरीननं ॲलेक्झांडर रॅडीश्चेवला सैबेरियात पाठवण्याआधी या तुरुंगात डांबलं होतं. त्याचा गुन्हा कोणता तर : 'जर्नी फ्रॉम सेंट पीटर्सबर्ग टु मॉस्को' या आपल्या ग्रंथामधून त्यानं रशियातील शेतमजुरांना भोगाव्या लागणाऱ्या अमानुष छळांना वाचा फोडली होती. १८२५ मध्ये 'डिसेंब्रिस्टां' चा उठाव निर्दयपणे चिरडून झारनं त्यांना इथल्या कोठड्यात खितपत ठेवून त्यानंतर त्यांची पाठवणी सैबेरियात केली होती. या तुरुंगाची उंचच उंच तटबंदी चढून जाण्यात अद्याप कुणालाही यश मिळालेलं नव्हतं. इथून बाहेर पडणारी माणसं तडक मसणात जात, नाहीतर थेट पागलखान्यात,

अशी या तुरुंगाची ख्याती होती.

आज इथल्या एका कोठडीत डोस्टोएवस्कीनं पाऊल टाकलं. सोबतीला कभिन्न काळोख आणि भयाण शांतता आणि जीवघेणा एकांत.

२४ एप्रिल १८४९

सूर्य उगवला, अस्त पावला. डोस्टोएवस्कीला कोठडी आणि कोठडीतला दिनक्रम परिचयाचा झाला.

कोठडी तशी फार छोटी नव्हती. थोड्याफार प्रमाणात मोकळ्या हालचाली करता येण्याइतपत लांबरुंद. उंच छत, घुमटाच्या आकाराचं. उंच जागी एक खिडकी. खिडकीला तावदान गच्च बसवलेलं. तावदानावरचा थोडासा भाग सोडून ते तेलकट पेस्टनं सारवलेलं. त्यातून झिरपणारा अंधुक प्रकाश. भिंतीवर आधीच्या कैद्यांनी काहीबाही गिरबटवून ठेवलेलं. कोठडीला भक्कम दार. दाराला एक छोटसं भोक. रक्षकाला अधूनमधून कैद्याच्या हालचालीवर पाळत ठेवण्यासाठी.

कोठडीत एक कॉट, एक स्टोव्ह, एक टेबल, एक स्टूल, कोपऱ्यात बेसिन आणि मलमूत्रविसर्जनासाठी एक झाकणबंद स्टूल. कॉटवर एक गादी. गवत भरलेली एक उशी, कव्हराविना. लष्करातल्या जवानांच्या ओव्हरकोटसाठी वापरण्यात येणाऱ्या वुलनचं जाडभरडं ब्लँकेट.

दिवसा कोठडीच्या दरवाजाची पाच वेळा उघडझाप. तेवढ्याच वेळा रक्षकाचं आगमन-निर्गमन. सात-आठच्या सुमारास पाणी आणणे, शौचाची भांडी रिकामी करणे, दहा-अकराला कमांडर वा त्याच्या हाताखालच्या अधिकाऱ्याची फेरी. दुपारी बाराला जेवण. संध्याकाळी सातला रात्रीचे जेवण. पाणीपचकवणी सूप आणि उकडलेलं मांस. पाव हवे तेवढे. दिवेलागणीला दिवली पेटवणं. दिवलीच्या उजेडापेक्षा धूरच अधिक.

आणि त्यानंतर कधीतरी झोपी जाणं.

दिवसभराची शांतता भंग पावत असे ती दर पंधरा मिनिटांनी होणाऱ्या चर्चच्या टोल्यांनी.

२६ एप्रिल १८४९

२३ एप्रिल रोजी अटक करण्यात आलेल्यांचा निवाडा करण्यासाठी एव्हाना एक चौकशीसमिती नेमण्यात आली होती. आज डोस्टोएवस्कीला या समितीपुढं हजर करण्यात आलं. त्याचं शिक्षण, उत्पन्न, व्यवसाय, ओळखी-पाळखी, पेत्राशेवस्की आणि त्याच्या वर्तुळातील इतर सदस्य यांच्याशी असलेले संबंध, तिथल्या चर्चा इत्यादी संबंधीचे प्रश्न या प्राथमिक चाचणीत त्याला विचारण्यात आले. त्यानं हातचं राखून उत्तरं दिली.

सिनेटर लेबेडेवनं एप्रिल अखेरीस आपल्या डायरीत नमूद केलं : "काही

तरुणांची (पेत्रारोवस्की, गोलोवन्स्की, डोस्टोएवस्की, पाम, लामान्स्की, ग्रिगोरीएव, मिखाइलोव आणि इतर बरेच) अटक हाच पीटर्सबर्गमध्ये सर्वत्र चर्चेचा विषय झाला आहे. असं सांगतात, अटक झालेल्यांची संख्या साठ आहे आणि ही संख्या, मॉस्को आणि इतर शहरातील धागेदोरे उघडकीला आल्यानंतर वाढण्याची शक्यता आहे. हे प्रकरण महत्त्वपूर्ण ठरण्याची शक्यता आहे. आतापर्यंत जे काही कळून आलंय -- अर्थात् जे काही कळून आलंय ते तसं जुजबीच आहे – ते असं – पेत्राशेवस्कीच्या घरी चर्चा, वादविवाद करण्याची आवड असणारे जमत असत. काही वेळेला शेतमजुरांचा प्रश्न चर्चेसाठी घेतला जाई. काही वेळा सरकारच्या नानाविध खात्यातील सुधारणांविषयी चर्चा होई, काही वेळेला पाश्चात्य देशातील घडामोडींशी आपले नाते काय हा प्रश्न विचारात घेतला जाई. वक्ते आपल्याला बोलावयाचे असल्यास आपले नाव व विषय आगावू लिहून कळवत. या बैठकांचं स्वरूप अलिकडे काहीसे राजकीय झाले होते.''

या काळात रशियन विचारवंत पाश्चात्यांच्या पुरोगामी विचारसरणीने प्रभावित झाले होते. जुलुमी सरंजामशाही नेस्तनाबूत करावी, शेतमजुरांना गुलामगिरीच्या जोखडातून मुक्त करावं, धार्मिक अवडंबरांना मूठमाती देऊन चर्चचं वर्चस्व झुगारून द्यावं आणि रशिया हे लोकाभिमुख प्रगत राष्ट्र बनवावं यासाठी काही ग्रुप कार्यरत होते. १८२५ मध्ये 'डिसेंब्रिस्ट' चा उठाव चिरडून टाकण्यात आला असला तरी त्या चळवळीच्या प्रेरणा पुढील पिढीला मार्गदर्शक ठरत होत्या. १८३० च्या सुमारास फ्रांसमध्ये ज्या समाजवादी तत्त्वप्रणाली मूळ धरू लागल्या होत्या त्या या नवीन पिढीला प्रेरक वाटत होत्या.

शेतमजुरांवर जो अनन्वित अत्याचार केला जात असे तो डोस्टोएवस्कीनं प्रत्यक्ष पाहिलेला होता. तो छळ पाहून त्याच्या जीवाची तगमग होत होती. तशात व्हिक्टर ह्युगो, जॉर्ज सँड आदी लेखकांच्या पुरोगामी, मानवतावादी लिखाणानं तो प्रभावित झाला होता. ही पुस्तके सेन्सॉरचे कडक निर्बंध असूनही फ्रांसमधून रशियात येत होती. शिवाय गोगोलच्या 'द ओव्हरकोट' व 'डेड सोल्स' या साहित्यकृतींनी रशियन साहित्याला एक नवीन दिशा दिली होती. ''या साहित्यकृती म्हणजे मानवजातीबद्दलचे प्रेम, सामाजिक भान दाखवणारी उत्कृष्ट एतद्देशीय उदाहरणे आहेत'', या शब्दात नामवंत समीक्षक बेलिन्स्की यानं प्रशंसा केली होती. १८४० च्या प्रारंभी रशियातील सामाजिक-सांस्कृतिक हवामान रोमँटिकतेकडून सामाजिक वास्तवाकडे सरकले होते. अशा या वातावरणात डोस्टोएवस्कीची वाङ्मयीन जडणघडण होत होती. साहित्यिक चळवळी, सामाजिक-राजकीय तत्त्वप्रणालीचे प्रवाह यात तो सहभागी झाला. या काळात त्याचा आदर्श होता बेलिन्स्की. एक विचक्षण समीक्षक, समाजवादाचा खंदा पुरस्कर्ता, युरोपमधील प्रगतशील राष्ट्राबरहुकूम रशियाची पुनर्उभारणी करण्याचा ध्यास घेतलेला निर्भिड विचारवंत! कादंबरीकार तुर्जेनोव्ह, कवी नेक्रेसोव आदी उदयोन्मुख लेखक, तद्वतच राजकीय-सामाजिक सुधारणेचा

वसा घेतलेले तरूण बेलिन्स्कीच्या भोवती गोळा झाले होते.

बेलिन्स्कीच्या लेखी समाजवाद हा श्रद्धा आणि ज्ञान यांचा प्रारंभ होता आणि इतिश्रीही. त्याच्या राजकीय-सामाजिक विचारसरणीच्या केंद्रस्थानी माणूस होता. प्रत्येक व्यक्तीची उन्नती या जन्मातच, याच भूतलावर व्हायला हवी. मरणोत्तर सुखी जीवनाचं धर्मानं दाखवलेलं आमिष हे एक थोतांड आहे अशी त्याची धारणा होती. लोक मूर्ख असतात, त्यांना इडनच्या नंदनवनात जबरदस्तीनं न्यावं लागतं याचं भान त्याला होतं. एखाद्या छोट्याशा जनसमुदायाला सुखी करण्यासाठी इतरेजनांना कंठस्नान घालण्याची, बेचिराख करण्याची त्याची तयारी होती.

बेलिन्स्कीच्या वर्तुळात डोस्टोएवस्की १८४५ मध्ये सामील झाला. या वर्षी बेलिन्स्कीनं त्याच्या 'पुअर फोक' या कादंबरीचं हस्तलिखित वाचून त्या कादंबरीची आणि कादंबरीकाराची मुक्तकंठानं प्रशंसा केली होती, त्याची ओळखदेख नसतानाही बेलिन्स्कीनं भाकीत केलं : "एक दिवस असा येईल जेव्हा डोस्टोएवस्की प्रसिद्धीच्या शिखरावर पोचला असेल, तेव्हा त्याचे साहित्यिक प्रतिस्पर्धी, ज्यांचे साहित्यिक कर्तृत्व या घटकेला डोस्टोएवस्कीच्या बरोबरीचे समजले जाते, ते विस्मृतीत गेलेले असतील. 'पुअर फोक' म्हणजे सामाजिक कादंबरीच्या दिशेनं टाकलेलं पहिलं पाऊल."

बेलिन्स्कीच्या गौरवोद्गारामुळे डोस्टोएवस्कीला साहित्यिक वर्तुळात मान्यता लाभली. त्याचा सहवास लाभावा, त्याच्याशी संभाषण करण्याची संधी मिळावी म्हणून उच्च वर्गातील लोकही धडपडू लागले. एक 'आश्चर्य' म्हणून त्याच्याकडे पाहण्यात येऊ लागलं. बेलिन्स्कीच्या प्रशंसेनं वयाच्या अवघ्या चोविसाव्या वर्षी त्याला आणि त्याच्या या पहिल्यावहिल्या साहित्यिककृतीला अश्रुतपूर्व प्रसिद्धी लाभली होती. बेलिन्स्कीला त्यानं गुरूस्थानी मानलं, मनाशी निश्चय केला, त्याच्याशी एकनिष्ठ राहायचं. पण विधिलिखित वेगळं होतं.

१८४६ मध्ये 'पुअर फोक' पुस्तकरूपानं प्रसिद्ध झाली. त्या पाठोपाठ त्याची दुसरी कादंबरी 'द डबल' प्रकाशित झाली. तिचं थंड स्वागत झालं. बेलिन्स्कीनंही तिला निकृष्ट साहित्यकृती ठरवली. ज्यानं तो 'प्रतिभावंत' असल्याची ग्वाही दिली होती त्यानंच आता आपल्याला कमी लेखावं ही गोष्ट डोस्टोएवस्कीला अतिशय झोंबली. तशात त्याच्या वर्तुळात डोस्टोएवस्की टिंगलटवाळीचा विषय बनला. साहित्याच्या नाकावर चमकणारी एक तारुण्यपीटिका अशा शब्दात त्याची कुचेष्टा करण्यात येऊ लागली. त्यानं ग्रह करून घेतला, या लोकांना आपला साहित्यिक मोठेपणा पाहावत नाही. त्याच्या आढ्यतेखोर वृत्तीनं हा ग्रह अधिक दृढ केला. शिवाय बेलिन्स्कीच्या निरीश्वरवादी भूमिकेवरून त्याच्याशी मतभेद होऊ लागले. अखेर त्या दोघांचे भांडण झाले आणि तो बेलिन्स्कीच्या वर्तुळातून बाहेर पडला, पेत्राशेवस्कीच्या वर्तुळात दाखल झाला, १८४७ च्या हिवाळ्यात.

पेत्राशेवस्कीवर फ्रेंच समाजवादाचा, विशेषतः फ्युरिएच्या युटोपिअन समाजवादाचा प्रभाव होता. डोस्टोएवस्कीला फ्युरिएझमची जेमतेम तोंडओळख होती. त्याचं

आकर्षण त्याला वाटलं याला कारणं होती. एक ''मानवीप्रवृत्तीमध्ये 'इव्हील' ची पाळमुळं नसतात या गृहीतावर तो आधारलेला होता. दोन : सुवर्णयुग येणार असल्याची त्यानं दिलेली आश्वासक ग्वाही. शिवाय बरेचसे फ्रेंच सुधारणावादी ख्रिस्ताचा उल्लेख आदरानं करत ही बाब त्याला विशेषत्वानं भावली. पेत्राशेवस्कीच्या खाजगी ग्रंथसंग्रहालयामधल्या एका पुस्तकात तर त्याच्या असं वाचनात आलं होतं की ख्रिस्ताची शिकवणही आजच्या क्रांतिकारक तत्त्वप्रणालीशी मिळतीजुळती आहे. तो भूतलावर अवतरणार आहे, त्याच्यावर कोर्ट-मार्शल होणार आहे.

पेत्राशेवस्की वर्तुळात दर शुक्रवारी बैठका होत. 'पोलिटिकल इकॉनॉमी' चा अध्यापक यारअझेम्बस्की, कवी प्लेश्चेव, लेखक, भाषांतरकार ड्युरोव, वकील गोलोवन्स्की, रशियन साहित्याचा अध्यापक टोल, लेफ्टनंट मोम्बेली, लेफ्टनंट ग्रिगोरेव, सशस्त्र क्रांतीचा पुरस्कर्ता स्पेशनेव, फिलिप्पॉव आदी समाजातील विविध स्तरातील बुद्धिवादी या बैठकांना आवर्जून हजर राहात. जे विषय वर्तमानपत्रांमधून चर्चिण्यास बंदी होती, अशा राजकीय, सामाजिक, सेन्सॉर, शेतमजूर, धर्म, कुटुंबसंस्था आदि विषयांवर वादविवाद होत. १८४८ मध्ये युरोपातील राजसत्ता कोलमडून पडत होत्या, नवीन हक्क मिळवले जात होते. परदेशातील या अभूतपूर्व विजयाच्या उत्साहवर्धक बातम्यांच्या संदर्भात चर्चा होत. साहित्य हा विषय अधूनमधून चर्चिला जात असे, पण या वर्तुळात साहित्याला तसं गौण स्थान होतं.

प्रत्यक्ष कृतीविना अशा चर्चा म्हणजे निव्वळ वाचाळता आहे असं मानणारी काही मंडळी या वर्तुळात होती. त्यांचा एक छोटा ग्रुप बनला. या गुप्त संघटनेचा म्होरक्या होता स्पेशनेव. डोस्टोएवस्की या ग्रुपमध्ये सामील झाला. एका बैठकीत स्पेशनेवनं प्रस्ताव मांडला; गुप्त छापखाना उभा करावा, शेतमजुरांना शेतमालकांविरुद्ध, राजसत्तेविरुद्ध उठाव करण्यास प्रवृत्त करतील अशी पत्रकं छापावीत व त्यांचा प्रसार करण्याची मोहीम हाती घ्यावी. या योजनेचं स्वागत झालं. फिलिप्पोवने डोस्टोएवस्कीच्या सहकार्यानं छापखान्यासाठी लागणारं सामान स्पेशनेवच्या खोलीवर आणून टाकलं.

पेत्राशेवस्कीच्या वर्तुळात काही सदस्य पाम-ड्युरोव यांच्या वर्तुळात हजेरी लावत. डोस्टोएवस्कीसुद्धा जात असे. तिथल्या चर्चेत सहभागी होत असे. एक दिवस त्यानं एक स्फोटक लिखाण ड्युरोवच्या घरी वाचून दाखवलं. ते एक लांबलचक पत्र होतं. जुलै १८४७ मध्ये बेलिन्स्कीनं गोगोल याला लिहिलेलं.

या पत्राला कारणीभूत झालं होतं गोगोलचं 'सिलेक्टेड पॅसेजिस फ्रॉम माय कॉरस्पॉंडन्स विथ फ्रेंड्स' हे पुस्तक. या पुस्तकानं बरीच खळबळ माजवली होती. रशियाची सांप्रतची समाजरचना, राजकीय यंत्रणा, शेतमजुरांची वेठबिगारीसुद्धा, ही ईश्वरदत्त व दोषमुक्त असल्याचे सांगून त्याची तरफदारी करण्यात आली होती. हे पुस्तक लिहिलं होतं हांजीखोर नम्रतेच्या सुरात, जो गोगोलच्या काही घनिष्ट मित्रांनाही तिरस्करणीय वाटला. शिवाय त्याच्याशी पत्रव्यवहार करणाऱ्यांनी आपलं

आयुष्य चांगल्या तऱ्हेनं कसं व्यतीत करावं यासंबंधी त्यानं दिलेला अनाहूत सल्लाही त्यांना खटकला होता.

गोगोलच्या पुस्तकानं बेलिन्स्की खवळून उठला. त्यानं गोगोलच्या 'डेड सोल्स' वर लेख लिहून त्या पुस्तकाची तोंडभरून स्तुती केली होती. पुरोगामी पाश्चात्यांच्या आदर्शांचे पडसाद ज्याच्या लिखाणातून उमटले होते त्याच गोगोलच्या लेखणीनं हुकूमशहा राज्यकर्त्यांवर शब्दसुमनं उधळावीत, सुसंस्कृत समाजाला लांच्छनास्पद असणाऱ्या शेतमजुरांच्या वेठबिगारीची तरफदारी करावी, चर्च व नोकरशाही यांचे गोडवे गावेत ही बाब बेलिन्स्कीच्या मनात तिडीक निर्माण करती झाली. त्यानं गोगोलला पत्र लिहिलं : 'लेटर टु गोगोल'. ४७ च्या जुलैमध्ये. त्यानंतर दहाएक महिन्यानी तो मृत्यू पावला होता. या पत्रात 'मानवतेचा द्रोही' या शब्दात गोगोलची संभावना केली. ज्यांची गोगोलनं भलामण केली होती, त्या राजसत्ता, शासनयंत्रणा, चर्च यावर त्यानं प्रखर झोड उठवली. त्यानं लिहिलं : राज्ययंत्रणेमध्ये चोर-दरोडेखोरांचा भरणा आहे. धर्माधिकारी हुकूमशहा राज्यकर्त्यांचे लांगूलचालन करणारे खुषमस्करे आहेत. ज्या ख्रिस्तानं मानवतेला स्वातंत्र्य, समता आणि बंधुत्व यांचे धडे दिले त्याच्याशी धर्मगुरूंचा काहीएक संबंध राहिलेला नाही. रशियन जनतेची निकड आहे राजकीय आणि सामाजिक सुधारणांची, ज्ञान संपादनाची. शेतमजुरांची मुक्तता करणं, फाशीची शिक्षा रद्द करणं यांना प्राधान्य मिळायला हवं, वगैरे वगैरे.

या पत्राच्या नकला सर्वत्र गुप्तपणे प्रसारित होत होत्या. या पत्राची एक प्रत मॉस्कोमधला डोस्टोएवस्कीचा घनिष्ट स्नेही प्लेश्चेव यानं डोस्टोएवस्कीला पाठवून दिली होती. डोस्टोएवस्कीनं ते पत्र प्रथम ड्युरोवच्या घरी वाचून दाखवलं आणि त्यानंतर १५ एप्रिल रोजी पेत्राशेवस्की वर्तुळात जाहीर वाचन केलं. एवढंच करून तो थांबला नाही, तर ज्यांना कुणाला त्या पत्राच्या नकला करायच्या होत्या त्यांच्या हाती ते पत्र दिलं. ते पत्र जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोचण्यासाठी ते छापण्याचाही त्याचा विचार होता.

पेत्राशेवस्की वर्तुळातील सदस्यांच्या हालचालींची माहिती निकोलसला मिळालेली होती. पेत्राशेवस्कीच्या घरच्या बैठकांवर वर्षभर त्यानं आपल्या माणसांकडून पाळत ठेवली होती. परंतु त्यांच्याविरुद्ध कारवाई करण्याइतपत सबळ पुरावा त्याच्या हाती लागला नव्हता. गुप्तचर खात्याकरवी या प्रकरणाचा छडा लावावा हे त्याला पसंत नव्हतं, कारण त्या खात्याच्या कामकाजाविषयी तो नाराज होता. या कामी त्यानं आता काऊंट ऑर्लोवची नेमणूक केली. ऑर्लोवनं ही कामगिरी लिप्रान्डीच्या हाती सोपवली. लागलीच लिप्रान्डीनं पेत्राशेवस्कीच्या फ्लॅटसमोर एक टॅक्सी स्टँड तयार केला. त्यांना दिलेल्या सूचनेनुसार हे टॅक्सीवाले पेत्राशेवस्कीच्या बैठका आटोपून बाहेर पडणाऱ्यांना कुठंही आणि केव्हाही घेऊन जायला नको तेवढी उत्सुकता दाखवत, तेही कमी भाड्यात. तरीही ही योजना ठोस असा पुरावा मिळवण्यात

अपयशी ठरली. लिप्रान्डीनं मग पीटर्सबर्ग विद्यापीठाच्या ॲन्टोनेल्ली या माजी विद्यार्थ्याला हाताशी धरलं. त्याला कानमंत्र देण्यात आला. काहीही करून त्यानं पेत्राशेवस्की वर्तुळात शिरकाव करून घ्यावा. तो शिकलासवरलेला असल्यामुळं त्या वर्तुळात वावरणं, इतर सदस्यांचा विश्वास संपादन करणं त्याला जड जाणार नाही. त्यानं तिथं जे जे काही घडेल त्याची इत्थंभूत माहिती लिप्रान्डीला पुरवावी. ही खेळी यशस्वी ठरली. आरोप ठेवण्याइतपत पुरेसे पुरावे ॲन्टोनेल्लीनं लिप्रान्डीच्या समोर ठेवले. ती कागदपत्रं पुढील कारवाईसाठी त्यानं ऑर्लोवकडे पाठवली. त्या कागदपत्रांवरून काढलेला गोषवारा ऑर्लोवनं निकोलसपुढे ठेवला. निकोलसनं तो गोषवारा वाचला आणि फर्मावलं : " या बैठकांचं स्वरूप निव्वळ बडबडीचं असलं तरी तिचं स्वरूप गुन्ह्यासमान आहे आणि अशा कृत्यांना वेळीच आळा घातला पाहिजे. यास्तव संबंधितांना तात्काळ अटक करण्यात यावी."

हे फर्मान निकोलसनं काढलं २१ एप्रिलला आणि २३ एप्रिलला धरपकड करण्यात आली. पेत्राशेवस्की प्रकरणाचा छाडा लावण्यासाठी चौकशी समिती नेमण्यात आली. समितीच्या कामाला रीतसर प्रारंभ झाला. ॲन्टोनेल्लीनं पुरवलेल्या माहितीच्या आधारे आरोपींना प्रश्न विचारण्यात येऊ लागले आणि –

**६ मे १८४९**

डोस्टोएवस्कीला समितीसमोर उभं करण्यात आलं. यावेळी त्याला कागद आणि लेखणी दिली गेली आणि त्याला आतापावेतो विचारण्यात आलेल्या प्रश्नांच्या संदर्भात त्यानं खुलासा करावा असं त्याला सांगण्यात आलं.

**७ मे – १९ जून १८४९**

समितीनं डोस्टोएवस्कीवर काही ठोस आरोप केलेले नसले तरी त्याला अटक का करण्यात आली आहे हे त्याला विचारलेल्या प्रश्नांनी सूचित केलं होतं. त्या अनुषंगानं त्याच्या ज्या कृती समितीच्या लेखी संशयास्पद व घातक होत्या, त्या तशा नव्हत्या ही बाब समितीच्या निदर्शनास आणून देऊन स्वतःचा बचाव करण्याचा पवित्रा त्यानं घेतला.

एव्हाना डोस्टोएवस्कीला कळून चुकलं होतं की पेत्राशेवस्कीच्या वर्तुळातील त्याचा सहभाग हाच मुळी फौजदारी स्वरूपाचा गुन्हा आहे असं समिती समजत होती. साहजिकच, त्या वर्तुळातील आपला सहभाग नगण्य होता ही गोष्ट समिती-सदस्यांच्या मनावर ठसवणं यावर त्यानं प्रथम आपलं लक्ष केंद्रित केलं. आपलं म्हणणं सिद्ध करून देण्यासाठी त्यानं बहुतांशी सत्य परिस्थिती कथन केली. 'मी क्वचितच त्याच्याकडे जात होतो. काही वेळेला तर सहा-सहा महिने मी तिथं फिरकायचो सुद्धा नाही.' १८४८ मध्ये फ्रांसमध्ये क्रांती झाली. त्या क्रांतीनं बऱ्याचशा पुरोगामी रशियन विचारवंतांना भारून टाकलं होतं. आणि याच सुमारास पेत्राशेवस्कीच्या घरचं डोस्टोएवस्कीचं येणंजाणं थोडंफार नियमित झालं होतं. पण

त्यानंतर मात्र तो बराचसा काळ पाम-ड्युरोव यांच्या ग्रुपमध्ये घालवत होता. परंतु ही गोष्ट त्यानं उघड केली नाही कारण त्या ग्रुपचा सुगावा समितीला अद्याप लागलेला नव्हता.

पेत्राशेवस्कीबरोबरचे आपले संबंध जवळिकेचे नसल्याचे त्यानं नमूद केलं : 'माझ्या परिचितांपैकी तो एक होता. त्याला फारशी किंमत मी देत नव्हतो. आमच्या दोघाचं व्यक्तिमत्व, विचारसरणी यात कुठलंही साम्य नव्हतं'. डोस्टोएवस्की सत्य लपवत होता अशी शंका घेण्याचं कारण नाही. पेत्राशेवस्कीच्या घरी असेच लोक येत होते, जात होते आणि नैमित्तिक हजेरी पेत्राशेवस्कीशी सलगीचे संबंध आहेत हे शाबित करण्यास पुरेशी ठरत नव्हती.

एक तऱ्हेवाईक आणि एककल्ली व्यक्ती अशा शद्बात डोस्टोएवस्कीनं पेत्राशेवस्कीची प्रतिमा उभी केली. ज्या गोष्टी इतरांच्या मते मामुली होत्या, निरर्थक होत्या अशा गोष्टीत तो कायमचा गुंतलेला असायचा. गंभीरपणे विचारात घेण्यायोग्य त्याचं व्यक्तिमत्व नव्हतं. 'ज्या गोष्टींना काडीचेही महत्त्व नाही त्यासाठी तो एवढे परिश्रम घेतो, जणू काही त्यावरच त्याचं सर्वस्व अवलंबून आहे. काही वेळेला अर्ध्या तासासाठी म्हणून तो लगबगीनं कुठंतरी बाहेर निघून जातो आणि हे अर्ध्या तासाचं मामुली काम संपवायला निदान त्याची दोन वर्ष खर्ची पडावीत. कुठल्यातरी कामात तो कायमचा बुडालेला आहे अशाच त्याच्या सातत्यानं हालचाली चालू असतात.' अशा माणसाचे उपद्व्याप राजसत्तेला धोकादायक असण्याची सुतराम शक्यता नसल्याचं डोस्टोएवस्कीनं सूचित केलं. त्या अनुमानावरून त्याच्या वर्तुळातील आपला सहभागही तेवढाच निरूपद्रवी असल्याचा निष्कर्ष समितीनं काढावा ही त्याच्या मनीची सुप्त इच्छा. अर्थात्, पेत्राशेवस्कीबद्दलचं त्याचं मत याहून निश्चितच वेगळं नव्हतं. आपला मित्र माईकोव याच्यापाशी तो म्हणाला होता : पेत्राशेवस्की खरं म्हणजे मूर्ख आहे. नाटकमंडळीतला नट शोभावा. वाचाळ. त्याच्याकडून शहाणपणाची अपेक्षा करणेच चूक.

आणि पेत्राशेवस्कीहून त्याच्या घरच्या बैठकांचं स्वरूप भिन्न कसं असेल! त्याही त्याच्या एवढ्याच निरुपद्रवी, फावल्या वेळातला विरंगुळा. राजकीय कट-कारस्थानसदृश असं त्यात असणं असंभवनीयच. त्याच्या 'वर्तुळात कुठल्याही प्रकारची एकजूट, कुठल्याही प्रकारची प्रवृत्ती, कुठल्याही प्रकारचं संघटित उद्दिष्ट मला कधीही आढळून आलेलं नाही. मी अगदी शपथपूर्वक सांगतो की चर्चेसाठी कुठलाही एखादा विचार मांडला गेला तर निदानपक्षी तिघांची तरी त्यावर एकवाक्यता झाली आहे असं कधीही आढळून येत नव्हतं.' आणि नेमक्या याच कारणासाठी तो स्पेशनेवच्या गुप्त संघटनेत सामील झाला होता. अर्थात् त्याबाबत त्यानं मौन पाळलं.

पेत्राशेवस्की बरोबरच्या आपल्या संबंधांना समिती जेवढं महत्त्व देते तेवढं प्रत्यक्षात ते नसल्याचं सूचित करून झाल्यानंतर, त्याच्या घरच्या जाहीर चर्चेमध्ये त्यानं भाग घेतला होता, या आपल्यावरील आरोपाकडे तो वळला. वेगवेगळ्या

प्रसंगी काही प्रक्षोभक उद्‌गार आपल्या तोंडून बाहेर पडले असतील त्यासंबंधी समितीला किती माहिती आहे याबाबत डोस्टोएवस्कीला काहीच अंदाज करता येत नसल्यामुळं, निव्वळ शाद्बिक उद्‌गारावरून आपल्याला दोषी ठरवता येईल का, ते योग्य होईल का अशी शंका त्यानं उपस्थित केली. त्याच्या शद्बांचं मूल्यमापन करण्यासाठी कोणती कसोटी वापरली जात आहे? 'मी अगदी प्रमाणिकपणानं सांगतोय की आतापावेतो माझ्या लेखी जगातील अत्यंत अवघड गोष्ट कुठली असेल तर 'मुक्त विचारप्रणाली, उदारमतवाद' या शद्बांची व्याख्या करणं'. त्यानं युक्तिवाद केला की, एखादा माणूस काय बोलला यावरूनच त्याच्याविषयी मत बनवणं अशक्य असतं.' माझ्या अंतःकरणात कोणी पाहिलंय? ज्यासाठी मला दोषी ठरवण्यात येतंय त्या द्रोहाची, घातपाताची आणि तथाकथित उठावाची तीव्रता कोणी ठरवलीय? कुठल्या निकषानुसार हे ठरवण्यात आलंय?' पेत्राशेवस्कीकडे तो फक्त तीन वेळा बोलला आहे आणि तो ज्या विषयावर बोलला ते राजकीय विषय नव्हते. 'मला आठवत नाही की पेत्राशेवस्कीकडे मी स्वतःला पूर्णपणे, मी जसा खरोखरीच आहे, कधीही व्यक्त केलेलं नाही.' जे विचार आपण जोपासलेले होते त्याची वाच्यता आपण पेत्राशेवस्कीच्या घरी कधी केली नव्हती, ही समितीला दिलेली विस्मयकारक सूचना निश्चित डोस्टोएवस्कीला अडचणीत आणू शकली असती. या कबुलीजबाबाचा आधार घेऊन समितीला इच्छा झाली असती तर खोलात जाऊन त्या अनुषंगानं समिती आणखीन काही प्रश्न विचारू शकली असती. शक्यता आहे, अनिश्चितता आणि मनावरील दडपण यामुळे हे वाक्य त्याच्या लेखणीतून अनवधनानं निसटलं असावं. सुदैवानं स्पेशनेवच्या गुप्त संघटनेच्या अस्तित्वाचा थांगपत्ता अद्याप समितीला लागलेला नसल्यामुळे डोस्टोएवस्की खरोखरीच कसा आहे हे शोधून काढण्याच्या मागे समिती लागली नाही.

पण इथून पुढं मात्र सावध पवित्रा घेत 'मुक्त विचारप्रणाली' आणि 'उदारमतवाद' या संदर्भातील आपली भूमिका डोस्टोएवस्कीनं मांडली. यावेळी त्याचा सूर गर्भित अवज्ञेचा बनला. कुठल्याही प्रकारे त्याने दिलगिरी प्रदर्शित केली नाही. उलट, निषिद्ध ठरवण्यात आलेल्या या गोष्टींच्या संदर्भातील आपल्या हक्कांचा त्यानं ठाशीव उच्चार केला. 'खरं आहे, सुधारणा व्हाव्यात अशी अपेक्षा करणं म्हणजे जर उदारमतवाद, मुक्त विचारप्रणाली ठरत असेल तर त्या अर्थानं कदाचित मी मुक्त विचारसरणीचा पुरस्कर्ता ठरतो हे मान्य करायला हवं!' परंतु लगेच तो पुस्ती जोडतो की, "या दृष्टिकोनानुसार आपल्या देशाच्या विकासाची चिंता करणारा प्रत्येक प्रामाणिक नागरीक याच वर्गातला आहे असं समजावं लागेल. त्याच्या बाबतीत सांगायचं तर 'बळजबरीनं, क्रांती घडवून, द्वेष आणि कडवटपणा जागा करून' विकास साधावा अशी त्यानं कधीच अपेक्षा केलेली नव्हती. त्याचं हे विधान खोटं आहे असं समितीनं सिद्ध करून दाखवावं असं आव्हान त्यानं दिलं, परंतु नंतर – पुढं मागं काही पुरावा हाती लागण्याची धास्ती वाटल्यामुळं – त्यानं पुन्हा बचावाचा पवित्रा घेतला; त्याच्या शद्बांवरून त्याच्या आत्यंतिक जिव्हाळयाच्या

निष्ठांविषयी अनुमान काढण्याची अशक्यता प्रतिपादली. वस्तुतः तो जसा आहे त्यात दोषारोप केला गेल्यानं बदल संभवत नाही.

येथवर लिहून झाल्यानंतर त्याला जाणीव झाली की आपण केलेला वरील खुलासा आपल्या बचावाच्या दृष्टीनं भक्कम ठरणारा नाही. आपण निर्दोष आहोत हे समिती-सदस्यांच्या मनावर ठसवण्यासाठी त्याने निर्वाळा दिला की राजसत्तेशी त्याची कुठल्याही प्रकारची दुष्मनी नाही. त्याचा देश सुसंस्कृत आहे, त्या देशाचा तो नागरीक आहे. त्याला काही हक्क, अधिकार राज्यानं बहाल केलेले आहेत आणि त्या हक्कांचा राखणदार या नात्यानं जे काही प्रक्षोभक उद्‌गार त्यानं उच्चारले असतील, ते राज्यकर्त्यांवरील त्याच्या विश्वासाचं प्रकटीकरण होतं हे ध्यानी घ्यावं. त्याच्या हातून गैर असं काहीही झालेलं नाही. मग 'मला कशासाठी दोषी ठरवण्यात आलंय? उघड आहे, की मी राजकारण, पाश्चात्य देश, सेन्सॉरशिप वगैरे वगैरेंवर बोललो. परंतु आमच्या काळात या प्रश्नांवर कोण बोलत नव्हते, कोणी विचार केलेला नव्हता. जर माझं मत व्यक्त करण्याचा वा जी मतंच मुळी प्रमाणभूत आहेत त्यांच्याशी सहमत होण्याचा अधिकार मला नसेल, तर मी शिक्षण का घेतलं? ज्ञानानं माझी जिज्ञासा जागृत का केली?'' राज्यकर्त्यांच्या दडपशाहीमुळे रशियन विचारवंतांची जी ससेहोलपट होत होती, त्या वस्तुस्थितीचे परखड चित्रण करणारे हे प्रामाणिक उद्‌गार आहेत. उघडपणे बोलण्याची भीती विचारवंतांनी स्वतःवर लादून घेतलेली नव्हती, तर राज्यकर्त्यांची जी अपेक्षा होती तिच्या अनिष्ट अंमलबजावणीची ती परिणती होती, हे मुलाहिजा न बाळगता त्यानं सांगितलं.

त्यानंतर आपला विशिष्ट दृष्टिकोन त्यानं मांडला. त्याला वाटत होतं की आपण तो योग्य तऱ्हेनं विशद केला तर समितीसदस्यांनाही तो पटावा. पाश्चात्य देशात एक गंभीर नाट्य घडतंय. असं नाट्य यापूर्वी कधीही घडलं नव्हतं. पिढ्यानपिढ्या चालत आलेल्या व्यवस्थांना तडे जातायत आणि त्या कोसळून पडतायत. समाजाची अत्यंत मूलभूत अशी तत्त्वप्रणाली कुठल्याही क्षणी ढासळून पडण्याची धास्ती निर्माण झालीय आणि त्यात संपूर्ण फ्रांस नेस्तनाबूत होईल.' विज्ञान, संस्कृती यांचं देणं ज्या भूमीकडून रशियाला लाभलं होतं असं हे राष्ट्र. या भव्य ऐतिहासिक नाटकात सुशिक्षित समाज आत्मीयतेनं सहभागी झाला तर त्यात आश्चर्य का वाटावं? शेवटी हा इतिहास आहे.... आणि इतिहास हे भावी काळाचं विज्ञान आहे .... ही आणिबाणीची परिस्थिती, कदाचित, या लोकांच्या जीवनातील ऐतिहासिक निकड, एक क्षणिक अवस्था (हे याक्षणी कोण ठरवू शकतो?) आहे, जी अंतिमतः उज्ज्वल काळाकडे घेऊन जाईल असं मी समजतो, केवळ म्हणून माझ्यावर दोषारोप करणं शक्य आहे?'' म्हणजेच, फ्रांसमध्ये जी क्रांती झाली तिच्याबद्दल आपण थोडीफार सहानुभूती दाखवली असेल हे अप्रत्यक्षरीत्या डोस्टोएवस्कीनं मान्य केलं. पण पुढं लिहिलं की त्याच्या मते ''पाश्चात्य क्रांती जगाच्या त्या भागातील तत्कालीन आणिबाणीच्या परिस्थितीची एक ऐतिहासिक निकड आहे,'' परंतु आपल्या मायभूमीत अशा क्रांतीची 'ऐतिहासिक निकड' आहे हे त्याला मान्य नाही. ''मी फ्रांसमधील



अनुक्रमणिका



क्रांतीविषयी बोललो, तत्कालिन घटनांविषयी विचार करण्याचं स्वातंत्र्य मी घेतलं तर मी मुक्त विचारप्रणालीचा पुरस्कर्ता आहे, उदारमतवादी आहे, एकतंत्री शासनाचा विरोधक आहे, त्याला सुरुंग लावण्याकडे माझा कल आहे असं अनुमान काढता येतं का? माझ्या दृष्टीनं, रशियात लोकशाहीप्रधान शासन असायला हवं या कल्पनेपेक्षा अन्य बिनडोकपणा दुसरा कुठला नसेल!'' फ्रांसमध्ये क्रांती ही 'ऐतिहासिक निकड' होती अशी त्याची भावना असली तरी त्यावरून रशियामध्येही तीच निकड आहे अशी त्याची धारणा आहे, असा निष्कर्ष काढणं चूक ठरेल. युरोपिअन समाजावर एकापाठोपाठ एक परकीयांची आक्रमणं होत राहिल्यानं त्या समाजाला स्थैर्य असं कधीच लाभलेलं नाही. तिथला राज्यकर्ता नेहमीच परका होता. परिणामी युरोपमध्ये उठाव अटळ होता आणि आपल्यावर स्वामित्व गाजवणाऱ्या परक्या वंशाविरुद्ध स्वतःचं रक्षण करता यावं या आकांक्षेमधून लोकसत्ताक राज्यपद्धतीची जनतेनं केलेली मागणी, हा स्वाभाविक पर्याय होता. पण रशियात अशी समस्याच अस्तित्वात नाही. इथली सत्ता परकीय जेत्यांच्या हाती नाही, एतद्देशीय एकाधिकारशाहीनंच, अंधाधुंदीपासून, गुलामगिरीपासून देशाचा वारंवार बचाव केला आहे. रशियाला दोन वेळा वाचवण्यात आलंय. पहिल्यांदा तार्तरांपासून, दुसऱ्यांदा थोर पीटरच्या सुधारणांनी प्रगत जीवनाकडे झेप घेणं रशियाला शक्य झालं याचं कारण इथल्या प्रजेनं आपल्या राज्यकर्त्यांवर, लहान मुलानं आपल्या पित्यावर टाकावा, असा विश्वास टाकला होता. राजा हा प्रजेला पित्यासमान आहे, राजपद हे ईश्वरदत्त आहे हा विचार एन. एम. काराम्झिन यानं आपल्या 'हिस्टरी ऑफ रशिया' या ग्रंथात जोरदारपणे मांडला आहे. हा ग्रंथ शालेय जीवनात डोस्टोएवस्कीचा आवडता होता आणि आता आपली राजनिष्ठा आपला निवाडा करणाऱ्यांच्या मनावर ठसवण्याच्या उद्देशाने त्यानं ही कल्पना पुढं केली होती हे खरं, तेवढंच तिचा प्रभाव त्याच्यावर होता हेही खरं. 'खरंच आहे, लोकसत्ताक राज्यपद्धतीचा विचार आपल्यापैकी कुणाच्या मनात येतो? सुधारणांचं घोंगडं भिजत पडलंय, त्या व्हाव्यात अशी ज्यांची इच्छा आहे त्यांनाही त्या राज्यकर्त्यांकडून केल्या जायला हव्यात अथवा या काळात तर अतिशय कडकपणे त्यांची अंमलबजावणी करायला हवी असं त्यांना वाटतं हे सूर्यप्रकाशाइतकं स्वच्छ आहे. तसं केलं नाही तर त्या घडवून आणण्यासाठी क्रांतीचा आसरा घ्यावा लागेल. रशियन क्रांतीचे अभिमानी रशियात सापडतील असं मला वाटत नाही. या घडीला सर्वांना परिचित असलेल्या घटनांचं पुन्हा स्मरण होतं त्या बऱ्याच वर्षापूर्वी घडून गेलेल्या असल्या तरी, प्युगाश्चेव आणि स्टेन्का रॅझिन यांच्या रक्तरंजित उठावणीचा हा दटावणीवजा संदर्भ देऊन शेतमजुरांच्या वेठबिगारीबाबत सुधारणा केल्या गेल्या नाहीत, तर पुढं कुठल्या प्रकारचे उठाव होण्याची शक्यता आहे, हे डोस्टोएवस्कीनं सूचित केलं ते समिती-सदस्यांना सावध करण्यासाठी निश्चितच नव्हतं. ज्या भावनेनं तो स्पेशनेवच्या गुप्त कटात सामील झाला होता ती भावना अनवधानानं व्यक्त झाली होती.

आतापावेतो आपली बाजू मांडताना, मतं व्यक्त करताना डोस्टोएवस्कीची

लेखणी तशी सावध होती. पण सेन्सॉरवर लिहिण्याची वेळ येताच मात्र ती धीट बनली. तो लेखक होता. त्याच्या लेखन-स्वातंत्र्यावर सेन्सॉरनं बंधनं घातली होती. त्याविरुद्ध आपलं मत नोंदवणं, तेही निर्भीडपणे, यात धोका होता याची पूर्ण कल्पना असूनही, हे त्यानं स्वतःचं कर्तव्य मानलं. पहिल्या निकोलसनं १८४८-४९ च्या सुमारास प्रकाशित होणाऱ्या साहित्यावरील बंधनं अधिक कडक केली होती. ते धोरण झारच्या व्यक्तिगत अधिकारानं अंमलात आणलं होतं ही गोष्ट सर्वज्ञात असूनही याविरुद्ध डोस्टोएवस्कीनं आवाज उठवला, विषादाने लिहिलं. "ज्याच्या लिखाणावर बंदी घालण्यात आलेली असते त्या लेखकाचं जिणं किती दुस्तर! त्या लिखाणावर बंदी का घातली जाते? त्यात उदारमतवाद, मुक्त विचारप्रणाली वा अनीतिकारक असं काहीतरी असतं म्हणून नाही, तर त्याच्या कथेचा वा कांदबरीचा शेवट शोकपर्यावसायी असतो, तिच्यातील चित्रणं उदासवाणं असतं. हे चित्रण समाजातील कुणावरही ठपका ठेवत नाही वा कुणाचा संशय घेत नाही. शोकांतिका घडलेली आहे ती पूर्णपर्ण योगायोगानं, तिला बाह्य परिस्थिती कारणीभूत झालेली आहे, ही बाब लक्षात घेण्याची गरज सेन्सॉरला वाटत नाही. त्यानं समितीला आवाहन केलं, त्यानं स्वतः जे लिहिलं आहे ते सारं – छापील आणि हस्तलिखित – तिनं तपासावं आणि त्यातील एखादा तरी शद्ध नैतिकता आणि प्रस्थापित व्यवस्था या विरुद्ध असल्याचं शोधून काढता येतं का तिनं पाहावं आणि "तरीही माझ्यावरसुद्धा तशीच बंधनं काटेकोरपणे लादली गेलीत, कारण माझं चित्र बरचसं उदासवाण्या रंगात रंगवलं गेलंय. एखाद्या गरीब लेखकाचं आयुष्य आपल्या या जाचक निर्बंधाच्या अंमलबजावणीनं किती उदासवाणं करून टाकतो याची कल्पना सेन्सॉरला फारशी नाही. आपला वेळ हकनाक बरबाद होतोय हे लेखकाला दिसतं आणि तो स्वतः नैराश्यात खोल डुंबलेला असला तरीही पावाचा तुकडा मिळवण्यासाठी जीवनाचं गुलाबी चित्रण करणं त्याला भाग पडतं."

आपल्या या कडक टीकेची धार बोथट करण्यासाठी पुढं, डोस्टोएवस्कीनं या परिस्थितीला 'गैरसमजूत' कारणीभूत झाली असण्याची शक्यता व्यक्त केली. पण असं असलं तरीही दोष सेन्सॉरशिपचा आहे, लेखकाचा नाही हे स्पष्टपणे नोंदवलं व लिहिलं की सद्यःस्थितीत 'कलेचे सर्व प्रकार नष्ट होतील. उपहासिका, शोकांतिका यांना स्वतःचं अस्तित्व टिकवणं अशक्यप्राय होईल. सेन्सॉरच्या सध्याच्या जाचामुळं ग्रिबोएडोव, फोन्विझिन आणि पुष्किन यासारख्या लेखकांनाही अस्तित्व टिकवणं जमणार नाही. सद्‌गुणाचा मुखवटा धारण केलेल्या दुर्गुणाला हास्यास्पद बनवून त्याचं खरं स्वरूप दाखवण्याचं कार्य उपहासात्मक वाङ्मय पार पाडतं. पण सध्याच्या या दिवसात ढोंग उघडकीला आणून एखाद्याला हास्यास्पद बनवणं कुणाला शक्य आहे? सेन्सॉर प्रत्येक ठिकाणी गर्भितार्थ पाहते आणि प्रत्येक वाक्प्रयोग कितीही निरुपद्रवी असला तरी 'समाजाला घातक' आहे असा संशय घेऊन तो निर्दयपणे काटला जातो. एवढी खबरदारी घेऊनही हे सारे परिश्रम वाया जातात. कारण दुर्गुण आणि जीवनाची उदास बाजू लपवून त्यांचं अस्तित्व जगात खरोखरीच

नाही हे वाचकांच्या गळी तुम्ही उतरवू शकत नाही. शिवाय केवळ उजळ रंगानंच चित्रण करणं शक्य आहे का? काळयाकुट्ट बाजूविना उजळ बाजू दृष्टीला कशी पडेल? छायाप्रकाशाच्या सान्निध्याविना एखादं तरी चित्र असू शकतं का? आम्हाला सांगण्यात आलंय, केवळ शौर्याचं, सद्‌गुणांचं चित्रण करा. पण आम्हाला सद्‌गुण माहीत झालाय केवळ दुर्गुणाद्वारे. सद्‌गुण आणि दुर्गुण अष्टौप्रहर एकमेकांचे सांगाती असतात या वस्तुस्थितीमधूनच ही धारणा जन्मलेली आहे. साहित्य हे लोकांच्या जीवनाचा एक आविष्कार आहे, समाजाचा एक आरसा आहे. शिक्षणामुळं, संस्कृतीमुळे नव्या नव्या कल्पना जन्माला येतात, त्यांची रशियन भाषेत व्याख्या नि विवरण करणे आवश्यक आहे, जेणेकरून त्या लोकांपर्यंत पोचतील. सर्वसामान्य जनांना नव्या संकल्पना समजू शकतील अशा तऱ्हेने त्या सूत्र रूपानं कोण मांडणार – जो साहित्य प्रसवतो त्यावाचून अन्य कोण?' या प्रकारे एक मोठी सामाजिक जबाबदारी रशियन साहित्याच्या शिरावर पडते. पण सेन्सॉरची कडक बंधनं त्याच्यासारख्या लेखकाला ही जबाबदारी पार पाडणं मुष्किल करून टाकतात, नैराश्याकडे ढकलून देतात.

त्यानंतर डोस्टोएवस्की त्याच्यावर करण्यात आलेल्या एका गंभीर आरोपाकडे वळला. बेलिन्स्कीच्या 'लेटर टु गोगोल' चं त्यानं केलेलं जाहीर वाचन व त्या पत्राच्या नकला करून त्या प्रसृत करण्यातील त्याचा सहभाग. 'हो, मी लेख वाचला. पण माझ्यावर आरोप ठेवणाऱ्यांपैकी कुणी सांगू शकेल का की कुठल्या पत्रलेखकाचा मी पक्षपाती आहे?' त्यानं असा दावा केला की त्यानं बेलिन्स्कीचं पत्र वाचून दाखवलं होतं तसंच गोगोलचंही पत्र वाचून दाखवलं होतं. दोन्ही पत्रं त्यानं अगदी तटस्थवृत्तीनं वाचलेली होती. त्यामुळं त्याला कुणाची बाजू मान्य वा अमान्य आहे हे कोण कसं सांगू शकेल? त्यानं हा युक्तीवाद केला खरा पण त्याच्या ध्यानी आलं की बचावाची ही तऱ्हा समितीसदस्यांची खात्री पटवून देण्यास पुरेशी नाही. हा पत्रव्यवहार वाचण्याचं त्यानं स्वतःच्या अंगावर का घेतलं याबाबत त्याचा तथाकथित तटस्थपणा खुलासा करू शकत नव्हता, शिवाय सेन्सॉरनं बंदी घातलेलं साहित्य संग्रही ठेवणं हेच मुळी बेकायदेशीर कृत्य, तशात त्याचं चारचौघात वाचन करणं म्हणजे बेकायदेशीर कृत्याचं स्वरूप आणखीनच गंभीर करणं. याची पूर्ण जाणीव असूनही त्यानं पत्राचं वाचन केलं ते त्याला या पत्रात स्वारस्य वाटत असल्यामुळंच ना? हे स्वारस्य त्याला का वाटावं? हे प्रश्न उपस्थित केले जाण्याची शक्यता त्याला जाणवली असावी. म्हणून बेलिन्स्कीबरोबरच्या आपल्या व्यक्तिगत संबंधाच्या आसऱ्यानं त्यानं स्वतःचा बचाव करण्याचा प्रयत्न केला.

'पुअर फोक' व त्या कादंबरीचा लेखक डोस्टोएवस्की, दोघांचीही बेलिन्स्कीनं मुक्त कंठानं प्रशंसा केली होती. त्यानंतर दीडेक वर्ष दोघांची मैत्री घनिष्ट होती. या गोष्टी साहित्य जगतात बऱ्याच जणांना ठाऊक होत्या. तद्वतच त्या दोघांचं झालेलं भांडण व त्यांच्यामधील दुरावा या घटनांही बऱ्याच जणांना ठाऊक होत्या. त्यांची मैत्री तुटली याचं प्रमुख कारण लेखक म्हणून डोस्टोएवस्कीचे बेलिन्कीबरोबरचे

मतभेद. "साहित्य हे समाजात वैचारिक, सामाजिक, राजकीय परिवर्तन घडवून आणण्याचं एक साधन आहे, त्यात कलेच स्थान गौण आहे, अशी बेलिन्स्कीची भूमिका होती. यावरून मी त्याच्यावर टीका केली.... तुम्ही तावातावानं बोलून एखाद्याचं लक्ष वेधून घेऊ शकत नाही. रस्त्यावरून जाणाऱ्यायेणाऱ्या प्रत्येकाला तुम्ही घट्ट पकडून ठेवता, जवळून जाणाऱ्या प्रत्येकाच्या शर्टाचा गळा धरता आणि बळजबरीनं त्याला उपदेश करता, कारणमीमांसा पढवता तेव्हा तुम्ही मरणप्राय "वैताग देत असता. बेलिन्स्की माझ्यावर भडकला आणि त्यातून भांडण उद्‌भवलं. त्यानंतर त्याच्या अखेरच्या काळात आमची भेट झाली नाही. त्यानंतर तो अंथरुणाला खिळला. ज्या आजारानं त्याला मृत्युमुखी लोटले त्या आजारानं त्याच्यातला माणूसही नष्ट केला होता, त्याचं अंतःकरण कडवट आणि निर्दय बनवलं होतं, त्याचं काळीज द्वेषाच्या विखारानं भरून टाकलं होतं. त्याची बेबंद आणि त्रस्त कल्पनाशक्ती प्रत्येक गोष्टीचा बाऊ करत होती. त्याच्यामध्ये उद्‌भवलेले हे दोष आणि वैगुण्ये यांचा तो धडधाकट होता तेव्हा मागमूसही नव्हता. या मनःस्थितीत त्यानं गोगोलला पत्र लिहिलं. यास्तव त्या पत्राला अवाजवी महत्त्व देण्यात येऊ नये"असं डोस्टोएवस्कीनं सूचित केलं. पण हा खुलासाही भक्कम नसल्याचं त्याच्या ध्यानी आलं. बेलिन्स्कीच्या पत्रात साहित्यविषयक चर्चा नव्हती, त्यात सामाजिक-राजकीय प्रश्नांचाच प्रामुख्यानं ऊहापोह केलेला होता, मग ते पत्र वाचून का दाखवलं? बेलिन्स्कीनं राजसत्ता, धार्मिक संस्था यांच्यावर केलेला घणाघाती हल्ला म्हणजे आजारपणानं सारासार विचारशक्ती गमावलेल्या त्याच्या बुद्धीनं केलेली बेछूट अतएव महत्त्व न देण्याजोगी विधानं होती, असं जर डोस्टोएवस्कीचं प्रामाणिक मत होतं, तर ते वाचून दाखवण्यात त्याला स्वारस्य का वाटावं? हे प्रश्न उपस्थित होण्याची शक्यता त्याला जाणवली असावी. म्हणूनच त्यानं सांगून टाकलं की त्या पत्रातील सामाजिक-राजकीय आशयात त्याला अजिबात स्वारस्य नव्हतं. 'ते पत्र वाचण्याची माझी फार दिवसांची इच्छा होती. माझ्या दृष्टीनं हा पत्रव्यवहार म्हणजे लक्षणीय असा वाङ्मयीन दस्तऐवज आहे, साहित्य जगतातील एक स्मारक आहे आणि बेलिन्स्की व गोगोल, दोघंही ख्यातनाम असामी आहेत. त्यांचे परस्परांशी असलेले संबंध स्वारस्यपूर्ण आहेत, निदान माझ्या लेखी तरी, आणि त्यातील बेलिन्स्कीशी माझा परिचय होता. मी ते वाचलं ते निव्वळ एक वाङ्मयीन दस्तऐवज म्हणून. बस्स. माझी अगदी ठाम खात्री झालीय की त्यात थोडीफार वाङ्मयीन गुणवत्ता असली तरी ते कुणालाही कुठल्याही अविचाराला प्रवृत्त करणारे नाही. माझ्याबाबतीत सांगायचं तर त्यातील एकाही अतिशयोक्त विधानाशी मी बिलकुल सहमत नाही.'

एवढ्या बौद्धिक कसरती करूनही आपला युक्तिवाद लटका ठरत असल्याची जाणीव झाल्यामुळं डोस्टोएवस्कीनं कबूल केलं : 'माझ्या आत्ताच लक्षात आलंय की मी चूक केलीय. मी ते पत्र वाचून दाखवायला नको होतं. पण तेव्हा मला याची जाणीव नव्हती आणि त्यासाठी मला दोषी ठरवण्यात येईल याची पुसटतीही शंका मला आली नाही. माझ्या हातून पातक घडलंय असाही संदेह

निर्माण झाला नाही.'

एव्हाना समितीच्या सर्व प्रश्नांचा खुलासा करून झाला होता. आपल्या निवेदनाचा समारोप करताना डोस्टोएवस्की पुन्हा एकवार पेत्राशेवस्कीकडे वळला. पेत्राशेवस्कीबरोबरचे आपले संबंध, त्याची विचारसरणी, त्याच्या वर्तुळातील एकजुटीचा अभाव वगैरे – यापूर्वी या संदर्भात जे काही सांगितलं होतं त्याचीच त्यानं थोडक्यात पुनरुक्ती केली आणि त्या अनुषंगानं फ्युरिएवादावरील आपले विचार मांडले. पहिली गोष्ट म्हणजे, 'फ्युरिएवाद ही एक शांततापूर्ण व्यवस्था आहे. आपल्या विचारसौंदर्यानं तो आत्म्यावर प्रभाव पाडतो, मानवजातीवर प्रेम करण्यास हृदयाला प्रवृत्त करतो, आपल्या जोषानं मनाला मंत्रमुग्ध करतो. मर्मभेदक हल्ला करून नव्हे तर मानवजातीवरील प्रेम जागं करून तो परिवर्तन घडवून आणतो. या व्यवस्थेत द्वेषाला थारा नाही त्याहीपेक्षा विशेष म्हणजे फ्युरिएवाद कुठलीही राजकीय सुधारणा सुचवत नाही, त्याच्या सुधारणा आर्थिक आहेत. तो शासन वा मालमत्ता यात हस्तक्षेप करत नाही आणि अलिकडेच त्याच्या एका प्रवक्त्यानं म्हटलंय की कुटुंबसंस्था नष्ट करण्याचा कुठलाही प्रयत्न त्याज्य आहे' तरीही ही व्यवस्था घातक आहे हे निःसंशय. एक, ती केवळ एक व्यवस्था आहे. दोन : ती कितीही सुंदर असली तरी प्रत्यक्षात साकार न होऊ शकणारी आहे. खरं म्हणजे फ्युरिएवाद युरोपमध्येही पूर्णपणे कालबाह्य ठरलाय, टिंगलटवाळीचा विषय बनलाय, अप्रियही झालाय. या वादाच्या समर्थकांच्या लक्षात आलेलं नाही की, 'ते जिती मढी आहेत, केवळ जिती मढी' ... 'युरोपमध्ये, फ्रांसमध्ये, सद्यःस्थितीत प्रत्येक व्यवस्था, प्रत्येक सिद्धांत समाजाला घातक आहे. कारण भुकेकंगाल सर्वसामान्य वर्ग हवालदिल झाल्यानं साधन म्हणून काहीही स्वीकारतो आणि त्या साधनाचा तत्परतेनं, 'बॅनर' बनवतो. तिथं परिस्थिती टोकाला गेलीय, मूक रस्त्यामधून तोऱ्यानं मिरवतेय! म्हणजेच भुकेकंगाल सर्वसामान्य वर्गाच्या जीवणघेण्या समस्यांना तोंड देण्याच्या दृष्टीनं समाजवाद ही एक तकलादू व्यवस्था आहे. शिवाय तिथली परिस्थिती व आपल्या येथील परिस्थिती पूर्णपणे भिन्न आहे.'

'फ्युरिएवादाचं अस्तित्व आपल्या भूमीत फक्त पुस्तकामधील पानात वा हळूवार, प्रेमळ आणि स्वप्नाळू अंतःकरणातच राहील याची खात्री पटायला एखाद्यानं रशियात वा पीटर्सबर्गमध्ये वीस पावलं टाकली तरी पुरेशी आहेत.' रशियामध्ये फ्युरिएवादाचा अवलंब करण्याची कल्पना निव्वळ हास्यास्पद आहे, गंभीरपणे विचारात घ्यायची ती बाब नाही. आणि असल्या हास्यास्पद कल्पना उराशी बाळगण्याइतका पेत्राशेवस्की निश्चितच बिनडोक नव्हता. 'फ्युरिएवादाच्या बरोबरीनं प्रत्येक पाश्चात्य व्यवस्था आपल्या भूमीला अजिबात लागू पडणारी नाही, इथल्या परिस्थितीशी पूर्णपणे विसंगत आहे, आपल्या देशाच्या प्रकृतीला न मानवणारी आहे'.

डोस्टोएवस्कीनं व्यक्त केलेले हे विचार समिती-सदस्यांची दिशाभूल करण्यासाठी होते असं समजण्याचं कारण नाही. यापूर्वी पाम-ड्युरोव वर्तुळात

समाजवादावर चर्चा चालू असताना तो म्हणाला होता : "समाजवादाच्या सिद्धांताचं उद्दिष्ट उदात्त वगैरे आहे. पण ते सिद्धांत म्हणजे निव्वळ कौतुकास्पद फँटसी आहेत. आपल्यासाठी त्या सिद्धांतांना काहीएक अर्थ नाही. रशियन समाजाच्या उन्नतीसाठी पाश्चात्य समाजवाद्यांच्या शिकवणीमधून प्रेरणा घेण्यापेक्षा आपल्या जनतेच्या पिढ्यानपिढ्या चालत आलेल्या जडणघडणीमधून, जीवनामधून, चालीरीतींमधून प्रेरणा घेणं उचित ठरेल."

अखेरीस आपल्या सहकारी कैद्यांविषयी लिहिताना डोस्टोएवस्कीनं त्यांची दोषार्ह वागणूकही त्यांच्या व्यक्तिमत्वामधील वैगुण्ये असल्याचं प्रतिपादन केलं आणि ही वैगुण्ये सुधारता येण्याजोगी असल्यामुळे त्याची गंभीर दखल घेण्याची आवश्यकता नाही, असंही म्हटलं.

डोस्टोएवस्कीचा हा कबुलीजबाब वाचून चौकशी समितीचा एक सदस्य जनरल रोस्टोवत्सेव म्हणाला की, 'त्याच्या जबानीत चतुराई आहे, धूर्तता आहे, स्वतंत्र विचारसरणी आहे, ताठरता आहे.'

**२० जून १८४९**

डोस्टोएवस्कीला पत्र लिहायची परवानगी देण्यात आली. पत्रामधून का होईना आपल्या माणसाशी हितगुज करणं त्याला शक्य झालं. तुरुंगाधिकाऱ्याला आपल्या पत्रात काही आक्षेपार्ह आढळून येणार नाही याची दक्षता घेत त्यानं अँड्रीला पत्र लिहिलं. अँड्री त्याचा धाकटा भाऊ. डोस्टोएवस्कीला अटक झाली त्याच दिवशी त्यालाही पकडण्यात आलं होतं. परंतु ही अटक चुकीने करण्यात आल्याचं लक्षात येताच त्याला सोडून देण्यात आलं होतं. या चुकीची दुरुस्ती त्याचा थोरला भाऊ मिखाईल याला अटक करून करण्यात आली. मेच्या पहिल्या आठवड्यापासून मिखाईल पीटर आणि पॉलमधील तुरुंगात बंदिस्त होता. त्याची पत्नी एमिलिया फ्योडोरोवना आणि मुलं यांच्यावर आकाशीची कुऱ्हाड कोसळली होती. त्या कुटुंबाची डोस्टोएवस्कीला चिंता लागून राहिली होती. त्यांची नीट काळजी घ्यावी अशी त्यानं अँड्रीला विनंती केली. इतर आप्तेष्टांचीही त्याच आस्थेनं विचारपूस केली. सांगितलं की, त्याची चिंता करू नये. त्याला पैशाची अत्यंत निकड असून, शक्य झाल्यास २५, नाहीतर निदान १० सिल्वर रूबल पाठवून द्यावेत. 'नोट्स ऑफ द फादरलँड' चा ताजा अंक पाठवावा. या अंकात त्याच्या 'नेटोट्च्का नेझ्वानोवा' या कादंबरीचा तिसरा भाग प्रसिद्ध व्हायचा होता. कादंबरीची प्रुफं त्यानं पाहिलेली नव्हती. त्याला काळजी वाटत होती, त्याचा सर्व मजकूर छापला गेलाय की, त्यात काटछाट करण्यात आलीय की, सेन्सॉरनं मनाई केल्यामुळं तो छापलाच गेलेला नाही.

या महिन्याभरात डोस्टोएवस्कीला उलटतपासणीसाठी चार वेळा बोलावण्यात आलं आणि लेखी उत्तरं देण्यासाठी नवी प्रश्न-मालिका त्याला देण्यात आली. एव्हाना चौकशीसमितीनं आपल्या कामात बरीच प्रगती केली होती. पेत्राशेवस्की वर्तुळात

काय काय घडत होतं याविषयी नवीन माहिती तिला उपलब्ध झाली होती. पाम-ड्युरोव ग्रुपच्या अस्तित्वाचा सुगावा लागला होता. निर्बंध घालण्यात आलेलं साहित्य छापून ते बेकायदेशीररीत्या प्रसारित करण्याची योजना चर्चिली गेली असल्याची कुणकुण लागली होती. यास्तव या खाचखळग्यांमधून आपला मार्ग अत्यंत काळजीपूर्वक निवडणं डोस्टोएवस्कीला भाग होतं. बेधडक खोटं सांगणं, अंगलट येण्याची शक्यता होती. त्याला ठाऊक असलेली माहिती त्यानं लपवली असल्याचं उघडकीला येण्याचा धोका होता, एखाद्या बेसावध क्षणी लेखणीतून निघालेलं विधान तो स्वतः आणि त्याचे अधिकारी यांना हानीकारक ठरण्याची भीती होती.

डोस्टोएवस्कीला विचारण्यात आलेल्या प्रश्नात संघटित क्रांतीचा कट शिजला असल्याचा संशय व्यक्त करण्यात आला होता. त्या संदर्भात खुलासा केला: शेतमजुरांच्या मुक्तीसाठी त्याचा तरूण मित्र गोलोवन्स्की यांनी क्रांतीची तरफदारी केली होती. तद्वतच नवीन राज्ययंत्रणा प्रस्थापित होण्याच्या संक्रमणावस्थेतील आणीबाणीच्या काळात 'एक क्रांतिकारी हुकूमशहा' त्याला अपेक्षित होता, या आरोपांचा त्यानं इन्कार केला. त्याचप्रमाणं पेत्राशेवस्कीनं क्रांतीची कल्पना उचलून धरल्याचं आपल्याला ठाऊक नसल्याचं त्यानं सांगितलं. पुढं पुस्ती जोडली की अशा उठावाची योजना जर खरोखरीच आखली गेली असती तर त्याविषयीची चर्चा उघडपणे वर्तुळात करणं संभवनीय आहे का? त्यानं थातुरमातुर उत्तरं देऊन वेळ निभावून नेली.

१८ जुलै १८४९

मिखाइलचं पत्र डोस्टोएवस्कीच्या हाती पडलं. मिखाइलची बिनशर्त सुटका झाल्याचं वाचताच तो आनंदून गेला. पत्र लिहून त्यानं आनंद व्यक्त केला आणि स्वतःच्या बंदिवासाविषयी लिहिलं :

तो निराश झालेला नाही. खरं आहे की इथलं वातावरण वेगळं आहे, निराशानजनक आहे. पण त्याला कोण काय करणार? तसं ते नेहमीच वैतागवाणं असतं असं नाही. कालचक्र फिरत असतं. कधी संथ गतीनं, कधी रखडत. काही वेळेला वाटतं, हे जीवन पुरतं अंगवळणी पडलंय. अशा वेळी, प्रतिकूल परिस्थिती खुपेनाशी होते. कल्पनाशक्तीची प्रलोभनं त्याला खुणावतात. त्या विश्वात तो रंगून जातो. परंतु काही क्षण असे येतात, कल्पनाविश्वातही समाधान लाभेनासं होतं. गतायुष्य अवचित समोर उभं ठाकतं. जुन्या स्मृतींना उजाळा मिळतो. भूतकाळ पुन्हा सजीव होतो. हे असं घडायचंच. सध्या हवामान चांगलं आहे. त्यामुळं चित्तवृत्ती प्रसन्न आहेत. परंतु उदास वातावरणात जीवन नकोसं होतं आणि कोठडी अधिकच भयाण दिसू लागते.

करता येण्याजोगं त्याच्यापाशी आहे. काहीही न करता तो मुकाट बसलेला नाही. तीन कथा आणि दोन कादंबऱ्या यांचे आराखडे त्याच्या मनात तयार आहेत. त्यातल्या एकावर त्यानं काम चालू केलंय. या निर्मितीप्रक्रियेमध्ये त्याला जेवढं

समाधान लाभतंय तेवढं समाधान त्याला आजवर कधीच लाभलेलं नव्हतं. परंतु पूर्ण वेळ त्यावरच काम करावयास तो धजत नाही. त्याला भीती वाटते, एवढ्या एकाग्र चित्तानं लिहीत राहिल्यास त्याची दमछाक होईल, त्याच्या विकल मज्जातंतूवर अनिष्ट परिणाम होतील. घरी लेखन करतेसमयी तो अधूनमधून थांबत होता आणि अन्य गोष्टीत लक्ष गुंतवून मनावरील ताण सैल करत होता. परंतु आता कारागृहात ते शक्य नव्हतं. मनःक्षोभ स्वतःच्या धीम्या गतीनं ओसरतो. मानसिक तोल ढळण्याची धास्ती वाटते.

त्याच्या प्रकृतीच्या कुरबुरी चालूच आहेत. मूळव्याध त्रास देतच आहे. मज्जातंतू कधी दगा देतील सांगता येत नाही. घसा बिघडलाय, भूक मंदावलीय, फार थोडी झोप लागते. झोपेत दुःस्वप्नं त्याला भंडावून सोडतात. दिवसभरात तो जेमतेम पाच तास झोपतो. रात्री चारेकवेळा त्याला झोपेतून जाग येते. अत्यंत पीडादायक अशी ही गोष्ट. कातरवेळ हा भयानक समय. नऊ वाजताच कभिन्न काळोख दाटतो. काही वेळेला पहाटे दोनच्या सुमारास त्याचा डोळा लागतो. पाचेक तास त्याला अंधारात तळमळत काढावे लागतात. याचा दुष्परिणाम त्याच्या तब्येतीवर होतो.

त्याच्या केसचा निकाल कधी लागेल? सांगता येत नाही. त्याला त्याबद्दल काही ठाऊक नव्हतं. काळाचं भान तो हरवून बसलाय. दिवस मावळला की त्यानं तयार केलेल्या कॅलेंडरमध्ये त्या दिवसावर तो काट मारतो. एक दिवस संपला. छान झालं, पीडा गेली.

त्याला वाचायला फारसं काही मिळत नव्हतं. पवित्र भूमीच्या प्रवासवृत्तांताचे दोन खंड आणि रोस्टोवच्या सेंट द्मीत्रीचं लिखाण त्यानं वाचून काढलं. द्मीत्रीचं लिखाण त्याला आवडलं. परंतु असं आवडीचं पुस्तक वाचायला मिळणं दुर्मिळच. पुस्तकं मिळत होती हेही नसे थोडके. कुठल्याही प्रकारचं का असेना पुस्तक हाती पडणं हीच सुखाची परमावधी होती. त्यायोगे इतरांच्या विचारात मन गुंतून गेल्यामुळं स्वतःच्या विचारांचा काही काळ का होईना विसर पडत होता. शिवाय, त्या आधारे स्वतःचे विचार तपासून पाहाणं, त्यांची नव्यानं मांडणी करणं त्याला शक्य होत होतं. त्याच्या दृष्टीनं हे हितावह होत

पत्राच्या अखेरीस त्यानं धीराचे दोन शब्द लिहिले. अलीकडे त्याला जेवढ्या प्रकर्षाने जाणवलंय तसं यापूर्वी जाणवलेलं नव्हतं की, माणसामध्ये अमर्याद जीवनशक्तीचा साठा असतो, प्राप्त परिस्थितीशी तो जुळवून घेऊ शकतो. हे बोल स्वानुभवाचे आहेत.

२७ ऑगस्ट १८४९

ऑगस्ट महिना संपत आला तरी केसचा निकाल लागण्याची चिन्हं नव्हती. उगवणारा प्रत्येक दिवस मागील दिवसाची री ओढत होता. आता त्याला तुरुंगाच्या

छोट्या आवारात फेऱ्या घालण्याची मोकळीक देण्यात आली होती. आवारात सतरा झाडं होती. ती येताजाता मोजणं हा त्याचा छंद. मोकळ्या हवेत अशा येरझारा घालायला मिळणं ही घटना त्याच्या लेखी आनंददायी होती. शिवाय संध्याकाळी त्याला आता एक मेणबत्ती देण्यात येत होती. ही आनंदाची आणखीन एक पर्वणी.

त्यानं मिखाइलला लिहिलं : त्याच्या प्रकृतीत काही सुधारणा नव्हती. महिनाभर तो एरंडेल घेत होता. एरंडेलनंच त्याला जिवंत ठेवलं होतं. मूळव्याधीची पीडा चालूच होती. छातीत कळा येत होत्या. यापूर्वी अशा कळा त्याला कधी जाणवल्या नव्हत्या. सर्वात कहर म्हणजे, त्याची संवदेनाक्षमता तीव्र बनत होती, विशेषतः रात्र पडू लागली की. रात्रौ त्याला दुःस्वप्न हैराण करतात. शिवाय त्याला भास होतात, त्याच्या पायतळीची धरणी हेलकावतेय, जणू काही तो बोटीच्या केबिनमध्ये आहे. यावरून निष्कर्ष असा : त्याची 'नर्व्हस सिस्टीम' दिवसेनदिवस अधिकाधिक विकल होत चाललीय. पूर्वी अशी नर्व्हस अवस्था झाली की तिचा तो लाभ उठवत होता. अशा अवस्थेत तो अधिक चांगलं आणि भरपूर लिहू शकत होता. परंतु आता त्याला लिहिण्यापासून स्वतःला परावृत्त करावं लागत होतं. त्यानं स्वतःला असा आवर घातला नाही तर तो कुठल्याही क्षणी कोसळून पडण्याची धास्ती होती. गेले तीन आठवडे त्यानं एक अक्षरही लिहिलेलं नव्हतं. परंतु अलिकडे त्यानं पुन्हा लेखणी हाती घेतली होती. जीवन अजूनही जगण्यालायक होतं. कुणी सांगावं, कदाचित त्याच्या प्रकृतीत सुधारणा होईलही!

मिखाईलला त्यानं विनंती केली : 'नोट्स ऑफ द फादरलॅंड' चे अंक, बायबल (जुना व नवा करार), शिलरचं 'हिस्टरी ऑफ द थर्टी इअर्स वॉर' पाठवून द्यावीत. बायबलचे व शिलरचे फ्रेंच भाषांतर पाठवावे.

**१४ सप्टेंबर १८४९**

डोस्टोएवस्कीनं मागवलेली पुस्तकं आली. त्याशिवाय समग्र शेक्सपिअर. डोस्टोएवस्कीला आश्चर्य वाटलं. त्यानं लिहिलं : शेक्सपिअर पाठवल्याबद्दल विशेष आभार, मिखाईलला ते सुचलं कसं?

हाती पडणारा 'नोट्स ऑफ द फादरलॅंड' चा प्रत्येक अंक डोस्टोएवस्की बारकाईने वाचत होता. अथपासून इतीपर्यंत. सेन्सॉरची वक्रदृष्टी वळणार नाही याची खबरदारी घेत लिहिलेले नानाविध विषय : इतिहास, तत्वज्ञान, अर्थशास्त्र इ.इ., अंकातील साहित्य-विभाग मात्र त्यामानानं तसा खास नसायचा. या काळात सेन्सॉरची बंधनं आणि त्यांची अंमलबजावणी एवढी कडक होती की रशियन लेखक परकीय भाषेतील साहित्याचं भाषांतर करण्याकडे वळले होते. या भाषांतरामुळे परक्या देशातील साहित्याचा परिचय होत होता आणि साहित्यप्रेमी वाचकाच्या दृष्टीने हा लाभ लक्षणीय होता. डोस्टोएवस्कीनं मिखाईलला विचारलं. भाषांतर असलं, म्हणून कुठं काय बिघडलं? ताज्या अंकातली शार्लोट ब्रॉंटीची 'जेन आयर' ही अनुवादित कादंबरी त्याला फार आवडली होती. पण त्याच्या मातृभाषेतील 'द बॅचलर' हे

तुर्जेनेवचं नाटक भयानक असल्याचं मत प्रदर्शित केलं होत. या नाटकातली मध्यवर्ती कल्पना आपल्या 'पुअर फोक' वरून उचलली असल्याचं त्याच्या लक्षात आलं होतं. परंतु तसा आरोप न करता त्यानं एवढंच लिहिलं : त्यात अस्सलपणाच नाही. दुसऱ्या लेखकांनी आधीच तयार करून ठेवलेला मार्गच तुर्जेनेवनं चोखाळलाय. त्यानं जे काही सांगितलंय ते यापूर्वीच सांगण्यात आलंय आणि तेसुद्धा चांगल्या प्रकारे.

एकांतवासानं त्याचं मन बथ्थड बनवलं होतं. त्याला आत्यंतिक गरज होती ती मनाला उभारी आणणाऱ्या पुस्तकांची. शरीराला अन्नाची गरज असते तद्वतच मनाच्या पोषणाला पुस्तकांच्या खुराकाची गरज असते. ही त्याची गरज मिखाईल भागवत होता. यास्तव त्यानं मिखाईलचे आभार मानले, लिहिलं : ही पुस्तकं म्हणजे वेळ घालवण्याचा उत्कृष्ट मार्ग. गेले जवळजवळ पाच महिने स्वतःपाशी असलेल्या सामग्रीवर – म्हणजे स्वतःच्या मनावरच – तो गुजराण करत होता. अद्यापि त्या यंत्रात बिघाड झाला नव्हता, ते चालू होतं. तथापि, अखंड विचार, विचारापरता अन्य विचार नाही, हे दुःसह होतं. जेथून हवा बाहेर खेचली जाते अशा 'व्ह्यॅक्यूम पंपात' राहाण्यासारखं होतं ते. पुस्तकं म्हणजे सागरातला एक थेंब असला तरीही त्यांची मदत होते. शिवाय तो लिहितोय आणि त्याचे लिखाण त्याला अक्षरशः पिळून काढतंय. स्वतःच्या लिखाणावर तो खूष होता. मनाजोगतं लिहून होण्याजोगं सुख नाही. लिहायचं, लिहीत राहायचं. निष्क्रियतेची कास धरणं हे पाप आहे.

**१७ सप्टेंबर १८४९**

चौकशी समितीनं आपलं कामकाज संपवलं. चौकशी अंती तिला जे आढळून आलं त्याआधारे एक रिपोर्ट तयार केला व तो निकोलसकडे पोचता करण्यासाठी 'मिनिस्ट्री ऑफ वॉर' कडे पाठवून दिला.

समितीचा निर्णय लिप्रान्डीच्या दबावाखाली घेतला गेला असण्याची शक्यता नाकारता येत नाही. लिप्रान्डीच्या मते पेत्राशेवस्की वर्तुळ ही एक संघटित संस्था होती. समाजातील सर्व थरातील लोकांमध्ये राजसत्तेविरुद्ध तिटकारा जागृत करणं, जमीन मालकांविरुद्ध शेतकऱ्यांना सशस्त्र उठाव करण्यासाठी प्रवृत्त करणं, वरिष्ठांविरुद्ध कनिष्ठांना चिथावणी देणं, धार्मिक संस्था, धर्मगुरू यांच्या वर्चस्वाला आव्हान देणं यासाठी ही संघटना कार्यरत होती. त्यांच्या या अतिरेकी कारवायांमुळं राजसत्तेला धोका निर्माण झाला होता. यास्तव पेत्राशेवस्की प्रकरण गंभीर असून त्याचा शेवट देहांत शासनानं व्हायला हवा.

लिप्रान्डीचं हे मत वस्तुस्थितीवर आधारलेलं नाही असं जनरल लेबेडोवचं मत होतं. लिप्रान्डीनं दाखवलेली केसची कागदपत्रं तपासल्यानंतर लेबेडोवचं मतपरिवर्तन झालं नव्हतं. त्यानं लिप्रान्डीला सांगितलं की पेत्राशेवस्की प्रकरणाला तो जे महत्त्व देतोय ते अवास्तव आहे. या कागदपत्रात आपल्याला आढळली, शाळकरी पोरांना साजेशी दिखाऊगिरी, पोकळ वल्गना. तरीही लिप्रान्डीचं मत कायम राहिलं. या

मताशी चौकशी समितीचे सदस्यही सहमत नव्हते. पेत्राशेवस्कीच्या घरच्या बैठका सर्वसाधारणपणे सरकारच्या विरोधात असल्या, सांप्रतची राज्यव्यवस्था बदलण्याच्या ईर्षेनं झालेल्या असल्या तरी त्यांच्यात सांघिक कृती वा सर्वमान्य उद्दिष्ट आढळून येत नाही. त्या वर्तुळाचं स्वरूप गुप्त संघटनेचं नव्हतं आणि रशियाबाहेर त्यांचे कुठल्याही प्रकारचे लागेबांधे असल्याचा पुरावा नाही असा आश्वासक कौल समितीनं दिला. पण निर्णय घेतला : अटक करण्यात आलेल्यांपैकी अठ्ठावीसजण फौजदारी अपराधासाठी दोषी आहेत.

**२५ सप्टेंबर १८४९**

चौकशी समितीचा रिपोर्ट वाचल्यानंतर निकोलसनं एक अनपेक्षित कारवाई केली. त्यानं 'मिलिटरी-सिव्हील कोर्ट' नेमलं आणि त्या कोर्टाला फर्मावलं की लष्करी कायद्यान्वये अपराध्यांचा निवाडा करावा.

**ऑक्टोबर (मध्य) १८४९**

प्रत्येक कैद्याला कोर्टासमोर उभं करण्यात आलं. प्रत्येकाला सांगण्यात आलं की त्यानं जो कबुलीजबाब दिला आहे त्या व्यतिरिक्त त्याला काही सांगावयाचं असल्यास त्यानं ते लिहून द्यावं. त्यानंतर त्याचा निवाडा लष्करी कायद्यानुसार करण्यात येईल.

पेत्राशेवस्की वर्तुळातील काही जणांनी ही संधी साधून क्षमायाचना केली. अक्षारूमोवनं लिहिलं : 'मला सगळ्या गोष्टींचा पश्चात्ताप होतोय आणि मी क्षमेची याचना करतो. जी मला मिळायलाच हवी. त्या शिक्षेमधून माझी सुटका व्हावी या इच्छेपोटी मी लिहीत नाहीये, तर पश्चात्तापापोटी, निर्मळ हृदयानं, आपण माझे सम्राट, आपल्याशी माझे अपराधी वर्तन झाले या भावनेने. एक ख्रिश्चन म्हणून आणि एक नागरिक म्हणून क्षमायाचना करणं हे माझं कर्तव्य आहे असं मी मानतो. माझा पश्चात्ताप लक्षात घेऊन, माझ्या वडिलांची सेवा स्मरून, महाराज, जर शक्य असेल तर मला क्षमा करा!'

तथापि, डोस्टोएवस्कीनं आपली शान राखली. त्यानं उत्तर दिलं : द्वेषापोटी, बुद्धिपुरस्सर मी सरकारविरूद्ध आजवर कधीच वागलो नाही. मी जे काही केलं ते अविचारानं, बरंचसं केवळ योगायोगानं. उदाहरणार्थ, बेलिन्स्कीच्या पत्राचं वाचन. या व्यतिरिक्त माझ्या बचावात नवीन अशी काय भर घालणार? त्यानं असंही नोंदवलं : त्याला जे जाणून घेऊ शकत होते, त्याच्या शद्बांच्या मागच्या हेतूचं भान ज्यांना होतं अशा अगदी निकटवर्तीयांपाशीच तो आपले विचार मोकळेपणानं बोलून दाखवत होता. जाहीररीत्या त्यानं मतप्रदर्शन कधीच केलं नव्हतं वा आपल्या विचारांचा प्रसार जनतेमध्ये करण्याचा प्रयत्नही त्यानं केलेला नव्हता.

**१६ नोव्हेंबर १८४९**

'मिलिटरी - सिव्हिल कोर्ट' नं निवाडा दिला : पंधरा अपराध्यांना देहांताची

शिक्षा. या शिक्षेची अंमलबजावणी गोळया घालून करणे. उरलेल्यांना सक्तमजुरी आणि हद्दपारी. संशयाचा फायदा देऊन एकाची मुक्तता. हा निकाल नंतर वरिष्ठ मिलिटरी कोर्टाकडे, – 'जनरल ऑडीटोरीअट' कडे – मंजुरीसाठी पाठवण्यात आला. या पूर्वी अशा प्रकारची एकही केस या तऱ्हेने हाताळण्यात आलेली नव्हती. या निर्णयानं पीटर्सबर्गमध्ये अफवाचं पेव फुटलं. केसचं कामकाज अत्यंत गुप्तपणे चाललेलं असूनही. असं सांगितलं जात होतं की कैद्यांना शिक्षा ठोठावण्याइतपत भक्कम पुरावा उपलब्ध होऊ न शकल्यामुळं त्यांची मुक्तता करण्यात यावी, अशी शिफारस 'मिलिटरी-सिव्हील कोर्टा' नं केली होती. परंतु काहीही करून कैद्यांना शिक्षा व्हायलाच हवी या अट्टाहासापोटी निकोलसनं ही केस 'जनरल ऑडिटोरीअट' कडे सुपूर्द करण्याचा निर्णय घेतला.

पोलादी पडद्याआड चाललेल्या या हालचालींची गंधवार्ताही पीटर आणि पॉल किल्यामधील तुरुंगात खितपत पडलेल्या कैद्यांना नव्हती. पत्र पाठवण्याची त्यांना बंदी होती. बाहेरून येणारी पत्रं बंद झाली होती. थंडीचा मोसम सुरू झाला होता.

थंडीच्या मोसमात बारीकसारीक गोष्टींवरून डोस्टोएवस्कीच्या जिवाला लागणारा घोर उचल खात असे, बळावत असे. तो काबूत राखणं या एकांतवासात कसं शक्य होणार? कल्पनाविश्वाचा आधार अशा वेळी पुरेसा पडेल? तो बेचैन होता. तरीदेखील आतून कुठूनतरी त्याला जाणवत होतं, त्याला भयभीत करणाऱ्या विवंचनांच्या पृष्ठभागाखाली सौख्याचा जोमदार अंतःप्रवाह आहे. त्याची जीवनेच्छा प्रबळ आहे. ती या सत्वपरीक्षेला सामोरं जाण्याचं बळ देईल. त्याला असंही वाटत होतं, की त्याला झालेली अटक ही परमेश्वराची कृपा होती. त्याला अटक झाली नसती तर तो ठार पागल झाला असता. त्याला असं का वाटावं?

स्पेशनेवच्या गुप्त संघटनेत सामील झाल्यापासून त्याच्या मनावर भीतीची टांगती तलवार होती. कुठल्या क्षणी काय होईल याचा नेम नव्हता. अनिश्चिततेच्या विचाराचा भुंगा मनःस्वास्थ्य पोखरत होता. साध्यासुध्या गोष्टींवरून तो चिडचिडा होऊ लागला होता. भांडणाची खुमखुमी त्याला सदाचीच. पण आता ती जोरकसपणे उफाळून येत होती. त्याला भोवळ येत होती. त्यानं आपल्या डॉक्टरला संदिग्धपणे सुचवलं होतं की स्पेशनेवची दाट जवळीक त्याच्या वाढत्या चकरा आणि चिडखोरपणा यांना कारणीभूत होती. अखेरीस ज्या गोष्टीचा त्याच्या जीवाला एवढा घोर लागून राहिला होता – त्याच्या गुप्त कारवायांचा छडा लागेल, त्याला अटक होईल – त्या प्रत्यक्षात घडून आल्यानंतर अनिश्चितता संपुष्टात आली होती. मनावरील ताण ओसरला होता. आता शिक्षेची निश्चिती झाली होती.

डोस्टोएवस्कीनं 'द लिटल हिरो' ही कथा पूर्ण केली.

या कथेचं पहिलं वैशिष्ट्य : तिची पार्श्वभूमी, निवेदनाचा सूर. ही कथा ज्या जगात घडते त्याच्या वासवाऱ्यालाही डोस्टोएवस्की कधी यापूर्वी गेला

नव्हता. ऐश्वर्यसंपन्न जमीन मालकाचं जग. गावाकडल्या इस्टेटीवरील त्याचं आलीशान वास्तव्य. पैपाहुण्यांची सदाची वर्दळ. खाणंपिणं, मौजमजा, हास्यकल्लोळांनी भारलेलं, लावण्याची झळाळी असलेलं, लफ्फेबाज पोषाखांची ऐट लाभलेलं, भावनांचा हळुवार शिडकावा असलेलं हे लोभस वातावरण. पौगंडावस्थेच्या उंबरठ्यावर असलेला अकरा वर्षाचा मुलगा. त्याच्या कामोद्दीपक भावनांना आलेली जाग. मादाम एमवर जडलेले त्याचं निरतिशय प्रेम. तिच्या नजरेत आपण वाईट ठरू नये म्हणून आपल्या प्रेमभावनेविषयी त्यानं पाळलेलं मौन. मादाम एम: देखणी पण उदास उदासशी. तिरस्कार करण्याच्या लायकीचा तिचा नवरा. एका उमद्या परपुरुषावर जडावलेलं तिचं मन. हे प्रकरण गुप्त ठेवण्यात छोट्या हिरोनं तिला केलेलं साहाय्य. शेवटी बक्षिसी म्हणून तिनं त्याला दिलेलं प्रेमभरं चुंबन आणि स्मृतिचिन्ह म्हणून हातरुमाल. या विश्वात रमणं किती सुखावह होतं. भविष्यातील अपशकून वर्तवणाऱ्या भकास कोठडीमधून, कल्पनेच्या आधारे, काही काळ का होईना, स्वतःची सुटका करून घेण्यासाठी डोस्टोएवस्कीनं या पार्श्वभूमीची जाणीवपूर्वक निवड केली असावी.

या कथेचं दुसरं वैशिष्ट्य : ख्रिस्तानं टेकडीवर दिलेल्या प्रवचनातील एका सूत्राचा अवचित उल्लेख. वनराईतील एका मोकळ्या जागी छोटा हिरो मादाम एम. बरोबर बोलत बसलेला असतो. मध्येच संभाषण तुटतं. त्याच लक्ष भोवतालच्या बहरलेल्या निसर्गाकडे जातं. 'The never ending concert of those who 'sow not, niether do they reap' and are as free as the air they cleave with their sportive wings was all about us. It seemed as though at the moment every flower, every last blade of grass, exhaling its sacrificial aroma, was saying to its creator : Father! I am blessed and happy!' 'वाऱ्यागत मुक्त' असलेल्या पाखरांच्या आवाहनाइतकाच, बंदिवान डोस्टोएवस्कीच्या लेखणीतून उमटलेल हा अनोखा धार्मिक सूर विलोभनीय होता.

**११ डिसेंबर १८४९**

'जनरल ऑडिटोरिअट' नं निकालपत्र मंजुरीसाठी निकोलसकडे पाठवून दिलं.

कोर्ट मार्शल केलेल्या कैद्यांना सरसकट मृत्यूदंडाची शिक्षा फर्माविण्यात येते या कलमावर बोट ठेवून निकाल देण्यात आला होता.

बेलिन्स्कीच्या पत्राचं वाचन व त्याचा प्रसार आणि 'अ सोल्जर्स कॉन्व्हर्सेशन' या ग्रिगोरिएवच्या आक्षेपार्ह पुस्तकाचा धिःकार करण्यास दिलेला नकार हे दोन शिक्षापात्र आरोप डोस्टोएवस्कीवर यापूर्वी ठेवण्यात आले होते. आता त्यात आणखीन एका आरोपाची भर पडली : 'प्रेस उभारणं, त्यात राज्यकर्त्याविरुद्ध पत्रकं छापून ती प्रसृत करणं या बेकायदेशीर कृत्यातील त्याचा सहभाग. शिक्षा : देहांत शासन.'

काही कैद्यांनी पश्चात्ताप व्यक्त केला होता, काहींनी प्रांजळ कबुलीजबाब दिला होता, काहींनी समितीच्या कामात सर्वतोपरी सहाय्य केलं होतं, बऱ्याचशा कैद्यांचं तरूण वय, त्यांच्या घातक कृत्यांचा ती सुरू होण्यापूर्वीच लावण्यात आलेला छडा इत्यादी गोष्टी लक्षात घेऊन त्यांना देहांत शासनाऐवजी त्याहून सौम्य अशी अन्य शिक्षा देण्याची शिफारस करण्यात आली होती.

**२१ डिसेंबर १८४९**

केसचा अंतिम निवाडा झाला आणि त्याबाबतच्या सूचना, शिक्षेच्या अंमलबजावणीची कार्यपद्धती यांचं मार्गदर्शन करणारा हुकूमनामा निकोलसच्या हुकूमावरून वरिष्ठ लष्करी अधिकाऱ्याकडे रवाना झाला.

**२२ डिसेंबर १८४९**

पहाटेचा समय, एरवी शांत असणाऱ्या तुरुंगाच्या कॉरीडॉरमध्ये रक्षकांच्या हालचालींचा अस्पष्ट आवाज. चर्चच्या दिशेनं आवाराकडे येणाऱ्या बग्ग्यांची रांग. कैदी कोठडीतल्या कोठडीत संभ्रमीत. आज एकाएकी अशी धावपळ का!

डोस्टोएवस्कीच्या कोठडीचं दार उघडलं गेलं. एक अधिकारी काही सेवकांसमवेत आत शिरला. त्याला अटक झाली होती तेव्हा त्याच्या अंगावर होते ते कपडे त्याला दिले. अटक झाली होती एप्रिल महिन्यात. उन्हाळ्याच्या मोसमात. ते पातळ कपडे बाहेरच्या गारठ्याला पुरेसे नव्हते म्हणून जाडजूड ऊबदार पायमोजे त्याला दिले. अधिकाऱ्याच्या हुकुमानुसार त्यानं कपडे अंगावर चढवले अणि त्यांच्या मागोमाग लगबगीनं तो कोठडीबाहेर पडला, आवारात आला. तिथं उभ्या असलेल्या एका बग्गीमध्ये चढला. त्याच्या शेजारी एक रक्षक स्थानापन्न झाला.

सर्व कैदी बग्ग्यात बसल्यानंतर बग्ग्यांची रांग धावू लागली. प्रत्येक बग्गीपुढं तलवार सरसावून घोड्यावर स्वार झालेला एक पोलीस. बग्गीच्या तावदानावरील बर्फाच्या पातळ थरामधून डोस्टोएवस्कीनं बाहेर पाहिलं. त्याची बग्गी ज्या दिशेनं जात होती त्याच दिशेनं जाणारा माणसांचा लोंढा त्याला अंधुकअंधुकसा दिसला. कुठं नेण्यात येतंय? काय होणार आहे आपलं? त्याला काहीच अंदाज करता येत नव्हता.

तीसेक मिनिटांनी बग्गी थांबली. त्यानं बग्गीबाहेर टाकलेलं पाऊल बर्फाच्छादित धरणीवर पडलं. पहाटेच्या धुक्याआडून भलाथोरला लाल गोळा क्षीणपणे लुकलुकत होता. बोचरे वारे हाडांना झोंबत होते. त्याची नजर इकडेतिकडे भिरभिर फिरली. जागा परिचयाची. पीटर्सबर्गमधील कवायतीचं मैदान. सेमोनोवस्की चौक. भोवताली नारंगी बराकी. धुकं पांघरलेलं कथिड्रल. दूरवर मैदानाबाहेर लोक दाटीवाटीनं उभे. लष्कराच्या तुकड्या चारी बाजूंनी रांगेत उभ्या. मैदानाच्या मध्यभागी एक प्लॅटफॉर्म. तीसेक फूट उंचीचा. काळ्या पडद्यांनी आच्छादलेला. प्लॅटफॉर्मवर चढून जाता येण्यासाठी एक लाकडी जिना.

एव्हाना सर्व कैदी बग्गीमधून उतरले होते. बऱ्याच कालावधीनंतर सर्वजण एकमेकांना भेटत होते. त्या भेटीच्या आनंदानं त्यांचे चेहरे क्षणभर उजळून निघाले. बऱ्याचजणांचे चेहरेमोहरे पार बदलून गेले होते. रोडावलेले, खंगलेले, निस्तेज, डोईवर केसांचं जंगल. दाढ्या ऐसपैस वाढलेल्या. ग्रिगोरिएव तर भ्रमिष्टागत.

या पुनर्भेटीच्या आनंदी वातावरणात जनरलचा चढा आवाज घुमला. 'आवज बंद'. सर्वजण मुकाट झाले. एक सनदी अधिकारी पुढे आला. हातातील कागद समोर धरला. कैद्यांची नावं पुकारू लागला. त्या अनुक्रमाने कैदी रांगेत उभे राहिले. त्यानंतर एक धर्मगुरू पुढं झाला. त्याच्या हाती क्रॉस आणि बायबल. तो कैद्यांना म्हणाला, "आज तुम्ही तुमच्या केसचा न्याय निवाडा ऐकणार आहात. माझ्यामागून या." त्याच्या मागून कैदी पावलं उचलू लागले. सोजिरांच्या तुकड्यांसमोरून. पेत्राशेवस्कीच्या वर्तुळात काही लष्कारी अधिकारी होते. या राजद्रोही वरिष्ठांचं अधःपतन सोजिरांच्या नजरेस आणून देण्यासाठीच ही चाल खेळली गेली होती. बर्फाळ धरणीवरून अडखळत चालता चालता संभाषण करण्याची कैद्यांना पुन्हा संधी लाभली. अचानक त्यांचं लक्ष प्लॅटफॉर्मच्या एक कोपऱ्याला जमिनीत पुरलेल्या सरळसोट खुंटांकडे गेले. कशासाठी आहेत ते? त्यांना बांधून त्यांच्यावर गोळ्या झाडण्यात येणार आहेत? पुढं काय घडणार आहे हे सांगता येणं अशक्य असलं तरी ही शिक्षा त्यांना निश्चितच ठोठावली जाणार नाही. तेवढे काही त्यांचे गुन्हे गंभीर नव्हते. बहुधा सक्तमजुरी भोगावी लागेल. हाच सूर त्यांच्या बोलण्यामधून निघत होता.

सर्वजण प्लॅटफॉर्मपाशी पोचले. जिना चढून वर गेले. त्यांना दोन रांगात उभं करण्यात आलं. डोस्टोएवस्कीनं तेवढ्यातल्या तेवढ्यात आपल्या शेजारी उभ्या असलेल्या मोम्बेल्लीला तुरुंगात लिहिलेल्या आपल्या कथेचा – बहुधा 'अ लिटल हिरो' चा आराखडा बडबडल्यागत ऐकवला.

अचानक गोळीबंद हुकूम चौकात दणाणला. कैद्यांच्या मागे उभे असलेले सोजिर सज्ज झाले. शिक्षा वाचून दाखवली जाण्यापूर्वी कैद्यांना आपल्या डोक्यावरच्या हॅटस् काढण्याचा हुकूम फर्मावण्यात आला. गारठ्यामुळं बऱ्याच जणांनी आपल्या हॅटस् काढण्याची टाळाटाळ केली तेव्हा त्यांच्या मागं उभ्या असलेल्या सोजिरांना त्या काढून घेण्याचा आदेश झाला. त्यांनी आदेशाची चोख अंमलबजावणी केली. त्यानंतर गणवेषातील एक सनदी अधिकारी कैद्यांच्या रांगामधोमध जाऊन पेत्राशेवस्कीसमोर उभा राहिला. त्यानं नाव पुरकारलं. पेत्राशेवस्की. त्याच्यावरील आरोप आणि शिक्षा त्यानं वाचून दाखवली. तो तोंडातल्या तोंडात आणि जलद वाचत असल्यामुळे त्यातलं बरचसं कैद्यांना कळलंच नाही. त्यानंतर स्पेशनेवची पाळी. अर्ध्याएक तासानं त्या सनदी अधिकाऱ्याचं एक वाक्य मृत्युघंटेगत पुनःपुन्हा कैद्यांच्या कानात घुमू लागलं : 'सर्वांना गोळ्या घालून देहांत शासनाची सजा फर्मावण्यात आलेली आहे!'

या वाक्याचा अर्थबोध होईस्तोवर धुक्याचं पटल अचानक बाजूस सारून सूर्य तळपू लागला. का कुणास ठाऊक, डोस्टोएवस्कीला वाटलं, त्यांच्या शिक्षेची अंमलबजावणी होणार नाही. आपल्या बाजूला उभ्या असलेल्या ड्युरोवकडे वळून तो तसं म्हणाला देखील. त्यावर ड्युरोव काही बोलला नाही. त्यानं फक्त प्लॅटफॉर्म शेजारी उभ्या असलेल्या बंद छकड्याकडे अंगुलीनिर्देश केला. त्याला वाटलं असावं, त्यात त्यांच्यासाठी शवपेट्या ठेवलेल्या असणार. डोस्टोएवस्कीला कळून चुकलं, त्याचा सर्वनाश अटळ आहे.

सगळ्यांच्या शिक्षा सांगून झाल्या. नंतर सोजिरांनी कैद्यांच्या अंगावरचे कपडे उतरवले आणि शेतकरी वापरतात तसे लांब हाताचे पांढरेशुभ्र पायघोळ अंगरखे – त्यांचं कफन – त्यांच्या अंगावर चढवले. त्यानंतर धर्मगुरू पुढं आला. त्यानं सेंट पॉलच्या 'द वेजेस ऑफ सिन इज डेथ' हा उतारा सद्‌गदीत सुरात वाचून दाखवला: देह निष्प्राण झाल्यानं सर्व काही संपुष्टात येत नाही. श्रद्धा आणि पश्चात्ताप यांच्या योगे त्यांना शाश्वत जीवन लाभेल. त्यांनी मृत्यूपूर्वी आपल्या पापांची कबुली द्यावी. ज्यांनी पश्चात्ताप व्यक्त केलाय त्यांची पापं परमेश्वर माफ करतो.

धर्मगुरूनं पुन:पुन्हा विनवूनही कुणीही 'कन्फेशन' साठी पुढं झाला नाही. त्यांच्या हातून जे काही घडलं होतं, ज्यासाठी त्यांना देहांताची सजा ठोठावण्यात आली होती, ज्या विचारप्रणालींनी, आदर्शांनी त्यांच्या अंत:करणावर अधिराज्य गाजवलं होतं, त्यात पश्चात्ताप वाटण्याजोगं काहीएक नव्हतं. किंबहुना या अग्निपरीक्षेतून ते झळाळून गेलेत. या हौतात्म्यासाठी त्यांच्या साऱ्या पापांचं क्षालन होईल.

अखेर टिम्कोवस्की पुढं झाला, धर्मगुरूपुढं जाऊन काहीतरी पुटपुटला. बायबलचं त्यानं चुंबन घेतलं आणि आपल्या जागी परतला. त्यानंतर प्रत्येकाच्या पुढं उभं राहून धर्मगुरूनं त्यांच्या ओठापाशी क्रॉस धरला. साऱ्यांनी – पेत्राशेवस्की व स्पेशनेव या कट्टर नास्तिकांनीही क्रॉसचं चुंबन घेतलं. डोस्टोएवस्कीनं क्रॉसचं कडकडून चुंबन घेतलं. पण त्यात धार्मिक भावनेचा लवलेशही नव्हता. क्रॉसच्या चुंबनानं पुढील दिव्याला सामोरं जाण्यासाठी त्याला बळ दिलं होतं हे नि:संशय.

आणि त्यानंतर जे घडलं ते अत्यंत भयावह होतं. पेत्राशेवस्की, मॉम्बेल्ली आणि ग्रिगोरिएव यांच्या दंडाला पकडून त्यांना प्लॅटफॉर्मवरून खाली आणलं आणि वधस्तंभांना बांधण्यात आलं. त्यांची डोकी बुरख्यात झाकण्याचा आदेश देण्यात आला. त्यांच्यासमोर पंधरा पावलांवर पंधरा सोजिर बंदुका सज्ज करून उभे राहिले.

त्या तिघानंतर डोस्टोएवस्कीची पाळी होती. त्यानं प्लेश्चेएव व ड्युरोव यांच्याशी हस्तांदोलन केलं. तो अतिशय क्षुब्ध झाला होता. त्याला व्हिक्टर ह्युगोची, Le dernier Jour d'un condamne (फाशीची शिक्षा झालेल्या माणसाचा अखेरचा दिवस) ही कादंबरी आठवली आणि स्पेशनेवकडे वळून तो म्हणाला : 'Nous serons avec le Christ' (आपण ख्रिस्ताबरोबर असू). Un peu



अनुक्रमणिका

de poussière (चिमूटभर माती). त्यावर स्पेशनेव कसंनुसं हसला. अटळ मृत्यूचा स्पर्श होण्यास पाच मिनिटांचा अवधी असताना आपली नावनिशाणीही आता शिल्लक उरणार नाही या विचारानं नव्हे, तर अज्ञाताच्या दहशतीनं डोस्टोएवस्कीला ग्रासलं होतं. तीच 'गूढ दहशत' जी या दशकाच्या मध्यावर त्याला 'नर्व्हस ॲटक' आल्यानंतर ग्रासून टाकायची आणि जिचं वर्णन त्यानं 'मृत्यूची भीती वाटणाऱ्या मनोवदेनेगत' या शब्दात केलं होते. मृत्यूच्या या अभेद्य, न उकलणाऱ्या गूढाची त्यानं एवढी दहशत घेतली होती की, मृत्यूनंतर पुनर्जन्म असतो यावर विश्वास ठेवण्यावाचून त्याला गत्यंतर नव्हतं.

करडा हुकूम सुटला : 'तय्यार. नेम धरा'. पंधरा बंदुकांनी नेम धरले. सर्वांचे श्वास भीतीनं रोखले गेले. काळ एखाद्या मिनिटानं पुढं सरकला असेल, पडघम निनादू लागले. हा सबुरीचा इशारा होता. डोस्टोएवस्कीच्या तत्क्षणी लक्षात आलं की तो वाचला. दुसऱ्याक्षणी सोजिरांनी बंदुका खाली केल्या. वधस्तंभाला जखडून टाकलेल्यांना मुक्त करून त्यांना प्लॅटफॉर्मवर नेण्यात आलं. ग्रिगोरिएवचा चेहरा पांढराफटक पडला होता.

झारचा खास दूत हाती फतवा घेऊन बग्गीतून बाहेर पडला त्यानं घोषित केलं : 'झार पहिला निकोलस यांनी कैद्यांची मृत्यूदंडाची शिक्ष रद्दबातल केली असून त्याऐवजी त्यांना सश्रम कारावासाची सजा ठोठावलेली आहे.'

या वार्तेचं काहींनी आनंदानं स्वागत केले. काहीजण गोंधळून गेले. एकजण कडवटपणानं उद्गारला : 'आम्हाला गोळ्या घालून ठार केलं असतं तर बरं झालं असतं.'

कैद्यांच्या अगावरील वस्त्र उतरवली गेली. नंतर चकचकीत कफ्तानातील दोन माणसं पुढं आली. त्यांनी प्रत्येक कैद्याला गुडघे टेकायला लावून त्यांच्या मस्तकावर तलवारीनं स्पर्श केला. या क्षणापासून त्या कैद्यांनी आपले सनदी अधिकार गमावलेले होते. त्यानंतर शेजारी उभ्या असलेल्या छकड्यामधून प्रत्येक कैद्याला टोपी, मेंढराच्या लोकरीचा कोट, फेल्ट बुटांचा जोड देण्यात आलं. पेत्राशेवस्कीची तिथूनच सैबेरियात रवानगी करायची असल्यामुळं त्याच्या पायात शृंखला घालण्यात आल्या. जाण्यापूर्वी त्यानं आपल्या सर्व मित्रांचा निरोप घेतला, प्रत्येकाला आलिंगन दिलं आणि बग्गीत जाऊन बसला, सैबेरियाच्या वाटेला लागला आणि इतर कैदी पीटर आणि पॉल किल्ल्यामधील तुरुंगात माघारी परतले.

आपल्या कोठडीत परतताच डोस्टोएवस्की मिखाईलला पत्र लिहायला बसला, लिहू लागला :

बंधो, माझ्या लाडक्या मित्रा!

निश्चित झालंय. एखाद्या किल्ल्यात (मला वाटतं ओरेनबर्ग किल्ल्यात) चार वर्ष सश्रम करावासाची सजा मला भोगायला हवी. त्या पाठोपाठ लष्करी

सेवा. आज २२ डिसेंबर. त्यांनी आम्हाला बग्गीमध्ये घालून सेमोनोवस्की चौकात आणलं. तिथं, आम्हा सर्वांना मृत्यूदंडाची शिक्षा फर्मावण्यात आली असल्याचं त्यांनी वाचून दाखवलं, क्रॉसचं चुंबन घेऊ दिलं, आमच्या प्रत्येकाच्या माथ्यावर तलवारीनं स्पर्श केला आणि शिक्षेची अंमलबजावणी पार पाडण्याआधीचे पोषाख (पांढरेशुभ्र अंगरखे) आमच्या अंगावर चढवण्यात आले. नंतर शिक्षेची अंमलबजावणी करण्यात येणार होती. तिथल्या स्तंभापाशी आम्हा तिघांना उभं करण्यात आलं.

ते एकावेळी तिघांची नावं पुकारत. मी दुसऱ्या ग्रुपमध्ये होतो आणि म्हणून मरायला एक मिनिट बाकी राहिलेलं होतं. अरे, आपल्या सर्व कुटुंबियांपैकी तुझाच विचार माझ्या मनात आला. अखेरच्या दिवशी फक्त तूच माझ्या मनात होतास. आणि माझ्या लाडक्या भावा, त्यावेळीच मला कळून चुकलं, माझं तुझ्यावर किती प्रेम आहे! माझ्या नजिक असलेले प्लेश्चेएव व ड्युरोव यांना आलिंगन देण्याइतपत आणि त्यांचा निरोप घेण्याइतपत उसंत मला मिळाली.

नंतर त्यांनी माघारीचा इशारा दिला. ज्यांना स्तंभांना बांधण्यात आलं होतं त्यांना मोकळं करण्यात आलं आणि त्यांनी जाहीर केलं की थोर सम्राटांनी आम्हाला जीवदान दिलंय. त्यानंतर आम्हाला प्रत्यक्षात ठोठावण्यात आलेली सजा त्यांनी वाचून दाखवली. पार्म तेवढा निर्दोष सुटला. आपली पूर्वीचा हुद्दा न गमावता तो माघारी सैन्यात गेला.

माझ्या प्रिय भावा, त्यांनी मला आत्ताच कळवलं की आज किंवा उद्या आम्हाला प्रयाण करावं लागणार आहे. तुला भेटण्याची परवानगी मी मागितली, पण ते शक्य नसल्याचं मला सांगण्यात आलं. तुला हे पत्र लिहिण्याची अनुमती त्यांनी मला दिली आणि आनंदानं मी पत्र लिहायला घेतलं. आमच्या (मृत्यूदंडाच्या) शिक्षेबाबत काहीबाही तुझ्या कानावर आलं असेल याची चिंता मला लागून राहिलीय. मला ज्या बग्गीमधून सेमोनोवस्की चौकात नेण्यात येत होतं, तिच्या तावदानातून मी बाहेर प्रचंड जनसमुदाय पाहिला होता. शक्यता आहे, एव्हाना बातमी तुझ्यापर्यंत पोचली असेलही. माझ्याखातर तू बरेच क्लेश भोगलेयस. आता माझ्याबद्दलचा तुझा घोर कमी होईल. माझं धैर्य खचलेलं नाही आणि त्राण गेल्यागत मला वाटत नाही. जीवन सर्वत्र जीवन असतं, जीवन आपल्यात असतं. बाह्य गोष्टीत नसतं. माझ्या भोवताली माणसं असतील, आणि माणसांमध्ये माणूस असणं, सदैव तसं राहाणं आणि कितीही खडतर प्रसंग ओढवले तरी आशा न सोडणं, हातपाय न गाळणं – म्हणजेच जीवन, जगण्याचा तोच उद्देश. मला हे कळून चुकलंय. ही कल्पना आता माझ्या रक्तमांसात भिनलीय. होय, हेच सत्य आहे! ज्या माझ्या मस्तकानं निर्मिती केली, जे कलेच्या श्रेष्ठ जीवनाधारे सजग होतं, अत्युच्च आत्मिक मूल्य ज्यानं जाणली होती आणि ज्यांचा सराव ज्या माझ्या मस्तकाला झाला होता ते मस्तक माझ्या खांद्यावरून केव्हाच छाटून टाकण्यात आलंय. मागं उरल्यात स्मृती आणि यापूर्वी मी निर्माण केलेल्या परंतु आकार न दिलेल्या प्रतिमा. त्या

आता मला पोखरून टाकतील, माझा छळवाद मांडतील, खरंय ते! परंतु माझ्यात तेच हृदय आहे, तेच मांस आणि रक्त आहे, जे अद्याप प्रेम करू शकतं, क्लेश भोगू शकतं, दया करू शकतं आणि स्मृती जागवू शकतं – आणि हे जीवनच नाही का? 'Oh volt le soleil!' (कुणी एखादा सूर्य पाहातो) बराय, बंधू, गुडबाय, माझ्यासाठी शोक करू नकोस.

आता थोडसं व्यवहारिक कामकाजाबाबत. पुस्तकं (माझ्यापाशी अद्याप बायबल आहे) आणि काही हस्तलिखितं – एका नाटकाचा कच्चा खर्डा आणि एक कादंबरी (आणि 'अ चाइल्डस् फेअरी टेल' (अ लिटल हिरो) ही संपूर्ण कथा) माझ्याकडून घेऊन जाण्यात आलीयत आणि माझी समजूत आहे, ती तुझ्याकडे सुपूर्द करण्यात येतील. माझा ओव्हरकोट आणि माझा जुना सूट मी मागं ठेवलाय, तो घेऊन जायला तू कुणाला तरी पाठवून दे. आणि बंधू, माझ्या हद्दपारीच्या स्थळापर्यंतच्या प्रवासाला, दीर्घ असणार तो, आता मी सामोरा जातोय. मला पैशाची गरज आहे. माझ्या प्रिय बंधू, हे पत्र तुला मिळताक्षणीच, शक्य असल्यास कुणाकडून तरी थोडे पैसे घे आणि तात्काळ मला पाठवून दे. या क्षणी मी श्वासोच्छ्वास करत असलेल्या हवेपेक्षा पैसे अधिक महत्त्वाचे आहेत. (खास कारणास्तव) शिवाय, दोनचार ओळी मला लिही. नंतर, मॉस्कोहून पैसे आल्यास माझ्या केसवर काम कर आणि मला वाऱ्यावर सोडून देऊ नकोस. आहे हे असं आहे! कर्ज आहे, परंतु त्याबाबतीत मी काय करू शकतो?

तुझ्या बायकोचं आणि मुलांचं चुंबन घे. त्यांच्यापाशी माझी आठवण नेहमी काढत जा. मला ते विसरून जाणार नाहीत इकडे लक्ष दे. कुणास ठाऊक, आपण केव्हा पुन्हा भेटू?! तुझी स्वतःची आणि तुझ्या कुटुंबाची काळजी घे, बंधू, निवांत आणि मितव्ययी आयुष्य जग आणि काही उद्दिष्ट असलेलं अर्थपूर्ण असं आयुष्य जग.

आत्मिक जीवनाचा एवढा समृद्ध आणि निकोप साठा या क्षणी माझ्यात जसा उचंबळून आलाय तसा यापूर्वी कधीच आला नव्हता. परंतु माझा देह या कसोटीला उतरेल का? – मला ते ठाऊक नाही. माझी प्रकृती ढासळतेय. मला हगवण लागलीय. परंतु कोण जाणे! माझ्या आयुष्यात मी एवढ्या दिव्यातून गेलोय की मला घाबरवू शकतील अशा गोष्टी फारच थोड्या असतील. काय व्हायचं ते होवो! लौकरात लौकर संधी मिळताच तुझी खबरबात कळव. माइकोव पतीपत्नींना माझ्या अखेरच्या शुभेच्छा दे. त्यांना सांग, माझ्याबद्दलच्या त्यांच्या अविचल निष्ठेबद्दल मी त्यांचा कृतज्ञ आहे. येवगेनिया पेट्रोवना हिच्यापाशी थोडेसे, विशेषकरून जिव्हाळ्याचे शद्ब – जे काही तुझ्या स्वतःच्या हृदयात उमटतील – माझ्यावतीनं बोल. मी तिला उदंड सौख्य चिंतितो आणि तिचं स्मरण सदैव कृतज्ञतेनं करत राहीन. निकोलाई अपोलोनोविच आणि अपोलोन माइकोव आणि बाकीचे सगळे, यांच्याशी माझ्यावतीनं हस्तांदोलन कर. यानोवस्कीला धुंडाळून काढ. त्याचे आभार



अनुक्रमणिका

मान आणि माझ्यावतीनं त्याच्याशी हस्तांदोलन कर. आणि ज्यांना माझा विसर पडलेला नाही त्या इतर साऱ्यांचे आभार मान आणि ज्यांना विसर पडला असेल – त्यांना माझं स्मरण करून दे. आपला भाऊ कोल्या याला माझं प्रेम दे. आपला भाऊ अँड्री याला लिही आणि माझ्याबद्दलची माहिती दे. आपल्या आत्या – माम्या, काका, मामा यांना लिही. माझ्यावतीनं हे कर आणि माझा स्नेहभाव त्यांना दे. आपल्या बहिणींना लिही आणि त्यांना सांग, मी त्यांचं सौख्य चिंतितो.

आणि कदाचित एखाद्या दिवशी आपण पुन्हा भेटूही. स्वत:ची काळजी घे; मेहरबानी करून मला पुनश्च भेटण्यासाठी जिवंत राहा. एक दिवस आपण एकमेकांना अलिंगन देऊ आणि आठवू आपले बाळपणीचे दिवस, आपला मागं पडलेला सुवर्णकाल आणि तारुण्यदशेतील स्वप्नं, जी या क्षणी माझ्या काळजातून रक्ताळलेल्या अवस्थेत मी निपटून काढतोय, गाडून टाकतोय.

लेखणी मी हातात कधीच धरणार नाही का? मला आशा आहे की चार वर्षांच्या कालावधीत ते शक्य होईल. मी लिहिलेलं सारं सारं तुझ्याकडे पाठवून देईन, अर्थात् मी लिहिलं तरच. माय गॉड! ज्यांना मी जन्माला घातलंय आणि ज्या अद्याप जिवंत आहेत त्या असंख्य प्रतिमा नष्ट होतील, माझ्या मस्तकात झेजरल्या जातील किंवा माझ्या रक्तात विषागत पसरतील! खरंच, मी लिहू शकलो नाही तर माझा नायनाट होईल. पंधरा वर्षांचा बंदिवासही पत्करला, फक्त माझ्या हातात लेखणी हवी.

मला वारंवार पत्रं लिही, तपशीलवार लिही, लंबचौडं आणि भरभरून लिही. कौटुंबिक जीवनाच्या साऱ्या बारीकसारीक गोष्टी, अगदी सामान्य अशाही प्रत्येक पत्रामधून सविस्तरपणे वर्णन करून सांग, विसरू नकोस. ती मला आशा आणि जीवन देतील. तुला ठाऊक नाही, इथल्या माझ्या कोठडीत तुझ्या पत्रांनी मला किती उभारी दिलीय. गेले अडीच महिने, जेव्हा आम्हाला पत्रं देण्यात येत नव्हती, ते मला आत्यंतिक यातनामय ठरले होते. माझी प्रकृती ढासळलेली होती. काही वेळेला तुझ्याकडून पैसे येत नव्हते आणि ही बाब तुझ्याबद्दल काळजी करायला मला भाग पाडत होती, कारण त्याचा अर्थ होता, तुलाच पैशाची आत्यंतिक निकड होती. पुन्हा एकवार मुलांचं चुंबन घे, त्यांचे छोटे देखणे चेहरे माझ्या मस्तकातून हुसकावून लावणं मला अशक्य आहे. निदान ते तरी सुखी होवोत. तू सुद्धा, बंधू, तू सुद्धा मला सुखी व्हायला हवायस.

परंतु, कृपाकरून माझ्यासाठी शोक करत राहू नकोस! मी नाउमेद झालेलो नाही, आशा मला सोडून गेलेली नाही हे तू ध्यानी ठेवावंस अशी माझी इच्छा आहे. चार वर्षात, गोष्टी माझ्याबाबतीत थोड्याफार सुकर होतील. मी लष्करी शिपाई होईन – गुन्हेगार असण्याहून हे बरंच आगळंवेगळं आहे, आणि नीट लक्षात ठेव की एक दिवस मी तुला मिठी मारणार आहे. अशक्य काय आहे? आज पाऊण तास मी मृत्यूला तोंड दिलं नव्हतं का? हा विचार मस्तकात ठेवून



अनुक्रमणिका

जगणं, मृत्यूपासून मी केसभर अंतरावर नव्हतो का आणि मी त्यानंतर जगतोच आहे.

जर का कुणी एखादा माझी आठवण तिरस्कारानं काढत असेल आणि जर का कुण्या एखाद्याबरोबर मी भांडलो असेन किंवा त्याच्या मनात कटू भावना रुजवल्या असतील, तर त्यांना ते विसरून जायला सांग. माझ्या अंतःकरणात कटुता व मत्सर नाही आणि माझ्या या पूर्वीच्या परिचितांपैकी कुणावरही प्रेम करणं आणि त्याला माझ्या हृदयाशी घट्ट कवटाळून धरणं या क्षणी मला किती आवडलं असतं! आनंद आहे त्यात; आज मी तो अनुभवलाय. मी मरणार होतो तत्पूर्वी मला जे प्रिय होते त्यांचा निरोप घेतेवेळी. त्या क्षणी मी विचार करत होतो की माझ्या शिक्षेची अंमलबजावणी झाल्याचं तुझ्या कानी येईल तेव्हा ती बातमी तुझा जीव घेईल. परंतु आता, मी तुझी खातरजमा करून देतो की, मी अद्याप जिवंत आहे आणि एक दिवस माझ्या मिठीत मी तुला घेणार आहे. या आशेवर मी यापुढं जगत राहीन. आत्ता या क्षणी माझ्या मनात आहे ते एवढंच.

मी अचंबा करतोय, आता तू काय करत असशील? आज कुठला विचार तू करत असशील? आमच्याबाबतीत काय घडलं, ठाऊक होतं तुला? आज किती गारठा होता?

माझं पत्रं तुला चटकन मिळेल अशी मी आशा करतो. नाहीतर चारेक महिने तुझी खबरबात कळल्यावाचून मला घालवावे लागतील. गेले दोन महिने ज्या पाकिटांमधून तू मला पैसे पाठवले होतेस ती मी पाहिली, पत्ता तू स्वतःच्या हातानं लिहिला होतास आणि तू ठीक आहेस हे कळून आलं, किती आनंद झाला होता मला.

गतकाळाकडे पाहाण्यासाठी जेव्हा मी मागं वळतो, मी विचार करतो किती काळ वाया घालवलाय. त्यातला कितीसा भलत्याच प्रयत्नांमध्ये, गफलतीमध्ये, निष्क्रियतेमध्ये, चुकीच्या मार्गानं जगण्यामध्ये गमावलाय, आणि आयुष्य मौल्यवान आहे अशी माझी धारणा असूनही माझं काळीज आणि माझा पिंड यांच्यावर माझ्या हातून अन्याय घडलाय – हा विचार आता मनात येताच माझं काळीज रक्तबंबाळ होतं. जीवन हा एक नजराणा आहे, जीवन म्हणजे सौख्य! प्रत्येक मिनिट परमोच्च आनंदाचा शाश्वतकाल होऊ शकतं! 'Si jeunesse Savait!' (जर तरुणाला भान असेल) आता, माझ्या आयुष्यातील या वळणावर, माझा दुसऱ्या रूपात पुनर्जन्म होईल. बंधू! मी शपथेवर सांगतो तुला की, मी निराश होणार नाही आणि माझा पिंड आणि माझं हृदय मी शुद्ध राखीन. कुठल्यातरी चांगल्या अवस्थेत माझा पुनर्जन्म होईल, हीच आशा मी बाळगून आहे, हाच माझा दिलासा आहे.

कोठडीतल्या माझ्या जिण्यानं माझ्या देहाच्या हिणकस मागण्या केव्हाच बहुतांशी खतम करून टाकल्यायत. यापूर्वी त्यांच्या आहारी न जाऊ देण्याइतपत

मला स्वतःला सांभाळता आलं नव्हतं. एकांतवास माझ्या अंगवळणी पडलाय, म्हणून या ना त्या प्रकारच्या ऐहिक हालअपेष्टा माझा जीव घेतील ही मीती तू बाळगू नकोस. हां, अर्थात् माझ्या प्रकृतीनं साथ दिली तर.

फेअरवेल, ब्रदर, फेअरवेल! तुला पुन्हा लिहिणं कधी जमेल मला! माझ्या प्रवासाचा वृत्तांत शक्य तेवढा तपशीलवारपणे माझ्याकडून तुला मिळेल. जर का माझी प्रकृती मी सांभाळू शकलो तरच, सारं काही झकास होईल.

बराय, रामराम, बंधू, निरोप घेतो आता! मी तुला घट्ट कवटाळतो आणि जिव्हाळ्यानं तुझं चुंबन घेतो. चिंता दूर सारून माझं स्मरण कर. दुःखी होऊ नकोस, कृपाकरून माझ्यासाठी दुःखी होऊ नकोस! माझ्या पुढल्याच पत्रात आयुष्य मला कशी वागणूक देतेय हे सांगेन मी तुला. मी तुला जे काही सांगितलंय ते विसरू नकोस. तुझ्या आयुष्याची नीट घडी बसव, ते वाया घालवू नकोस. तुझ्या भवितव्याची आखणी कर, मुलांची काळजी घे. ओह्, मी तुला पुन्हा केव्हा पाहीन, केव्हा? गुड-बाय! मला जे प्रिय होतं ते सारं काही मी आता माझ्यापासून ओरबाडून काढून टाकतोय, आणि त्यांचा निरोप घेताना मला यातना होतायत. माझे स्वतःचे दोन तुकडे करणं, निम्मं काळीज बाजूला करणं हे यातनाकारक आहे. फेअरवेल! फेअरवेल! पण मी तुला पुन्हा भेटणार आहे. मला आशा आहे. खरं म्हणजे, मला खात्री आहे, पण बदलू नकोस, माझ्यावर प्रेम करायचं थांबवू नकोस, माझी आठवण अंधुक होऊ देऊ नकोस, आणि तुझं प्रेम आहे हा विचार माझ्या जीवनाचा एक आनंददायी सुखदायी भाग बनेल. पुन्हा एकवार फेअरवेल! फेअरवेल, तुम्हा सर्वांना!

तुझा भाऊ
**फ्योडोर डोस्टोएवस्की**

त्यांनी मला अटक केली तेव्हा माझी काही पुस्तकं ते घेऊन गेले होते. त्यातली फक्त दोनच आक्षेपार्ह होती. बाकीची तुला स्वतःसाठी नकोत का? तू एक काम कर. त्यातलं एक पुस्तक होतं "द वर्क्स ऑफ व्हॅलेरिअन माइकोव". त्याचे समीक्षणात्मक लेख. ते येवगेनिया पेत्रोवना हिच्या मालकीचं आहे. एखादी बहुमोल वस्तू दिल्यागत तिनं मला ते दिलं होतं. मला अटक झाली तेव्हा सुरक्षा पोलिस-अधिकाऱ्याला ते पुस्तक तिला परत करायला सांगितलं होतं. आणि तिचा पत्ता त्याला दिला होता. त्यानं तसं केलं का याचा तपास कर! या स्मृतीचिन्हापासून तिला वंचित करण्याची माझी इच्छा नाही. गुड-बाय, पुन्हा एकवार गुड-बाय!"

तुझा भाऊ
**एफ. डोस्टोएवस्की**

आम्हाला ते तिथं चालत नेणार आहेत की वाहनातून, मला ठाऊक नाही. माझा अंदाज आहे, आम्हाला ते वाहनातून नेतील. कोण जाणे!

पुन्हा एकवार, माझ्यावतीनं एमिलिआ फ्योडोरोवना हिच्याशी हस्तांदोलन कर, मुलांचे मुके घे.

क्राएव्हस्कीनला माझ्या स्नेहभावना कळव, कदाचित –

तुझी अटक, तुरुंगवास, सुटका याविषयी शक्य होईल तेवढं सविस्तरपणे कळव!'

मृत्यूच्या दारात उभा असताना डोस्टोएवस्कीला व्हिक्टर ह्युगोच्या कांदबरीचं स्मरण झालं होतं. आज पत्र लिहितानादेखील त्या कादंबरीतील फाशीची शिक्षा झालेला कैदी आठवला. आयुष्यातल्या अखेरच्या दिवसातील त्याचा आकांत त्याला आठवला : 'माझी माफी! माझी माफी! मला कदाचित् माफ करण्यात येईल. राजाचा माझ्यावर राग नाहीये. माझ्या वकिलाला बोलावणं पाठवा. आत्ताच्या आत्ता. माझा वकील! सक्तमजुरी मला मान्य आहे. पाच वर्षांची सक्तमजुरी किंवा वीस वर्षांची किंवा जन्मभराची. तप्त लोखंडाचे डाग दिले तरी चालतील पण या शिक्षेमधून माफी.' जो पावलं उचलतो, येतो-जातो, सूर्य पाहातो असा कैदी म्हणून आयुष्य कंठायची त्याची इच्छा होती. या आयुष्यात यमयातना भोगण्याचीही त्याची तयारी होती. या यातना जिवंत असण्याच्या सुखापुढं जवापाडे होत्या. परंतु सूर्य पाहाण्याचं भाग्य ह्युगोच्या कैद्याच्या प्राक्तनात नव्हतं. पण ते भाग्य लाभावं हे डोस्टोएवस्कीचं विधिलिखित होतं. जीवन आपल्यापासून हिसकावून घेतलं जाणार याची पुरती खात्री झाली असतानाच, मृत्यूचा पाश आपल्या गळयाभोवती आवळला जाण्याची वाट पाहात असतानाच, जीवनाचं दान त्याला देण्यात आल्यानं तो एवढा खूष झाला होता की आनंदातिशयानं तो कोठडीत येरझारा घालत होता. सारखा गात होता. अगदी उच्च स्वरात. तो जिवंत होता. सूर्य पाहाणं त्याच्या नशिबी होतं.

लेखक होण्याची स्वप्नं डोस्टोएवस्की रंगवीत होता त्या काळात मिखाईलला लिहिलेल्या एका पत्रात त्यानं म्हटलं होतं. 'मानव हे एक गूढ आहे. आणि हे गूढ उकलायलाच हवं. आणि ते उकलण्याच्या कामी तुम्ही तुमचं अवघं आयुष्य खर्ची घातलं तरी असं समजू नका की तुमचं आयुष्य तुम्ही वाया घालवलंय.' आणि हे गूढ उकलण्याचा ध्यास त्याला तेव्हापासून लागला होता. आणि मानवी जीवनाचं आकलन भौतिकवादी दृष्टिकोनामधूनच होऊ शकेल अशी त्याची धारणा होती. आज मानवी जीवनाचं नवं भान त्याला आलं. अवघ्या मानवजातीला सातत्यानं छळणाऱ्या, भेडसावणाऱ्या शापित प्रश्नांची उत्तरं देता येणं यदाकदाचित शक्य झालंच तर ते धार्मिक श्रद्धेनंच याचा साक्षात्कार त्याला झाला.

सेमोनोवस्की चौकात हजारो लोकांच्या साक्षीनं आज जे थरारक नाट्य घडलं होतं ते नाटक पूर्व नियोजित होतं, त्याचा प्रत्येक तपशील खुद्द झारनं

ठरवलेला होता. परंतु झारच्या निवडक वरिष्ठ अधिकाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कुणालाही या खेळीची कल्पना नव्हती. झारच्या कृपेमुळंच आपण वाचलो असं कैदी समजत होते. सारे प्रजाजन समजत होते.

२४ डिसेंबर १८४९

मिखाईलला कळवण्यात आलं की आज रात्री त्याचा भाऊ सैबेरियाच्या प्रदीर्घ आणि खडतर प्रवासाला निघणार आहे. मिखाईल तात्काळ मिल्यूकोवला भेटला. दोघंही पिटर आणि पॉल किल्ल्यात पोचले. मिल्यूकोव डोस्टोएवस्कीचा आप्त नव्हता तरी देखील मिखाइलबरोबर तुरुंगाधिकाऱ्याच्या खोलीत जाण्याची त्याला परवानगी देण्यात आली. ते आल्याची वर्दी डोस्टोएवस्कीला देण्यात आली. काही वेळानं डोस्टोएवस्की ड्युरोवबरोबर त्यांना भेटण्यासाठी आला. आठ महिन्याच्या कारावासानं डोस्टोएवस्कीवर फारसा परिणाम केला नसल्याचं पाहून मिल्यूकोवला आश्चर्य वाटलं. दोघं भाऊ एकमेकांसमोर उभे राहिले. त्यांच्याकडे पाहून एखाद्या अनोळखी इसमाला वाटलं असतं सैबेरियाला मिखाईलच निघालेला आहे. त्याचे डोळे आसवांनी डबडबले होते. ओठ थरथरत होते. फ्योडोर शांतचित्त होता. आपल्या थोरल्या भावाचं सांत्वन करत होता. 'रडणं आवर. तुला माहीत आहे मी कसा आहे. मी दफनभूमीकडे निघालेलो नाही आणि तू माझ्या दफनविधीला आलेला नाहीस. तिथं हिंस्त्र श्वापद नाहीत, माणसं आहेत, कदाचित् माझ्यापेक्षाही चांगली, कदाचित माझ्यापेक्षा त्यांची योग्यता अधिक असेल. शोक करू नकोस.' चुटपुटती भेट संपली. त्यानं मिखाईलचा निरोप घेतला आणि तो आल्या वाटेनं माघारी परतला.

१५ फेब्रुवारी १८५४

तुरुंगाच्या लोहारानं डोस्टोएवस्कीच्या शृंखला तोडून टाकल्या. गेली चार वर्ष त्याच्या देहाचेच अवयव बनून गेलेल्या शृंखला खळ्कन बाजूला पडल्या. सक्त-मजुरीची शिक्षा संपली. यापुढं सहा वर्षं सक्तीची लष्करी सेवा.

त्यानं नाताल्या फोन्विझिना हिला पत्र लिहायला घेतलं.

सैबेरियाच्या दिशेनं मजलदरमजल करत डोस्टोएवस्की वगैरे कैदी ११ जानेवारी १८५० रोजी वाटेत टोबोल्स्क या गावी थांबले होते. इथल्या तुरुंगात त्यांचा सहाएक दिवस मुक्काम होता. १६ तारखेला 'डिसेंब्रिस्टां' च्या तीन बायका तुरुंगाधिकाऱ्याची परवानगी काढून त्यांना भेटायला तुरुंगात आल्या होत्या. ही भेट तुरुंगाधिकाऱ्याच्या खोलीतच आयोजित करण्यात आली होती. या बायका पंचवीस वर्षांपूर्वी आपल्या नवऱ्यांबरोबर स्वखुषीनं या भागात आलेल्या होत्या. ऐश्वर्य, सामाजिक प्रतिष्ठा, आप्तेष्ट, सारं सारं काही सोडून त्या आल्या होत्या. तुरुंगात हालअपेष्टा भोगणाऱ्या आपल्या नवऱ्यांच्या भोगात त्यांना साथ देणं हे आपलं नैतिक कर्तव्य आहे या श्रद्धेनं त्या आल्या होत्या. या तीन बायकांपैकी एक होती मादाम फोन्विझिना. उच्च कुळीची, सुसंस्कृत, धार्मिक वृत्तीची बाई.

ही भेट तासभर झाली. डोस्टोएवस्की वगैरे कैदी एका नव्या आयुष्याला सामोरे जात होते. या खडतर आयुष्यात त्यांचं नीतीधैर्य खचून जाऊ नये म्हणून 'डिसेंब्रिस्टां' च्या बायका धीराचे चार शद्ब बोलल्या होत्या. सैबेरियाचा गव्हर्नर-जनरल काउंट गोर्चोकोव हा मादाम फोन्विझिना हिचा नातेवाईक होता. आपण त्याच्यापाशी डोस्टोएवस्कीबद्दल बोलू असं तिनं आश्वासन दिलं होतं. निरोप घेताना त्या बायकांनी कैद्यांना 'नव्या करारा' ची एकेक प्रत भेट दिली होती.

दुसरा दिवस उजाडला. पहाट व्हायची होती. डोस्टोएवस्की वगैरे कैदी पुढील प्रवासाला निघाले होते. त्यांना भेटण्यासाठी मादाम फोन्विझिना आपल्या मैत्रिणीसह भल्या पहाटेपासून, कडाक्याच्या थंडीत, त्यांच्या जायच्या वाटेवर उभी राहून वाट पाहात होती. या जंगलात आपल्या येण्याचा उद्देश आपल्या गाडीवानाच्या ध्यानी येऊ नये म्हणून गाडीपासून बरंच अंतर त्यांना चालावं लागलं होतं. डोस्टोएवस्की, ड्युरोव यांना भेटायची मनोकामना पूर्ण झाली होती. यावेळीही मादाम फोन्विझिना हिनं त्यांना धीर दिला होता, सांगितलं होतं की जिथं ते चाललेत तिथली प्रेमळ माणसं त्यांची काळजी घेतील. दरम्यान तिच्या मैत्रिणीनं गुपचूपपणे एक लखोटा वरिष्ठ सोजिराच्या हाती सरकावला होता. ओम्स्कमधील एका अधिकाऱ्याला देण्यासाठी. तो अधिकारी तिचा मित्र होता. तिनं पत्रातून त्याला विनंती केली होती की डोस्टोएवस्की, ड्युरोव यांना चांगली वागणूक मिळेल इकडे त्यानं लक्ष द्यावं.

त्या सोजिराकडे आणखीही एक लखोटा टोबोल्स्कमधील कमांडंटने ओम्स्कमधील कमांडंटसाठी दिलेला होता. झारच्या हुकुमानुसार त्यात आदेश देण्यात आले होते. या कैद्यांची शिक्षा लक्षात घेऊन त्यांना इतर सर्वसामान्य कैद्यांप्रमाणेच वागणूक देण्यात यावी, पक्षपातीपणा करू नये. त्यांची वर्तणूक लक्षात घेऊन त्यांना भावी काळात सूटसवलत मिळेल ती सम्राटाच्या कृपेमुळं, स्थानिक अधिकाऱ्यांच्या मर्जीनुसार नव्हे. त्यांच्या शिक्षेची अंमलबजावणी काटेकोरपणे केली जात आहे की नाही यावर कडक देखरेख करण्यासाठी एक विश्वासू अधिकारी नियुक्त करावा.

त्या सोजिरानं दोन्ही लखोटे ज्याचे त्याला पोचते करण्याचं काम इमानेइतबारे बजावले होते.

डोस्टोएवस्की मादाम फोन्विझिना हिच्या उदात्त आणि दयाळू व्यक्तिमत्वानं प्रभावित झाला होता. ओम्स्कमधील तुरुंगातून संधी मिळताच गुपचूपपणे तिला पत्रं पाठवत होता. तिच्या पत्रासोबत मिखाईलची पत्रं जोडत होता. मिखाईलची पत्रं पोचती करणं आणि त्याची खुशाली कळवणं ही कामगिरी त्यानं तिच्यावर सोपवलेली होती. आपल्यावर सोपवण्यात आलेली ही कामगिरी ती चोखपणे पार पाडत होती.

आज बंदिवासातून बाहेर पडताच डोस्टोएवस्कीनं पत्र लिहायला घेतलं होतं, ते मादाम फोन्विझिना हिला. त्यानं पत्राला सुरुवात केली :

'माझी या आधीची जागा सोडल्यानंतर मी तुम्हाला शेवटी एकदाचा लिहितोय. गेल्या खेपेला मी तुम्हाला लिहिलं होतं तेव्हा देहानं आणि मनानं रुग्णाईत होतो. औदासिन्यानं माझा कब्जा घेतला होता आणि मला वाटतं, मी तुम्हाला खरोखरीच संभ्रमात टाकणारं पत्र पाठवलं होतं. शारीरिक आणि नैतिक, दोन्ही दृष्ट्या दुःसह अशा माझ्या दीर्घ आणि रुक्षरिकाम्या अस्तित्वानं मला भुईसपाट केलं होतं. स्वतःची खिन्नता दुसऱ्यावर, तुमच्याशी अत्यंत सहानुभूतीनं वागणाऱ्या लोकांवरही लादणं हा मला वाटतं, भेकडपणा आहे. तुम्हाला पत्र पाठवण्याची खास संधी मला उपलब्ध झाल्याकारणानं, त्यायोगे तुमच्याशी संवाद करण्याचा हा योग लाभल्यानं, मी खूष झालोय. सेमिपालारिन्स्क येथील सातव्या बटालियनमध्ये माझी नेमणूक झालीय, तिथून तुम्हाला लिहिणं वा तुमची पत्रं मला मिळणं कितपत शक्य होईल याची मला कल्पना आलेली नाही.'

परंतु यापुढेही पत्राद्वारे तिच्याशी 'संवाद घालण्याचं भाग्य' त्याला अनुभवायचं होतं. तद्वतच तिच्या मार्फत मिखाईलशी संपर्क साधणं सोयीचं होतं. त्यामुळे पुढील पत्रव्यवहार गुपचूपपणे कसा करता येईल याविषयी त्यानं तपशीलवार लिहिलं. आणि त्यानंतर धार्मिक श्रद्धेच्या संदर्भात स्वतःची भूमिका मांडली :

''कोमेजलेल्या तृणाला'' जशी पाण्याची तहान असते, तशीच एखाद्याला तहान लागते श्रद्धेची, आणि ती त्याला गवसतेही. कारण दुःखामधून सत्य प्रत्ययाला येतं. माझ्याबाबतीत मी तुम्हाला सांगू शकेन की या शतकाचा मी एक पुत्र आहे, संदेह आणि अश्रद्धा यांचा पुत्र. मी या क्षणापर्यंत तसाच आहे आणि पुढंही तसाच राहीन (मला ठाऊक आहे ते) माझ्या शवपेटीचं झाकण लावलं जाईपर्यंत. श्रद्धेच्या या तृष्णेपायी किती भयानक यातना मला भोगाव्या लागल्यात आणि अद्याप भोगतोय, आणि माझ्या अंतरात्म्यात श्रद्धा जेवढी बळकट होते त्याहीपेक्षा तिच्याविरुद्धचे आक्षेप त्याहूनही बळकट होतात आणि असं असूनही, परमेश्वर माझ्याकडे पाठवतो निरामय शांततेचे क्षण; अशा क्षणी मी प्रेम करू लागतो आणि मला आढळून येतं, दुसरेही माझ्यावर प्रेम करत असतात आणि अशा क्षणी मी माझ्यासाठी श्रद्धेचं प्रतीक साकारतो. त्यातील सर्व काही निर्मळ आणि पवित्र असतं माझ्या लेखी. हे प्रतीक अत्यंत साधं आहे. श्रद्धा कशावर ठेवायची तर ती यावर की ख्रिस्ताहून अधिक सुंदर, अधिक अभिज्ञ, अधिक सहानुभूतीपूर्ण, अधिक औचित्यपूर्ण, अधिक धैर्यशाली, अधिक निष्कलंक असं अन्य काही नाही आणि त्याच्यापाशी जे नाही ते अन्यत्र नाही, असणं शक्यच नाही!' म्हणूनच त्यानं निर्वाळा दिला की, सत्य ख्रिस्तामध्ये अंतर्भूत नाही असं जर का एखादा सिद्ध करून दाखवण्यात यशस्वी झाला तरीदेखील तो साथ करील ती ख्रिस्ताशी, सत्याशी नाही.

भौतिक कृपाप्रसादासाठी तो कधीच आसुसलेला नव्हता. त्याला हवं होतं एवढंच. पुस्तकं लिहिण्याची संधी, आणि दर दिवशी काही तासांचा एकांत, त्यातही

काही क्षण एकांतात घालवण्याची त्याला नितांत गरज होती. गेली पाच वर्षं तो सतत सक्त पहाऱ्याखाली, माणसांच्या कोंडाळ्यात जगत होता. खाण्यापिण्याएवढीच एकांत ही एक नैसर्गिक गरज असते. 'माणसावर सामूहिक जीवन लादलं गेलं तर तो मानवजातीचा तिटकारा करू लागेल. माणसांची सोबत जहर बनते, भ्रष्ट करते आणि याच अरिष्टानं गेली चार वर्षं मला क्लेश भोगायला लावलेत. त्या काळात असे काही क्षण यायचे, जेव्हा मला भेटणाऱ्या प्रत्येक माणसाचा मी तिरस्कार करायचो, ते निरपराधी असोत वा अपराधी; आणि मी त्या साऱ्यांना समजायचो चोर. माझं आयुष्य शिक्षेच्या माफीसकट माझ्यापासून चोरून नेतायत. तुम्ही स्वतःच जेव्हा अन्यायी, सैतान आणि दुष्ट बनता तेव्हा त्याहून अधिक तिरस्करणीय असं अन्य दुर्दैव नाही; तुमच्या जे ध्यानी येतं, त्यासाठी तुम्ही स्वतःवर कोरडेही ओढता पण त्याबाबतीत काहीही करण्यास तुम्ही असमर्थ असता. मी अनुभवलंय ते. पण मला खात्री आहे की परमेश्वरानं तुमच्यावर तशी पाळी येऊ दिलेली नाही. मला वाटतं, एक स्त्री म्हणून, तुमच्यापाशी कमालीची सहनशक्ती आहे, ज्यायोगे सोसणं आणि क्षमा करणं तुम्हाला शक्य होतं.'

पत्र लिहिता लिहिता तो थांबला. त्याला शंका आली, गेल्या खेपेच्या पत्राप्रमाणं गोंधळात टाकणारं असं यावेळीही काही खरडलेलं नाही ना? पत्र पुढं स्वस्थचित्तानं पुरं करू असा विचार करून त्यानं ते बाजूला ठेवलं.

तुरुंगाच्या कोठडीतून आपण बाहेर आलो. सोजिराचा गणवेष आता अंगावर चढेल. तरी आपण एक कैदीच आहोत असंच त्याला वाटत होतं. तो मुक्त कधी होणार? मुक्तीमधलं मोल हरवलं गेल्यानंतर? आणि आता तर तो दूर चाललाय. आशियामध्ये कुठं तरी. परक्या भूमीत. त्याच्यापाशी होता 'नवा करार' आणि साधे कागद कसेतरी शिवून तयार केलेलं एक नोटबूक. ते तुरुंगाधिकाऱ्याच्या हाती पडलं असतं तर बेशुद्ध पडेस्तोवर त्याला झोडपण्यात आलं असतं. त्याच्या सुदैवानं या नोटबुकाचा सुगावा तुरुंगाधिकाऱ्यांना लागला नव्हता. त्याच्या सहकैद्यांनीही त्याविषयी कधी चुगली केली नव्हती. विशेष म्हणजे ते तुरुंगाबाहेर आणण्यातही तो यशस्वी झाला होता. या नोटबुकात त्यानं ५२२ नोंदी केल्या होत्या. तुरुंगातील घटना, कैद्यांच्या शिवीगाळी, म्हणी, कवनं, सैबेरियन वाक्प्रचार, वेश्या आणि तुरुंगाबाहेर घोटाळणारी नाना प्रकारची माणसं यांची संभाषण आणि बरंच काहीसं.

पण लिहिण्याची व लिहिलेलं छापून आणण्याची परवानगी देण्यात येईल का? कोण जाणे!

**२२ फेब्रुवारी १८५४**

डोस्टोएवस्कीनं मिखाईलला मायन्याविना पत्र लिहिलं :

'थोड्याफार सविस्तरपणानं आणि थोड्याबहुत विश्वासानं मी तुझ्याशी

बोलू शकेन अशी घडी अखेरीस आलेली दिसतेय. परंतु मी काही लिहिण्याआधी मला तुला विचारायचंय. मला सांग, परमेश्वराला स्मरून, एवढ्या कालावधीत तू मला एखादी ओळसुद्धा लिहिली नाहीस, का? तुझ्याकडून मला हे अपेक्षित नव्हतं. तुझा विश्वास बसेल माझ्यावर? माझ्या एकांतवासात बऱ्याच वेळा मी खरोखरीच नैराश्याच्या आधीन होत होतो आणि नंतर रात्रभर मी काळजी करायचो. तुझ्या मुलांचं काय होणार आणि त्यांना साहाय्य करणं मला अशक्य करणाऱ्या नशिबाला मी दूषणं द्यायचो. काही वेळेला तू जिवंत असल्याचं मला खात्रीलायकरीत्या कळून यायचं तेव्हा संताप माझा कब्जा घ्यायचा. (हे घडायचं पीडादायक काळात. असा काळ माझ्या वाट्याला वारंवार यायचा) आणि कडवटपणानं मी तुझ्यावर तोंडसुख घ्यायचो. परंतु पुढं पुढं ही भावनाही ओसरत गेली – मी तुला माफ केलं, तुझ्या वागणुकीच्या समर्थनार्थ नाना तऱ्हेच्या सबबींचा विचार केला आणि त्यातल्या त्यात उत्तम सबबीवर विश्वासून मी निर्धास्त झालो. आणि त्यानंतर तुझ्यावरील विश्वास पुन्हा कधीही ढळला नाही. मला ठाऊक होतं, तुझं माझ्यावर प्रेम आहे आणि मायेनं तू माझी आठवण काढत असणार.

मी प्राधिकाऱ्यामार्फत तुला एक पत्र पाठवलं होतं, ते तुला मिळालंच असेल. तुझ्या उत्तराची मी वाट पाहिली पण ते आलंच नाही. मला लिहायला तुला ते खरोखरीच मना करतात का? पण इथं तर तशी मनाई नव्हती. साऱ्या राजकीय सहकाऱ्यांना वर्षाकाठी बरीच पत्र आली होती. ड्युरोवला पुष्कळशी पत्रं आली होती. अनेकदा मी तुरुंगाधिकाऱ्यांना विचारलं : "आम्हाला पत्रं येऊ शकतात? आम्हाला तो अधिकार आहे?" ते म्हणाले, "हो." तुझ्या मौनामागचं खरं कारण, मला वाटतं, मी ओळखलंय. तुझ्या हालचाली तशा एकूण संथच. पोलिस अधिकाऱ्यांकडे विचारणा करण्यासाठी तू खेटे घालणार नाहीस आणि यदाकदाचित तू गेला असलासच तर पहिल्याच प्रतिकूल उत्तरामुळं तू मुकाट राहिला असशील. आपण काय बोलतोय याचीही खात्री ज्याला देता येणार नाही अशा एखाद्या अधिकाऱ्यानं हे उत्तर दिलेलं असणार आणि या विचारानं मला अतिशय उदास केलं, अगदी स्वार्थी कारणासाठी. मी स्वत:शी विचार केला, पत्र लिहायची परवानगी मिळवण्यासाठी जे काही करणं आवश्यक असतं ते करणंही ज्याला जमवून आणणं शक्य होत नाही, तर मग काही खरोखरीच महत्त्वाच्या गोष्टी तो माझ्यासाठी करील म्हणून मी त्याच्यावर विसंबून राहाणं कसं शक्य आहे? उत्तर दे मला या पत्राचे. तात्काळ, अधिकृत मार्गानं, कुठल्याही विशेष प्रसंगाची वाट न पाहता, शक्य तेवढ्या विस्तारानं, अगदी तपशीलवार लिही. तुमच्यापासून छाटून टाकण्यात आलेल्या तुकड्यागत माझी अवस्था झाल्याचं मला जाणवतंय. पुन्हा एकवार मला मूळ ठिकाणी कलम करण्यात आलं, तुमच्याशी मी एकरूप झालो तर मला आवडेल. "Les absents ont toujour stort." (अनुपस्थित असलेला नेहमीच मेल्यातच जमा असतो) तर मग माझ्याबाबतीत तसंच घडायचं? पण काळजी नको करूस, माझा विश्वास आहे तुझ्यावर.



अनुक्रमणिका

सक्तमजुरीच्या छावणीमधून माझी मुक्तता करण्यात आली याला आता एक आठवडा झाला. हे पत्र तुझ्याकडे अत्यंत गुप्तपणे पाठवण्यात येतंय आणि त्यासंबंधी चकार शद्बही तू उच्चारता कामा नये. 'सैबेरियन आर्मी कॉर्प्स' च्या मुख्य विभागामार्फत मी तुला एक अधिकृत पत्रही पाठवीन. माझ्या अधिकृत पत्राला तू तात्काळ उत्तर द्यायला हवंस आणि या पत्राचं उत्तर पाठवण्याची पहिली संधी उपलब्ध होण्याची वाट पाहा. परंतु तुझ्या अधिकृत पत्रात मात्र गेल्या चार वर्षात तुझ्या आयुष्यात ज्या अत्यंत महत्त्वपूर्ण घटना घडल्या असतील त्यासंबंधी तपशीलवार वृत्तांत तू लिहिला पाहिजेसच. माझ्याबद्दलचा साद्यंत वृत्तांत तुला पाठवायला मला आवडेल परंतु हे पत्र लिहायलाही मला पुरेसा वेळ नाही, तस्मात अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीच तेवढ्या मी तुला सांगेन.

अत्यंत महत्त्वाचं काय आहे? अलीकडच्या काळात माझ्या लेखी अत्यंत महत्त्वाचं असं नेमकं काय आहे? हे प्रश्न सामोरे आल्यानंतर काय घडेल? तर या पत्रात मी तुला त्यासंबंधी काहीएक सांगणार नाही. माझ्या मस्तकात जे काही चाललंय, घटनांसंबंधीचे माझे विचार, जे सारं मी भोगलंय, या काळात ज्या काही धारणा तयार झाल्यात आणि ज्या निष्कर्षाप्रत मी पोचलोय ते तुझ्यापर्यंत पोचवणं मला कसं शक्य आहे? मी ते करण्याच्या फंदात पडत नाही. असा प्रयत्न करण्याचा विचार करणंही अशक्य. गोष्टी अर्धवट करण्याचा मला तिटकारा आहे. आणि या ना त्यासंबंधी काही तरी दे लगाव ठोकून देणे याला काही अर्थ नाही. तथापि, आवश्यक तेवढंच मी आता तुला लिहीन. ते वाच आणि तुला हवा तसा त्याचा अर्थ लाव. मला एवढंच शक्य आहे आणि म्हणून माझ्या आठवणींना मी प्रारंभ करतो.

माझ्या लाडक्या भावा, आठवतं तुला, आपण एकमेकांचा निरोप कसा घेतला? तू निघून जाताच त्यांनी आम्हा तिघांना – ड्युरोव, यारअझेम्बस्की आणि मी – साखळदंडात जखडण्यासाठी नेलं. त्यांचं वजन दहाएक पौंडांचं आणि त्यांनी चालणं अगदीच जिकिरीचं केलं. नंतर त्यांनी आम्हाला उघड्या घसरगाड्यांमध्ये बसवलं, प्रत्येकाला वेगवेगळया घसरगाडीमध्ये, सोबत रक्षक आणि अशा तऱ्हेनं चार घसरगाड्यांमधून, अग्रभागी राजाचा दूत घेऊन, आम्ही पीटर्सबर्ग सोडलं. माझं काळीज जड होतं आणि नाना प्रकारच्या संवेदनांनी मी गोंधळून आणि भांबावून गेलो होतो. माझं काळीज धडधडू लागलं, परिणामी ते सौम्यपणे दुखू लागलं आणि व्यथित झालं. परंतु मोकळया ताज्या हवेनं माझ्यात नवचैतन्य निर्माण केलं. आयुष्याच्या प्रत्येक नव्या वळणावर प्रत्येकाला जोष आणि जोम यांचा अंत:प्रवाह नेहमी जाणवतो, त्यामुळं प्रत्यक्षात मी अत्यंत शांत होतो आणि या सणासुदीच्या प्रसंगी उजळून निघालेल्या इमारतींजवळून जात असता मी औत्सुक्यानं पीटर्सबर्ग न्याहाळत होतो, आणि प्रत्येक घराचा एका पाठोपाठ एक निरोप घेत होतो. आम्ही तुझ्या अपार्टमेंटवरून गेलो. क्रायेवस्कीचं अपार्टमेंट संपूर्णपणे उजळलेलं होतं. मला तू म्हणाला होतास की त्याच्यापाशी 'ख्रिसमस ट्री' होती आणि एमिलिया





अनुक्रमणिका

फ्योडोरोवनाबरोबर मुलं तिथं गेलीयत. त्या घरावरून जात असता मला दुःखाची कठोर कळ जाणवली. जणू काही, मुलांचा अखेरचा निरोप घेतोय. त्यांच्याखातीर मला अतिशय दुःख झालं आणि त्यानंतरच्या वर्षात त्यांचा विचार मनात डोकावताच कितीतरी वेळा माझे डोळे भरून आलेत. आम्ही यारोस्लाव्लच्या दिशेनं निघालो आणि अशा तऱ्हेनं तीन वा चार ठाणी ओलांडल्यानंतर आम्ही श्ल्युसेलबर्गमधील एका खानावळीपाशी दिवस उजाडता उजाडता थांबलो. आम्ही चहावर तुटून पडलो. जणू काही अख्खा आठवडा आम्ही काहीच खाल्लेलं नव्हतं. ८ महिन्यांच्या बंदिवासानंतर ६० व्हर्स्टच्या प्रवासानं एवढी सडकून भूक लागली होती की ते आठवणंही सुखद वाटतंय. मी फार उत्साहित झालो आणि ड्युरोव निःशंकपणे बातचीत करू लागला तर यारअझेम्बस्की भवितव्याची भीषण स्वप्न रेखाटण्यात व्यग्र झाला. आम्ही आमच्यावर पहारा करणाऱ्या अधिकाऱ्याचा अभ्यास करत होतो. वेध घेत होतो आणि तो अधिकारी म्हणजे एक भला सहृदयी म्हातारा माणूस निघाला. कल्पना करू शकू, एवढा तो आमच्याशी समंजसपणे वागला. तो हिंडला-फिरलेला आहे आणि त्यानं खूप पाहिलंय. निरोप पोचवणारा एक दूत म्हणून त्यानं युरोपभर प्रवास केलाय. प्रवासात त्यानं आमची बरीच काळजी घेतली. त्याचं नाव होतं, कुझ्मा प्रोकोफेविच प्रोकोफेव. सांगायच म्हणजे, आम्हाला आच्छादित घसरगाड्यांमध्ये हलवण्याची त्यानं तजवीज केली. हे फार सोयीचं झालं, कारण काही वेळेला कडाक्याची थंडी होती. दुसरा दिवस सुट्टीचा होता त्यामुळं आम्हाला घेऊन जाणाऱ्या गाडीवानांनी जर्मन कापडाचे किरमिजी पट्टे असलेले ओव्हरकोट परिधान केले होते. आम्ही ज्या खेड्यातून जात होतो तिथल्या रस्त्यावर चिटपाखरूही नसायचं. थंडीमधला तो एक अत्यंत अद्भुत असा दिवस होता. निर्जन भागांमधून त्यांनी आम्हाला नेलं. पीटर्सबर्ग, नोवगोरॉड आणि यारोस्लाव्ल या मार्गानं. आमच्या वाटेवर छोटी गावं तुरळक होती आणि गावं म्हणतात तशी ती नव्हती. परंतु सणावाराच्या वेळी आम्ही बाहेर पडलेलो असल्यामुळं प्रत्येक ठिकाणी आम्हाला खायलाप्यायला मुबलक मिळत होतं. आम्ही भयंकर गारठून गेलो होतो. आमच्या अंगावर गरम कपडे होते पण घसरगाडीमध्ये सतत १० तास बसून राहाणं अगदी असह्य होतं. संबंध मार्गावर मी हाडीमासी पार गारठून जात होतो आणि गरमागरम करण्यात आलेल्या खोल्यातही स्वतःला ऊब आणणं मला क्वचितच जमत होतं. परंतु एक विस्मयकारक गोष्ट प्रवासात माझी प्रकृती पूर्णपणे सुधारली. पर्म प्रांतात एक रात्र आम्हाला घालवावी लागली. त्यावेळी तापमान शून्याखाली चाळीसपर्यंत गेलं होतं. हा असा अनुभव आहे की, त्याची शिफारस तुझ्यासाठी करणार नाही. भलताच पीडादायक. उराल्स पार करणं हा एक दुःखद क्षण होता. घोडे आणि आच्छादित घसरगाड्या, वाहून आलेल्या बर्फाच्या ढिगाऱ्यात रुतले. हिमवर्षाव चालू होता. रात्रीची वेळ होती. आम्ही गाड्यांमधून बाहेर पडलो आणि माणसं गाड्या वर काढीपर्यंत ताटकळत उभे राहिलो. आमच्याभोवती सर्व बर्फ होतं. वादळ घोंगावत होतं. युरोपची ही सीमा – आमच्या पुढं होता सैबेरिया आणि तिथलं आमचं

गूढ प्रारब्ध आणि पाठीमागं होता आमचा सारा भूतकाळ. मी व्यथित झालो आणि मला रडू कोसळलं.

संपूर्ण प्रवासात अख्खी खेडी, आम्ही जात असताना आम्हाला पाहाण्यासाठी लोटत होती आणि आमचे साखळदंड असूनही, ठाण्यावरील खाद्य पदार्थांचे दर नेहमीपेक्षा तिप्पट आम्हाला लावले जात होते. परंतु कुझ्मा प्रोकोफेविच आमच्या बिलाची निम्मी रक्कम स्वतःच देण्याची खबरदारी घेत होता. आमची हरकत असतानाही त्यानं हे केलं आणि म्हणून प्रवासात असताना आम्हाला फक्त १५ सिल्वर रूबल्स द्यावे लागले.

आम्ही टोबोल्स्कला पोचलो ११ जानेवारीला. तिथं आम्हाला प्राधिकाऱ्याच्या हवाली करण्यात आलं, तपासणी झाली आणि आमचे सर्व पैसे आमच्याकडून काढून घेण्यात आले. नंतर ड्युरोव, यारअझेम्बस्की आणि मी, आम्हाला एका खास कोठडीत नेण्यात आलं. इतरांना – यात स्पेशनेव आणि आमच्या आधी येऊन पोचलेले – दुसऱ्या विभागात डांबण्यात आलं आणि आमचं तिथं वास्तव्य असेपर्यंत आम्ही त्यांना क्वचितच भेटलो. टोबोल्स्कमधील आमचा सहा दिवसांचा मुक्काम आणि त्यानं माझ्यावर उमटवलेला ठसा यासंबंधी थोडं सविस्तर लिहिणं मला फार आवडलं असतं, परंतु त्यासाठी हे ठिकाण नव्हे. मी एवढंच सांगेन तिथं आम्हाला मिळालेली करुणा आणि गाढ सहानुभूती यापासून आम्हाला पूर्ण सौख्य लाभलं. आदल्या वर्षी हद्दपार करण्यात आलेल्यांनी (किंबहुना त्यांनी स्वतः असं म्हणण्यापेक्षा त्यांच्या बायकांनी) आमची अशी देखभाल केली, जणू काही आम्ही त्यांच्या कुटुंबातलेच होतो. किती उदात्त माणसं. २५ वर्षांच्या हाल-अपेष्टांनी आणि आत्म-त्यागानं तावून सुलाखून निघालेली. आम्हाला त्यांचं फक्त ओझरतं दर्शन झालं कारण आमच्यावर सक्त पहारा होता. त्यांनी आमच्याकडे अन्न आणि कपडे पोचते केले, आमचं सांत्वन केलं, आमची उमेद वाढवण्याचा प्रयत्न केला. प्रवासात माझ्यापाशी फारसं सामानसुमान नव्हतं, माझ्याबरोबर माझे स्वतःचे कपडेही घेतले नव्हते आणि त्याचा खेद होत होता. त्यांनी मला कपडेही पाठवले.

अखेरीस आम्ही पुन्हा प्रयाण केलं आणि तीन दिवसांनी आम्ही ओम्स्कला पोचलो. टोबोल्स्क येथे असताना आमच्या भावी निकट वरिष्ठांबद्दल थोडीशी माहिती मी मिळवली होती. कमांडंट अतिशय सभ्य माणूस होता. पण ड्रील मेजर क्रिवत्सोव हरामखोर इसम होता, तशा ठिकाणी थोडेफार असतात त्यातलाच. तद्दन जंगली माणूस. नियम काटेकोरपणे पाळणारा, दारुड्या, कमालीचा घृणास्पद. त्यानं पहिली गोष्ट कोणती केली तर ड्युरोवला आणि मला तो वेडपट म्हणाला. आमच्याकडून पहिली आगळीक घडली रे घडली की शारीरिक शिक्षा ठोठावण्याचं आश्वासन त्यानं दिलं. तुरुंगातील रक्षकांचा मेजर म्हणून त्याला त्यावेळेपर्यंत दोन वर्षं झाली होती आणि त्यानं भयंकर अन्यायकारक अशा शिक्षा ठोठावल्या होत्या. त्यानंतर दोन वर्षांनी त्याच्यावर कोर्ट मार्शल झालं आणि परमेश्वराचे उपकार म्हणायचे की



अनुक्रमणिका

त्याच्या तावडीतून माझी सुटका झाली. तो प्यालेला (मी त्याला न प्यालेला कधीच पाहिला नव्हता) असला की नेहमी आमच्यावर तुटून पडायचा. आमचा एखादा सोबती वेचून काढायचा. त्या सोबत्याला प्यायला काहीही मिळालेलं नसायचं हे उघड असलं तरी तो जाम प्यालेला आहे या सबबीवर त्याला झोडपून काढायचा. असाच एकदा तो रात्रीच्या फेऱ्या घालत असताना एका कैद्याला त्यानं यथेच्छ बडवलं. कारण काय, तर तो उजव्या कुशीवर झोपला होता, दुसऱ्या एकाला तो झोपेत रडतो किंवा बडबडतो म्हणून ठोकला – दारूनं धुंद झालेलं त्याचं डोस्कं ठरवील ते कुठलंही कारण. आणि या अशा माणसाबरोबर मला कसेबसे दिवस काढावे लागले, स्वतःला इजा होऊ न देता. त्याचं काम आमचे रिपोर्ट लिहिणे आणि आमच्यात झालेलं परिवर्तन पीटर्सबर्गला दर महिन्याला सादर करणं. मागं टोबोल्स्कला असतानाच सश्रम कारावासाच्या कॅंपमधील प्रवृत्तीशी माझा परिचय झाला होता आणि पुढील चार वर्ष ओम्स्कमध्ये तशाच प्रकारे घालवावी लागणार म्हणून माझ्या मनाची तयारी मी केली होती. तिथली माणसं म्हणजे झोटिंग, माथेफिरू, कडवट बनलेली. मध्यमवर्गीयांबद्दलचा त्यांचा तिरस्कार अमर्याद आणि या कारणास्तव आम्ही त्यांच्या नजरेला पडल्यावर आपल्या शत्रुत्वाचं प्रदर्शन ते करायचे आणि या अशा दुरावस्थेत आम्हाला पाहाण्यातला आनंद त्यासोबत लुटायचे. त्यांना संधी दिली असती तर त्यांनी आम्हाला गिळंकृत करून टाकलं असतं. बरीच वर्ष आम्हाला अशा लोकांबरोबर दिवस काढावे लागले, झोपावं लागलं, खावंप्यावं लागलं. यावरून आमची सुरक्षा कशी घेतली जात असे याची कल्पना तू करू शकतोस. तशात त्यांनी केलेल्या उपमर्दाबद्दल तक्रार करण्याइतपतही उसंत आम्हाला मिळत नव्हती. हरप्रकारची मानखंडना. "तुम्ही मध्यमवर्गीय, तुमच्या लोखंडी चोचीनं आम्हाला पुरतं टोचून टोचून काढलंत, जंटलमन म्हणून वावरायचेत तुम्ही आणि आजूबाजूच्या लोकांना लाथाडत असायचा आणि आता आमच्या तळागाळातील लोकांपेक्षाही खालचा तळ तुम्ही गाठलाय" – याच गोष्टी आम्हाला चार वर्ष पुनःपुन्हा ऐकवण्यात आल्या. १५० दुष्मन आमची गांजणूक करून थकले नाहीत, त्यात त्यांना मौज वाटत होती, त्यांच्या लेखी त्यांच्या कामाचा तो भाग होता. शिवाय मनाला विरंगुळाही होता. हे असले अत्यंत घाणेरडे प्रकार टाळण्याचा एकमेव मार्ग आमच्यापाशी होता, तो म्हणजे तिकडे पूर्ण दुर्लक्ष करणं, आमचं नैतिक श्रेष्ठत्व शाबूत ठेवणं (ही गोष्ट त्यांना समजून चुकली होती) आणि त्यांच्या इच्छेपुढं मान कदापी न तुकवणं. आम्ही त्यांच्याहून श्रेष्ठ आहोत या वस्तुस्थितीचं भान त्यांना सदैव होतं. आमच्या हातून कोणता गुन्हा घडला असेल याची त्यांना कल्पना नव्हती आणि आम्ही स्वतः त्याबाबतीत मौन पाळलं होतं. त्यामुळं आम्हाला ते ओळखून नव्हते, आम्ही मात्र त्यांना ओळखून होतो. मध्यमवर्गीयांवर सूड उगवणं आणि त्यांचा छळ करणं ही त्यांची इच्छा, ज्यांच्या आधारे ही माणसं श्वासोच्छ्वास करतात, जगतात, त्या इच्छेपायी आम्हाला पीडा सहन करणं प्राप्त होतं. आमचं आयुष्य खडतर होतं. लष्कराचं वर्चस्व असलेले लेबर कॅंप मुल्की कॅंपापेक्षा जिकिरीचे

होते. संपूर्ण चार वर्ष मी सुधारगृहाच्या सीमेअल्याड घालवलीत, भिंतीआड! अपवाद, कामानिमित्त मला बाहेर पाठवण्यात यायचं तेवढाच. काम नेहमीच न झेपण्याइतकं कठीण नसलं तरीसुद्धा वादळी हवेत, कुंद दिवशी, जेव्हा चिखल साचलेला असायचा, किंवा थंडीचा गारठा झोंबत असायचा तेव्हा मला जाणवायचं, माझी शक्ती संपुष्टात येतेय. कुठल्यातरी तातडीच्या कामासाठी मी चार तास घालवले होते तेव्हा पारा गोठून गेला होता आणि तापमान शून्याखाली ४० डिग्री होतं. त्यावेळी माझ्या पायाला हिमबाधा झाली होती.

बॅरॅकमध्ये आम्ही ढिगाऱ्यागत राहात होतो, आम्ही सगळेच. स्वतःशी कल्पना कर. एक जीर्ण, डळमळीत, लाकडी बांधकाम, जे फार दिवसापूर्वीच पाडून टाकायला हवं होतं आणि जे राहाण्यालायक नव्हतं. उन्हाळ्यांत, वर्णन करणं अशक्य एवढं कोंदट, थंडीत असह्य गारठा. सर्व तक्तपोशी पुरती सडलेली आणि त्यावर इंचभर घाणीचा थर साचलेला. त्यावरून आम्ही घसरत होतो. पडत होतो. लहानश्या खिडक्या. त्या शुभ्र बर्फानं अशा झाकल्या जायच्या की दिवसासुद्धा वाचणं अशक्य. तावदानांवर बर्फाचा इंचभर थर असायचा. छत गळायचं, त्याला भेगा पडलेल्या आणि आमची तिथं गर्दी झालेली होती, पिंपामधल्या हेरिंग माशांगत.

ते चुल्हा पेटवायचे आणि त्यात अर्धा डझनभर ओंडके टाकायचे त्यानंही ऊब येत नसे (खोलीतलं बर्फ जरादेखील वितळायचं नाही), खोली धुरानं एवढी भरून जायची की तिथं राहाणं अशक्य – थंडीचा मोसम हा असा जायचा. बॅरॅकच्या त्याच खोलीत बरोबरचे कैदी, सर्वत्र पाण्याचे शिंतोडे उडवत आपले कपडे धूत. वळण्यापुरतीही जागा मिळणं मुष्किल. सूर्यास्त आणि सूर्योदय या दरम्यान बाहेर मुताऱ्यात जाऊ शकत नव्हतो, बॅरॅक टाळेबंद, म्हणून या कालावधीत दरवाजापाशी टब ठेवलेला असायचा आणि दुर्गंधी वर्णन करणं अशक्य. सर्व कैद्यांना डुकरागत दुर्गंधी मारायची आणि ते म्हणायचे, "डुकरागत वागण्यावाचून माणसाला गत्यंतर नाही," कारण त्यांच्याच शद्बात "कसंही असो जिवंत राहातोय ना?"

आम्ही नुसत्या फळकुटावर झोपत होतो आणि एकच उशी घ्यायची आम्हाला परवानगी होती. आम्हाला पांघरायला फक्त मेंढ्याचं कातडं, तेही अपुरं. आमचे पाय रात्रभर उघडेच. रात्रभर आम्ही कुडकुडायचो. तिथं बादलीभर पिसवा होत्या, उवा होत्या, झुरळ होती. थंडीत आम्ही मेंढ्याचं कातडं परिधान करत होतो, तेही अपुरं. आम्हाला अजिबात ऊब मिळत नसे. आणि छोटे बूट – आणि अशा या वेषात आम्हाला बाहेर जावं लागायचं. बाहेर तापमान शून्याखाली, गोठलेलं. आमचा खाना: पाव आणि कोबीचं सूप, ज्यात दर माणशी पाव पौंड गाईचं मांस अपेक्षित, परंतु ते मासांचे जे बारीक बारीक तुकडे घालत, त्यातला एखादाही माझ्या दृष्टीला कधी पडला नाही. रजेच्या दिवशी आमच्या कांजीत स्निग्धांश थोड्या प्रमाणातही नसायचा आणि लेंटच्या दिवसात पाण्यात कोबी, बस्स त्याव्यतिरिक्त काही नाही. मला भयंकर हगवण लागली होती आणि बऱ्याच वेळा

गंभीर आजारीही पडलो होतो. पैशाविना जिवंत राहाण शक्य आहे का, तूच ठरव. हे बघ, मी सांगतो तुला, माझ्याकडे कपर्दिकही नसती तर मी खचितच मरून गेलो असतो – कुठलाही कैदी तग धरून राहाणं अशक्य. वस्तुतः प्रत्येकजण काम करत होता, एखादा कोपेक मिळवण्यासाठी काहीतरी विकत होता. आणि अशा प्रकारे मला अधुनमधून चहा आणि मांसाचा तुकडा खायला मिळायचा आणि त्यांनी मला वाचवलंय. धूम्रपानासाठी थोडासा तंबाखू नसला तर राहाणंही मुष्किल होतं. त्या घाणेरड्या हवेत तुम्ही गुदमरून गेला असता. परंतु हे सारं चोरून करावं लागायचं.

बऱ्याचवेळा आजारी अवस्थेत मी हॉस्पिटलमध्ये पडून राहात होतो. माझ्या कमकुवत मज्जातंतूमुळं अपस्माराचे झटके उद्‌भवत, अर्थात क्वचितच. माझ्या पायाला सधीवाताचा अजूनही त्रास होतो. हे सोडलं तर माझी प्रकृती बऱ्यापैकी आहे. या साऱ्या बारीकसारीक गोष्टीत एका वस्तुस्थितीची भर घाल. पुस्तक हाती लागणं दुरापास्त आणि ते हाती लागलं तरी ते आम्हाला चोरून वाचायला लागत होतं. भोवताली खडाजंगी भांडणं, हेवेदावे, गलिच्छ शिव्यागाळी, किंकाळया, आरडाओरडा आणि हे सगळं अखंड चार वर्षं. हे भयानक होतं असं कुणी म्हणाला तर त्याला माफ करायला हवं. त्यात भरीस भर ही जाणीव : एखाद्या नियमाचा भंग केल्यामुळं कुठल्याही क्षणी आम्हाला जाब द्यावा लागेल, मग साखळदंडात जखडणं आणि उमेदीचं पूर्ण खच्चीकरण. यावरून माझ्या तिथल्या दैनंदिन जीवनाचं चित्र तुझ्यापुढं उभं राहील. या चार वर्षात माझ्या आत्म्यामध्ये, माझ्या श्रद्धांमध्ये, माझ्या ज्ञानामध्ये आणि माझ्या हृदयामध्ये काय काय स्थित्यंतरं घडून आली ते मी तुला सांगणार नाही. ते सांगायचं म्हणजे बरीच लांबण लागेल. परंतु माझ्या अंतरात्म्याबरोबर माझा जो सतत संवाद चालला होता, ज्यायोगे मी कडवट वास्तवापासून निवारा मिळवत होतो, त्याला फळं आली. आता माझ्या गरजा आणि आकांक्षा वाढल्यात, ज्यांचा विचार यापूर्वी मी कधीच केला नव्हता. परंतु मला वाटतंय, हे एखाद्या कूटागत भासतंय, यास्तव आपण ते सोडून देऊ. यद्यपि, एक गोष्ट – मला विसरू नकोस आणि मला वाचव. मला पुस्तकं आणि पैसे हवेत, खिस्ताला स्मरून मला थोडेसे पैसे पाठव.

ओम्स्क हे एक घाणेरडं छोटं गाव आहे. गावात क्वचितच झाडं आढळतील. उन्हाळयात तिथं असते भाजून काढणारी काहिली आणि वाळूने भरलेले वारे. हिवाळयात हिमवादळं. मी गाव अद्याप आतून पाहिलेलं नाही. हे गावच मुळी आहे एक भकास ठाणबंद लष्करी तळ. पूर्णपणे भ्रष्ट. मी अशिक्षित बहुजनसमाजाविषयी बोलतोय. इथं मला काही भली माणसं भेटली नसती तर माझा सर्वनाश ओढवला असता. K.I.I.(Vano)v नं मला सख्ख्या भावाप्रमाणं वागवलं. त्याच्या अधिकारात जेवढं होतं तेवढं त्यानं मला सर्वतोपरी साहाय्य केलं. मी त्याचे थोडे पैसे देणं लागतो. पीटर्सबर्गमध्ये त्याची गाठभेट पडली तर त्याचे

आभार मान. मी जवळजवळ २५ सिल्वर रूबल त्याचं देणं लागतो. परंतु त्याचं आदरातिथ्य, मी केलेल्या विनंतीला मान देण्याची त्याची सदाची तत्परता आणि त्यानं माझी घेतलेली काळजी, दाखवलेली आस्था, जणू काही मी त्याचा सख्खा भाऊ असल्यागत, हे त्याचं ऋण न फेडता येण्याजोगं! आणि तोच एकमेव नाही! जगात भली माणसं खूप आहेत!

याच पत्रात या आधी मी तुला लिहिलंय, तुझं मौन काही वेळेला मला पीडा देते. मला पैसे पाठवल्याबद्दल आभार. तुझ्याबद्दलची प्रत्येक गोष्ट शक्य तेवढ्या तपशीलवारपणे तुझ्या पत्रातच लिही. (तू ते अधिकृत चाकोरीतून पाठवलंस तरी मला अद्याप खात्री नाही की तुझ्याशी पत्रव्यवहार करण्याची परवानगी मला देण्यात येईल). एमिलिया फ्योडोरोवना, मुलं, आपले सारे आप्तेष्ट, मॉस्कोमधले आपले सगेसोयरे, या सर्वांविषयी लिही. मला कळव, कोण मेले, कोण जिवंत आहेत, तुझा धंदा कसा चाललाय, धंद्याची सुरुवात करताना तू कुठलं भांडवल वापरलंस, तो फायदेशीर ठरलाय का, त्यातून तू काही मिळवलंस का आणि शेवटचं, मला आर्थिक मदत करणं तुला शक्य आहे का आणि दर वर्षी मला तू किती पैसे पाठवू शकतोस? दुसरा पत्ता शोधण्यात मला अपयश आलं तरच अधिकृत पत्रामधून पैसे पाठव. दरम्यानच्या काळात पैसे पाठवशील ते मिखाईल पेत्रोविच (मला काय म्हणायचंय, तुला ठाऊक आहे) याजकडून. माझ्यापाशी अद्याप थोडे पैसे आहेत, पण पुस्तकं नाहीत. तुला शक्य असल्यास, चालू वर्षाची काही मासिक मला पाठव – उदा. 'नोट्स ऑफ द फादरलँड'. परंतु आता सांगणार आहे त्याची मला फार निकड आहे. प्राचीन काळचे इतिहासकार (फ्रेंच अनुवाद) आणि आधुनिक अर्थशास्त्रज्ञ (Vico, Guizot, Thierry, Thiers, Ranke इ.) आणि चर्च फादर्स. स्वस्तातल्या स्वस्त आणि सुटसुटीत आवृत्त्या घे. त्या तात्काळ मला पाठवून दे. मला सेमिपालाटिन्स्क येथे पाठवण्यात येणार आहे. ते दूर कुठंतरी किरघीजच्या माळरानावर आहे. माझा पत्ता तुला नंतर पाठवीन. तूर्त माझा पत्ता असा: 'सेवन्थ बटालियन ऑफ द सैबेरियन रेजिमेंट ऑफ द लाईन, सेमिपालाटिन्स्क'. पत्रासाठी हा अधिकृत पत्ता वापर. पुस्तकांसाठी मी तुला दुसरा पत्ता देईन आणि दरम्यानच्या काळात पत्र पाठव : मिखाईल पेत्रोविच याजकडून. पण लक्षात ठेव – मला प्रथम निकड आहे ती जर्मन शब्दकोशाची.

सेमिपालाटिन्स्कमधे माझ्यासाठी काय वाढून ठेवलेलं असेल, याची मला कल्पना नाही. आणि मला त्याची फिकीर नाही. परंतु मला ज्याची फिकीर आहे ते येणेप्रमाणे : 'माझ्या केसचा पाठपुरावा कर, माझ्याखातीर मध्यस्थी करील असा कुणीतरी शोध. एकदोन वर्षात कॉकेशसमध्ये माझी बदली करण्याची तजवीज करणं शक्य आहे का हे शोधून काढ – ते निदान रशियात तरी आहे. माझी ही कळकळीची विनंती आहे – ख्रिस्ताला स्मरून, शर्थीचे प्रयत्न कर, मला विसरू नकोस. या ठिकाणी मी तुला लिहितोय आणि सर्व गोष्टींची, ज्यावर तुझा हक्क

आहे त्यांचीही वासलात लावतोय. तुझ्यावरचा माझा विश्वास अर्थातच ढळलेला नाही. तू माझा भाऊ आहेस आणि तुझं माझ्यावर प्रेम आहे. मला पैशाची निकड आहे – मला जगायलाच हवं. ही वर्षं निष्फळ जाणार नाहीत. मला पैसे आणि पुस्तकं हवीत. माझ्यावर तू जो खर्च करशील तो वाया जाणार नाही. मला पैसे दिल्यानं तुझ्या मुलांच्या तोंडचा घास तू काढत नाहीस. मी त्याची दामदुपटीनं भरपाई करीन, फक्त मी जिवंत राहिलो तरच. का नाही शक्य होणार? सहाएक वर्षांनी, कदाचित त्या आधीही ते प्रकाशित करण्याची ते मला खात्रीनं परवानगी देतील. तुला कल्पना आहे, बऱ्याच गोष्टी बदलू शकतात आणि मी आता टुकार असं काही लिहिणार नाही. माझ्यासंबंधी तुझ्या कानावर येत राहीलच.

आपण लौकरच एकमेकांना भेटू. दोन अधिक दोन म्हणजे किती हे मला पक्कं ठाऊक आहे, तेवढीच खात्री याविषयीही आहे. भविष्यकाल उज्ज्वल आहे. माझं अवघं भवितव्य आणि ज्या गोष्टी मी साधणार आहे त्या साऱ्या माझ्यासमोर मी लख्खपणे पाहातोय. माझ्या इथल्या आयुष्याबाबतीत मी समाधानी आहे. फक्त एकाच गोष्टीची धास्ती आहे – माणसं आणि त्यांचा लहरीपणा. माझ्याविषयी अढी धरून बसलेल्या एखाद्या वरिष्ठाच्या (आणि अशी माणसं आहेत इथं) तावडीत जर का मी सापडलो तर माझ्यात तो दोष काढत राहील आणि माझा सर्वनाश करून टाकील किंवा अवघड काम देऊन माझा जीव घेईल. माझी कळी खुलवण्यासाठी लोक सांगतात मला: "चिंता कशाला, तिथं तुला फक्त सीधीसाधी माणसं भेटतील."

परंतु व्यामिश्र व्यक्तीपेक्षा सीधासाध्या व्यक्तीला मी अधिक घाबरतो. तरीदेखील, माणसं ती माणसंच, मग ती कुठलीही असोत. शिक्षाई परवशतेमधील त्या चार वर्षात दरोडेखोरामधला माणूस वेगळा काढायला मी शिकलोय. विश्वास ठेव माझ्यावर, त्यांच्यामध्ये गंभीर, कणखर प्रवृत्तीचे, चांगल्या स्वभावाचे असतात आणि जाड्याभरड्या आवरणाखाली सोनं आढळणं किती सुखद असतं! एखादा दुसराच नव्हे तर असे असंख्य नमुने मला आढळून आलेत. काहीजण तर असे की त्यांच्याबद्दल आदर न बाळगणं केवळ अशक्य आणि काही निश्चितच कौतुक करण्याजोगे. तिथं एक मिरकासिन होता (दरोड्यासाठी त्याला धाडण्यात आलं होतं) त्याला मी रशियन बोलायला आणि लिहायला शिकवलं. त्यानं वेळोवेळी जी कृतज्ञता दाखवली ती तू पहायला हवी होतीस. मी सोडून चाललोय म्हणून माझा निरोप घेताना दुसरा एक सोबती रडला. त्याला मी थोडे पैसे दिले होते – पण ते असूनअसून कितीसे? परंतु माझं डोकं ठिकाणावर नसतानाही त्याची कृतज्ञता अपार होती. मी त्याच्यावर झट्‌कन चिडायचो, वैतागायचो. माझ्या मनोवस्थेची ते कदर करायचे आणि सारं विनातक्रार सोसायचे. तुरुंगाच्या कँपमधून सामान्य माणसांचे आणि व्यक्तिमत्वांचे नानाविध नमुने मी माझ्यासंगे घेऊन आलेय. मी त्यांच्याबरोबरीनं जगलोय आणि म्हणून मला वाटतं की मी त्यांना चांगल्याप्रकारे ओळखतो.

उडाणटप्पूंच्या, दरोडेखोरांच्या, त्यांच्या दुःखी आणि दयनीय जीवनाच्या असंख्य कहाण्या मी ऐकल्यात. त्यांचे ग्रंथावर ग्रंथ होतील. किती मस्त माणसं! एकंदरीत, माझा वेळ वाया गेला नाही. मी रशिया पाहिलेला नसेन, पण रशियन माणसं मला चांगल्या प्रकारे समजली, कदाचित्, तेवढ्या चांगल्या प्रकारे फारच थोड्यांना समजली असतील. शक्यता आहे, यात प्रौढीचा अंश असेल, परंतु मला आशा आहे, ती क्षम्य आहे.

तुझ्या आयुष्यातील अत्यंत महत्त्वाच्या गोष्टींबद्दल मला निश्चित लिही. तुझी अधिकृत पत्रे सेमिपालाटिन्स्कच्या पत्त्यावर आणि अनधिकृत कुठं, तुला ठाऊक आहे. पीटर्सबर्गमधील आपल्या साऱ्या परिचितांबद्दल लिही, साहित्यासंबंधी (शक्य तेवढ्या काटेकोरपणे) लिही. आपला भाऊ कोल्या काय करतोय? आपली छोटी बहीण सारोन्का कशी आहे? (आणि हे अत्यंत महत्त्वाचं आहे). आपले काका अद्याप जिवंत आहेत का? आणि आपला भाऊ अँड्री कसा आहे? आपली बहीण वेरुश्का हिच्यामार्फत मी आत्याला लिहीत आहे – हे साधण्यासाठी खास संधीचा लाभ मी उठवतोय. ते पत्र गुप्तरीत्या पाठवण्यात येतंय. आणि परमेश्वराला स्मरून, या पत्रासंबंधीही वाच्यता करू नकोस, जाळूनही टाक – दुसऱ्या लोकांचा जीव धोक्यात यायला नको.

माझ्या लाडक्या भावा, मला पुस्तकं पाठवायला विसरू नकोस, खास करून, इतिहासकार, अर्थशास्त्रज्ञ, "नोट्स ऑफ द फादरलँड", द चर्च फादर्स आणि चर्चचा इतिहास. ही क्रमाक्रमानं पाठव, सर्व एकदम पाठवू नकोस. परंतु ती पाठवायला तात्काळ सुरुवात कर. तुझा खिसा जणू माझा स्वतःचा असल्यासारखा मी वागतोय. तुझी आर्थिक परिस्थिती कशी आहे याची कल्पना मला नाही. त्यासंबंधीची नीट कल्पना येण्यासाठी सद्यःस्थितीविषयी मला लिही. पण लक्षात असू दे, ग्रंथ म्हणजे जीवन; ते माझं अन्न आहे आणि माझं भवितव्य आहे! म्हणून, परमेश्वराला स्मरून, मला वाऱ्यावर सोडून देऊ नकोस. मेहरबानी कर. पुस्तकं अधिकृतरीत्या पाठवण्याची परवानगी तुला मिळू शकेल का हे शोधून काढ. पण त्यासंबंधी तू खबरदारी मात्र घे. ते अधिकृतरीत्या मान्य असेल तर ती पाठव. नसल्यास के. आय. च्या भावामार्फत त्याच्या पत्त्यावर पाठव, तिथून ती माझ्याकडे पाठवण्याची व्यवस्था होईल. यावर्षी के. आय. स्वतः पीटर्सबर्गला असेल. तो सर्व काही तुला सांगेल. काय कुटुंब आहे त्याचं आणि काय पत्नी! ती तरूण बाई आहे. डिसेंब्रिस्ट आन्नेकोवची कन्या. काय अंतःकरण, काय स्वभाव आणि त्यांना किती सोसावं लागलं!

सेमिपालाटिन्स्कला मी आठवड्याभरात जाईन. तिथं दुसरा पत्ता मिळतो का त्याचा शोध घेऊन तुला कळवतो. माझी प्रकृती अद्याप तशी बरी नाही आणि म्हणून माझं प्रयाण थोडसं लांबलंय. मला Carus, कांटचं 'Critique de raison pure' पाठव आणि अनधिकृतरीत्या पाठवण्याची सोय असल्यास हेगेल



अनुक्रमणिका

पाठव, विसरू नकोस, विशेषतः हेगेलचं "हिस्टरी ऑफ फिलॉसफी". माझं अवघं भवितव्य या पुस्तकांशी जोडलं गेलंय! परमेश्वराला स्मरून शर्थीचे प्रयत्न करत रहा आणि माझी बदली कॉकेशसला करण्यासाठी त्यांना विनंतीअर्ज पाठव. शिवाय ज्यांना माहिती आहे अशा लोकांकडून शोधून काढः प्रकाशित करण्याची परवानगी मिळवण्याचे काही मार्ग आहेत का, आणि एखाद्यानं ते कसे चोखाळावेत. दोनतीन वर्षांनी मी विनंतीअर्ज करीन. तोवर, कृपाकरून माझं संगोपन कर. पैसे नसतील तर लष्करी कामकाज मला भरडून काढील. यास्तव, विसरू नकोस. आपल्या इतर नातलगांचं काय? प्रारंभ करायला तरी मला ते मदत करतील असं वाटत नाही तुला? मदत करायची असल्यास, त्यांनी पैसे तुला देऊ दे आणि ते तू मला पाठवून दे. परंतु आत्या आणि वेरोश्का यांना लिहिलेल्या पत्रात मी त्यांच्यापाशी पैशाची मागणी केलेली नाही. त्यांच्या काळजीनं त्यांना प्रेरणा दिली तर त्या स्वतःच ते ताडतील.

सेवोस्टोपोल सोडतानाः फिलिप्पोवनं भेट म्हणून मला २५ सिल्वर रूबल्स दिले होते. त्यानं ते कमांडट नॅबोकॉवकडे देऊन ठेवले होते, त्यामुळं त्यासंबंधी मला पूर्वकल्पना नव्हती. त्याला वाटलं असणार, माझ्यापाशी पैसे नसावेत. तो फार सहृदयी आहे. आम्ही सारे 'तडीपार' जिवंत राहाणं कसंबसं साधतो. टोलन तुरुंग-छावणीतली त्याची मुदत संपवलीय, आता तो टोम्स्कमध्ये आहे आणि त्याचं चांगलं चाललं आहे. यारअझेम्बस्कीची तारामधील मुदत संपत आलीय. स्पेशनेव इर्कुत्सुक प्रांतात आहे, तिथं त्यानं प्रत्येकाचं प्रेम आणि आदर मिळवलाय. या माणसाचं प्रारब्ध अनन्यसाधारण आहे! जिथं जिथं, जेव्हा जेव्हा तो प्रवेश करतो, तिथं तिथं, तेव्हा तेव्हा, भेट होणंही दुर्लभ अशी माणसं उत्स्फूर्तपणे त्याच्याभोवती श्रद्धेनं आणि आदरानं गोळा होतात. पेत्राशेवस्कीला पूर्वीप्रमाणंच अद्याप पाचपोच कमीच. मोम्बेली आणि ल्वोव यांची प्रकृती चांगली आहे आणि बिचारा ग्रिगोरिएव ठार पागल झालाय आणि तो हॉस्पिटलमध्ये आहे.

आणि तुझं कसं काय? अजूनही तू मादाम प्लेश्चेएवला भेटतोस का? तिचा मुलगा कसा आहे? तो ओरक्स किल्ल्यात असल्याचं, इथून पुढं जाणाऱ्या तडीपारांकडून माझ्या कानी आलं आणि गोलेविन्स्की आता बराच काळ कॉकेशसमध्ये आहे. साहित्यासाठी तू काय करतोयस आणि साहित्य तुला कशी वागणूक देतेय? काहीतरी लिहिणं चालू आहे का तुझं? क्रोशेवस्की कसा आहे आणि तुझे त्याच्याशी संबंध कसे आहेत? ओस्ट्रोवस्कीविषयी माझं मत चांगलं नाही, पिसेम्स्कीचं मी काहीही वाचलेलं नाही आणि ड्रुझिनिन माझं पोट ढवळून काढतो. येवगेनिया टुर यानं माझी उत्सुकता वाढवलीय, मला क्रेस्टोवस्कीसुद्धा आवडतो.

तुला आणखीन बरंच लिहायला मला आवडलं असतं, परंतु एवढा काळ लोटलाय, हे पत्र लिहिणंही अवघड जातंय. परंतु, आपल्या एकमेकांविषयी ज्या भावना होत्या त्या फारश्या बदललेल्या असण्याची शक्यता नाही. मुलांचं चुंबन घे.





अनुक्रमणिका

त्यांच्या फेड्याकाकाची आठवण त्यांना अद्याप आहे? आपल्या साऱ्या मित्रांना माझ्या स्नेहभावना दे. परंतु हे पत्र अगदी गुप्त ठेव. बराय, माझ्या लाडक्या दोस्ता, फेअरवेल! माझ्याविषयी तुझ्या कानी येत राहील, आपली भेटही होईल. होय, आपण खात्रीनं एकमेकांना भेटणार. बराय. मी लिहिलेलं सर्व काळजीपूर्वक वाच. वरचेवर लिही (अधिकृतरीत्याच पाठवायचं असलं तरीही) तुला आणि तुझ्या समस्त कुटुंबियांना माझी असंख्य आलिंगनं.

तुझा

ता.क.: मी किल्ल्यात लिहिलेली "चाईल्डस फेअरी टेल" तुला मिळाली का? मिळाली असल्यास तशीच ठेव, कुणाला पाठवू नकोस. १८५० मध्ये 'द डबल' ज्यानं लिहिली तो हा चेरेनोव कोण?

गुड-बाय! तुझा
डोस्टोएवस्की
२२ फेब्रुवारी

सेमिपालाटिन्स्कला मी उद्या प्रयाण करीन, मला खात्रीलायकरीत्या कळलंय. के. आय. इथं मे पर्यंत राहील. तुला मला काही – उदा. पुस्तकं – पाठवायचं असेल तर मला वाटतं तू अजूनही पाठवू शकतोस. पत्ता जुनाच, मिखाईल पेत्रोविच.

सेमिपालाटिन्स्कसाठी मी तुला दुसरा पत्ता (अनधिकृत) बहुधा देऊ शकेन. परंतु तू मात्र शक्यतो लौकर आणि वरचेवर लिहीत जा आणि परमेश्वराला स्मरून, माझ्या केसच्या कामाला लाग. कॉकेशसला वा सैबेरियाच्या बाहेर कुठंही जाणं मला शक्य होणार नाही का? आता मी कादंबऱ्या आणि नाटकं लिहीन, आणि मला खूप खूप वाचायला हवं. तर मग मला विसरू नकोस, आणि पुन्हा एकवार गुड-बाय.

सर्व मुलांचे मुके घे, तुझा,

गुड-बाय.

●

---

जगाला परिचित असणारे चार सर्वश्रेष्ठ कादंबरीकार म्हणजे बाल्झॅक, डिकन्स, टॉलस्टॉय आणि दोस्तोएवस्की! या चौघांनी आपापल्या मातृभाषांतून लेखन करीत असताना शैलीची क्वचितच काळजी घेतली. यावरून असेच सिद्ध होते की, तुम्हाला जर कथा सांगता येत असेल, निरनिराळ्या व्यक्तिरेखा उभ्या करता येत असतील आणि तुमच्याजवळ प्रामाणिकपणासह उत्कटता असेल तर तुमची शैली कशी आहे याचा विचार कोण करतंय?

– *सॉमरसेट मॉम*

---



अनुक्रमणिका

# भाषा आणि साहित्य

## साक्षरतेचा पेचप्रसंग

नाना जोशी

तंत्रवैज्ञानिक बदलाचा वेग जसजसा वाढतो आहे, तसतसा सामाजिक जीवन आणि मानवी जाणिवा यावर होणारा त्याचा परिणाम हाही दिवसेंदिवस अधिक प्रमाणात दृष्टोत्पत्तीस येऊ लागला आहे. आपणास वाढत्या प्रमाणात अशी जाणीव होऊ लागली आहे की, तंत्रविज्ञानाच्या मदतीने एखादी गोष्ट कशा प्रकारे करतात यातच फक्त बदल होत नाही, तर सामान्य लोक त्या गोष्टीबद्दल ज्या प्रकारे विचार करतात आणि त्याहीपलीकडे जाऊन ते जो काही व कशाचा विचार करतात, त्या विचार करण्याच्या पद्धतीतही बदल होत. (दूरध्वनीने समाजजीवनावर झालेला परिणाम हे या संबंधातले एक मोठे उदाहरण) माणसे एखादी गोष्ट वा कृती कशी करतात व त्यासंबंधी विचारही कसा करतात, त्यावरून ज्ञान मिळविण्याचे व ते विस्तारित करण्याचे मार्ग आणि त्या ज्ञानाचे स्वरूप यांच्या सीमाही निश्चित होतात. हे असे असल्याकारणाने माहिती जमा करणे, ती साठवणे, त्यात व्यवस्था आणणे आणि ती माहिती एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी पोचविणे यासंबंधीही दूरगामी ठरणारे परिणाम होतात. माहिती जमा करण्याची अनेक तंत्रविज्ञाने आहेत – मौखिक, लिखित, मुद्रित आणि इलेक्ट्रॉनिक ही त्यातील प्रमुख तंत्रविज्ञाने. यातील प्रत्येक तंत्रविज्ञानाने, आपल्याला अनुरूप होईल अशा प्रकारचे 'सत्य' – म्हणजेच यातील प्रत्येक तंत्रविज्ञानाचे वेगळे व निराळे सत्य – निर्माण केले आहे. सत्य या शब्दाद्वारे – शहाणपण, ज्ञान, माहिती आणि सरतेशेवटी आपण ज्यांना गृहीत धरलेल्या गोष्टी (DATA) म्हणतो, त्या सर्व गोष्टी सूचित होतात. एका तंत्रविज्ञानातून दुसऱ्या प्रकारच्या तंत्रविज्ञानात संक्रमण होत असताना, पाश्चिमात्य समाजात, प्रमुख व महत्त्वाचे असे ऐतिहासिक बदल घडून आल्याचे दिसते. आपण सध्या अशाच एका तंत्रवैज्ञानिक बदलाच्या (मुद्रित तंत्रविज्ञानातून इलेक्ट्रॉनिक तंत्रविज्ञानात प्रवेश) आवर्तात सापडलो आहोत. अठराव्या शतकात पाश्चिमात्य समाजाचे, मौखिक तंत्रविज्ञानातून मुद्रित तंत्रविज्ञानात संक्रमण होत असताना, त्या संक्रमणाबरोबर आलेल्या 'साक्षरता पेचप्रसंगा'कडे पाहिल्यानंतर, आपण सध्या ज्या 'साक्षरता पेचप्रसंगा'च्या आवर्तात आहोत व ज्यास आपणाला सामोरे जावे लागत आहे, त्या विषयीची आपली समज अधिक वाढेल. त्या पेचप्रसंगाची प्रकृती काय आहे, त्यात अंतर्भूत असलेल्या बैद्धिक आणि सामाजिक बदलांच्या कक्षा किती विस्तृत आहेत. याबद्दलही आपणास अधिक जाण येईल.

'साक्षरता पेचप्रसंग' हा शद्बप्रयोग १९६० साली प्रथम वापरात आला.

मातृभाषेच्या शिक्षणात, ती भाषा लिहावयास व वाचावयास येण्याची कौशल्येही अनुस्यूत आहेत. अमेरिकेतल्या शाळातून, ह्या कौशल्यांची फार मोठ्या प्रमाणात घट झाल्याचे १९६० साली दिसून आल्यानंतर, त्या एकंदर प्रक्रियेचे वर्णन करण्यासाठी 'साक्षरता पेचप्रसंग' हा शद्बप्रयोग तयार करण्यात आला. अमेरिकेतील 'लोकसंख्या गणना' कचेरीने १९८२ साली एक पाहाणी केली. या पाहाणीस आधारभूत म्हणून, वयात आलेल्या ३४०० व्यक्तींची साक्षरतेसंबंधी एक परीक्षा घेण्यात आली. ही परीक्षा अतिशय साधी व सोपी होती. त्या पाहाणीत असे आढळून आले की वयात आलेल्या एकंदर अमेरिकनात १३ टक्के लोक निरक्षर आहेत आणि ८७ टक्के लोक साक्षर. यापैकी ज्या कोणास वाचावयास येत होते, त्यांची साक्षरता कोठच्या प्रतीची आहे हे ठरविण्यासाठी दुसऱ्या आणखी काही पाहाण्या करण्यात आल्या. त्या पाहाण्यातून असे आढळून आले की सर्व-सामान्य माणसाचे वाचन दिवसेंदिवस कमी होत चालले आहे. विशेषतः पुस्तकांचे वाचन फारच कमी झालेले आहे. वयात आलेल्या सर्व अमेरिकनांपैकी जवळ जवळ ६० टक्के लोक आपल्या उभ्या आयुष्यात एकही पुस्तक वाचीत नाहीत. बाकीच्या सुमारे ४० टक्क्यांपैकी बहुसंख्य लोक दरवर्षी सरासरी फक्त एकच पुस्तक वाचतात. इंग्लंडमधील परिस्थितीही याहून वेगळी नाही. इंग्लंडमध्येही वाचकांच्या संख्येत झपाट्याने व तीव्रतेने घट होते आहे. अमेरिकेतल्या 'साक्षरता पेचप्रसंगांचे' वर्णन येणेप्रमाणे करण्यात येते. हे वर्णन अतिशयोक्त आहे असे कोणास वाटेल. पण वस्तुतः ते अगदी अचूक असेच आहे. (इंग्लंड आणि अमेरिका या दोन्हीही देशात सर्वसामान्य माणसाचे वाचन, या संबंधीची परिस्थिती व वळण हे जवळ जवळ सारखेच व एकाच पातळीवर आहे.)

अमेरिकेत साक्षरतेसंबंधी अनेक प्रकारच्या अनेक पाहाण्या झाल्या आहेत. त्यातील प्रत्येक पाहणीत, सर्वसामान्य अमेरिकन व्यक्ती किती व काय वाचते, या संबंधीचे जे आकडे उपलब्ध झाले आहेत त्यात फारच तफावत आहे. त्यातील एका पाहाणीत तर असे आढळून आले की सध्या साक्षरतेच्या प्रमाणात वस्तुतः तशी अजिबातच घट झालेली नाही. आपणा सर्वांचाच 'आकड्यांवर' साधा-सरळसोट 'विश्वास' असतो. परंतु 'साक्षरता' या संकल्पनेसंबंधी विचार करताना तो 'विश्वास' जरा बाजूस ठेवूनच विचार करावा लागतो.

'निरक्षरता' ही एक अशी संकल्पना आहे की तिची अगदी रेखीव व आखीव अशी व्याख्या करता येत नाही. (फक्त आपली स्वतःची सही करता येणारी व्यक्ती 'साक्षर' आहे, असे म्हणावे लागेल.) पाचशे शद्बांचे पुस्तक वाचणारा साक्षर की हजार शद्बांचे पुस्तक वाचणारा साक्षर? साक्षर नाही तो निरक्षर आहे असे मानले, तर साक्षर कोणास म्हणावयाचे? फक्त आपली स्वतःची सही करता येणारा, पाचशे शद्बांचे पुस्तक वाचणारा की हजार शद्बांचे पुस्तक वाचणारा. यापैकी ज्यास आपण साक्षर म्हणणार त्यानुसार निरक्षरतेची व्याख्या बदलणार. म्हणूनच निरक्षरता किती याची मोजदादही नीट व तंतोतंत करता येत नाही,



अनुक्रमणिका

परंतु अमेरिकन समाजात 'निरक्षरता' दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणात वाढतेच आहे, ही समजूत समाजातल्या सर्व थरात आढळून येते. निरक्षरता ही अत्यंत गंभीर अशी समस्या आहे. ती इतकी गंभीर आहे की त्याकारणाने राष्ट्र धोक्यात आले आहे, असाही विचार त्या समजुतीत अंतर्भूत आहे.

विज्ञान या शास्त्रात जगातील निसर्गाचा अभ्यास होतो. या अभ्यासात वस्तुस्थिती कशी दिसते, भासते, वाटते यापेक्षा ती प्रत्यक्षात काय आहे, यावर भर असतो. या अथवा अन्य सामाजिक वस्तुस्थितीत सरतेशेवटी प्रत्यक्षातील वस्तुस्थितीला भरभक्कम अस्तित्व असतेच असे नाही. अवतीभोवतीच्या सामाजिक जगात, आपणास जी वस्तुस्थिती आहे असे वाटते व दिसते त्यानेच समाजाच्या भविष्यकाळाला आकार येतो व वळण मिळते. निदान प्रत्यक्षात वस्तुनिष्ठपणे अस्तित्वात असलेल्या वस्तुस्थितीने भविष्यकाळाला जितका आकार व वळण मिळते तितके तरी खासच मिळते.

मुद्रण युगाच्या या अखेरीच्या काळात जो 'साक्षरता पेचप्रसंग' अस्तित्वात आहे, त्याची व्याप्ती अगदी विस्तृत अशीच आहे. प्राथमिक शाळातील निरक्षरता, हा त्या पेचप्रसंगाच्या अनेक पैलूंपैकी एक. तो अतिशय महत्त्वाचा आहे यातही शंका नाही. परंतु विद्यमान परिस्थितीतील अतिशय विस्तृत अशा 'साक्षरता पेचप्रसंगाचा' तो एक महत्त्वाचा भाग आहे, अशी समजूत सर्वत्र आढळते ती तितकीशी बरोबर नाही. लोक दिवसेंदिवस कमी कमी लिहितात आणि कमी कमी वाचतातही. त्याचबरोबर दूरचित्रवाणी पाहाण्याचे, परस्परांशी संपर्क साधण्याची दूरध्वनी, संगणक यासारखी आणि दुसरी अनेक साधने वापरण्याचे प्रमाण दिवसेंदिवस वाढलेच आहे. ही सारी परिस्थिती पाहून प्रख्यात समीक्षक जॉर्ज स्टाईनर यांनी पुढील उद्‌गार काढलें आहेत. ते म्हणतात, 'वाचनाचे आदर्श (classical) युग आता हळू हळू नष्ट होत आहे, असे आपणा सर्वांनाच अजिकाल आढळून येते. त्या आदर्श वाचनयुगात ग्रंथाकडे पाहाण्याचा एक खास वैशिष्ट्यपूर्ण असा दृष्टीकोन होता. उच्च प्रतीची आणि जिला काही खास हक्क व अधिकार आहे असे वाटावे, अशी साक्षरता तेव्हा विद्यमान होती. सर्वसामान्यपणे एरॅसमस यांच्या कालखंडापासून (इस. १६०० च्या आसपास), मध्यमवर्गीयांचे या जगात असलेले वर्चस्व आणि त्या वर्गाशी संलग्न असणारी शिक्षणपद्धती आणि मूल्ये ही दोन्ही जेव्हा काही प्रमाणात तरी कोलमडून पडली, त्या कालखंडापर्यंतचा काळ, हा त्या आदर्श वाचनयुगाचा कालखंड आहे. जॉर्ज स्टाईनर यांचे हे सांगणे किती अचूक आहे याचा प्रत्यय आपणा सर्वांस आता येऊ लागला आहे. या ठिकाणी आणखी एक मुद्दा स्पष्ट करणे महत्त्वाचे आहे. आदर्श वाचनयुग संपुष्टात येत आहे, याचा अर्थ मुद्रित साहित्य अथवा वाचनीय असे मुद्रित साहित्य, यापुढच्या काळात अजिबात नाहीसे होईल असे नाही. खरे म्हणजे तो प्रश्नच उपस्थित होत नाही. पुढील आकडेवारीवरून हा मुद्दा स्पष्ट होईल. १९७० साली अमेरिकेत ३६०७१ नवी पुस्तके प्रसिद्ध झाली. १९८४ साली ही संख्या ५१०५८ च्या घरात पोचली

होती. भविष्यकाळात मुद्रित पुस्तकांचेच प्रमाण याहीपेक्षा वेगाने वाढण्याची शक्यता नाकारता येत नाही. कारण जुनी मुद्रणयंत्रे जाऊन त्यांच्या जागी नव्या प्रकारची मुद्रण यंत्रे व साधने आली आहेत व येत आहेत. उदा., कम्पुटर प्रिंटआउट, डेस्क टॉप प्रकाशन, मायक्रोफिल्मस आणि फिच, लेझर तबकड्या (या तबकड्यांवर लाखो शब्द नोंदविता येतात) कम्पुटर डेटाबेस – या स्वरूपात साठविता येणारी वाचनीय अशी अनेक प्रकारची माहिती, इत्यादी इत्यादी. मुद्दा एकच, मुद्रित साहित्य आणि वाचनीय असे मुद्रित साहित्य नाहीसे होणार नाही. खरे म्हणजे आपण साक्षरतेचा अंत अनुभवत नसून, एक वेगळाच अनुभव घेत आहोत. आपण साक्षरतेचा शेवट पाहात नसून, आपण ग्रंथसंस्कृती आणि ग्रंथ या दोन्हीचाही शेवट पाहात आहोत. हा ग्रंथयुगाचा अंत, ग्रंथ आणि वाचता येण्याजोगे साहित्य या दोन्हीचाही महापूर आल्याकारणाने समीप अला आहे. हे सारे साहित्य वेगवेगळ्या प्रकारची माहिती देते हे खरे. परंतु ही माहिती अनेकवेळा परस्परांना छेद देणारीही असते. ग्रंथांचा महापूर अल्याकारणाने ग्रंथ नाहीसे झाले, हे विधान अंतर्विरोधी वाटले, तरी ते सत्य आहे. प्रख्यात फ्रेंच लेखक, ज्ञानकोशकार आणि समीक्षक डिडरो यांनी हे भविष्य अनेक वर्षापूर्वीच वर्तविले होते. त्यांनी असे म्हटले होते की, 'शतकानुशतके जातील तसतशी ग्रंथांच्या संख्येत सातत्याने वाढ होतच राहील आणि त्यावरून आपणास पुढील भविष्य वर्तविता येईल. एक काळ असा येईल की अवतीभोवतीच्या विश्वाचा प्रत्यक्ष अभ्यास करून शिक्षण घेणे व ज्ञान मिळविणे जेवढे कठीण होईल, तेवढेच ग्रंथांचा अभ्यास करून काही शिकणे कठीण होईल. ''छापखाना कधीही विश्रांती घेत नाही''. हा छापखाना 'प्रचंड इमारती ग्रंथांनी भरून टाकील'. या इमारतीत जाणारे वाचक फारसे वाचन करणारच नाहीत. त्या ऐवजी, ते काही नवीन असेल किंवा त्यांस जे नवीन आहे असे वाटते, त्याविषयी संशोधन करण्याच्या कामास स्वतःस वाहून घेतील (उदा., सध्या अनेक भाषातल्या अनेक ग्रंथातून जे ज्ञान प्रकाशित झाले आहे, त्याचा एक छोटा कोपरा देखील जर आपणास माहीत नसेल व त्याबद्दल आपण फारच अज्ञानी असलो, तर मग आपल्यानंतर येणाऱ्या ज्या पिढ्या आहेत त्यांनी, आपल्या अगोदरच्या व त्यांच्या समकालीन अशा असंख्य (यात सातत्याने भर पडत असते) ग्रंथातील माहितीबद्दल अज्ञान असणे हे स्वाभाविकच आहे. कारण आपल्या विद्यमान काळाअगोदर अस्तित्वात असलेल्या ग्रंथसंख्येत, आता शेकडो नव्हे हजारो पटींनी भर पडतच असते) आणि सरतेशेवटी ज्ञानाचे विश्व म्हणजेच आपले आजकालचे विश्व हे ग्रंथांच्या महापुरात बुडून नाहीसे होईल.

मुद्रणकला आणि त्या कलेची वैशिष्ट्यपूर्ण अशी निर्मिती – ग्रंथ – या दोहोंनाही ज्ञानजगतात एक हक्काचे व मानाचे स्थान होते. ते स्थान वरील परिच्छेदात उल्लेखिलेल्या आणि इतर कारणांमुळे हळूहळू गमवावे लागत आहे. 'जे छापून आले ते सत्य' – असा समज गेली सुमारे पाचशे वर्ष युरोपीय संस्कृतीत होता. (भारतीय संस्कृतीत गेली दोनशे वर्षे तसा समज आहे. छाप्यात आले आहे

– ही त्याची भारतीय आवृत्ती) निदान पाश्चिमात्य संस्कृतीत तरी ज्ञान मिळविण्याचे एकमेव मूळ व अस्सल महत्त्वाचे साधन या स्वरूपात ग्रंथांचे महत्त्व जवळ जवळ नाहीसे होत चालले आहे. अमेरिकेतले बहुसंख्य विद्यार्थी आजकाल असे सांगतात की 'आम्ही छापलेल्या कागदावरच्या माहितीपेक्षा, संगणकाच्या पडद्यावरती आम्हास जी माहिती वाचावयास मिळते, त्यावर अधिक विश्वास ठेवतो. ती अधिक अचूक आहे असे मानतो.' हा अनुभव दिवसेदिवस अनेक लोकांना येईल. अशा लोकांचे प्रमाण फारच झपाट्याने यापुढे वाढणार आहे याबद्दलही शंका नाही. परंतु या सर्वांचा परिणाम एकच होणार. तो म्हणजे, वाचनालये, त्या वाचनालयातील विशिष्ट माहिती देणाऱ्या ग्रंथांनी भरलेल्या खोल्या, आमच्या ग्रंथालयात एका विशिष्ट विषयावरचे महत्त्वाचे ग्रंथ उपलब्ध आहेत असे मोठ्या अभिमानाने सांगणारी संशोधन ग्रंथालये, ही सारी ठिकाणे आता यापुढे ज्ञान प्राप्त करून घेण्याची एकमेव व वैशिष्ट्यपूर्ण स्थाने आहेत असे कोणी मानणार नाही. एखाद्या प्रचंड ग्रंथालयात बसून अगदी शांतपणे वाचन करीत, त्यावर चिंतन करून, ज्ञान मिळविणारी व्यक्ती – ज्ञान सातत्याने जमा करणाऱ्या व्यक्तीची – अशी कायम ज्ञान व संशोधक व्यक्तीची प्रतिमा आपल्या मनाशी कल्पिलेली असते. भविष्यकाळात, या प्रतिमेचे वैशिष्ट्य दिवसेदिवस कमी कमी होत जाणार आहे.

ग्रंथ आणि ग्रंथवाचन या दोन्हींच्या युगांचा अंत अगदी समीप आला आहे असे जे आपल्याला वाटते, त्याचा ग्रंथविनाश हा जणू वस्तुनिष्ठ असा आविष्कार आहे. वाचनालये ही ग्रंथ आणि मुद्रणसंस्कृतीची महान प्रतीके व स्मारके समजली जातात. या अशा वाचनालयातील कपाटातून, आपल्या डोळ्यादेखत दिवसाढवळ्या अक्षरशः शेकडो ग्रंथ विनाश पावत आहेत. १८७० सालानंतर एका विशिष्ट प्रकारच्या लगद्यापासून कागद तयार होऊ लागला. परंतु या अशा प्रकारे तयार झालेल्या कागदाचे, कालांतराने विघटन होते. त्याचे एक प्रमुख कारण तो लगदा तयार करताना जे रसायन वापरण्यात येते, ते रसायन आहे ॲलम-रोझिन (Alam-Rosin). कागदावर शाई नीट व्यवस्थित पसरावी यासाठी या रसायनाचा वापर होतो. या रसायनाच्या वापराने शाई नीट व्यवस्थित पसरते हे खरे. परंतु त्याजबरोबर त्या रसायनाचे हवेतील दमटपणाबरोबर मिश्रण होऊन त्याचे एक आम्ल तयार होते. या आम्लाचे परिणाम कागदाच्या पोतावर होतात. कागद तयार करण्यासाठी लगदा वापरतात याचा उल्लेख वर झाला आहेच. या लगद्यातील तंतू एकमेकांशी अगदी एकजीव झाल्यासारखे होऊन त्यातून नंतर कागद तयार होतो. आम्लामुळे हे तंतू एकमेकांपासून विलग होतात. त्यांना एकजीव करणारे बंध विनाश पावतात. आम्लविरोधी रसायनांनी ही रासायनिक प्रक्रिया रोखता येईल हे खरे. परंतु ही आम्लविरोधी प्रक्रिया अतिशय कठिण अशी प्रक्रिया आहे याचा आपण विसर पडू देता नये. या कठिण अशा रासायनिक प्रक्रियेचा वापर करून काही ग्रंथ आपणास निश्चितपणे वाचविता येतील. तसेच आणखी काही ग्रंथ मायक्रोफिल्म करून वाचविता येतील. परंतु या दोन्ही उपायांना प्रचंड मनुष्यबळ लागते आणि

ते दोन्हीही उपाय फार खर्चिक उपाय आहेत. म्हणूनच त्यांचा उपयोग मुक्त हस्ताने करता येणार नाही. थोडक्यात ग्रंथ वाचविण्याचे हे उपाय वापरूनही, विनाशाच्या उंबरठ्यावर असलेल्या ग्रंथांपैकी फारच थोडे ग्रंथ वाचविता येतील. थोडक्यात बहुसंख्य ग्रंथांना जीवदान मिळणार नाही. त्या दृष्टीने आता फारच उशीर झाला आहे. अमेरिकेतल्या प्रख्यात संशोधनकेंद्रात उपलब्ध असलेल्या ग्रंथसंपत्तीपैकी निदान ४०% ग्रंथ तरी वाचकाच्या दृष्टीने लवकरच निकामी होतील. कारण, हे ग्रंथ हातात घेऊन त्यांची पाने कोणी उलटली तर त्यातील प्रत्येक पान सुटे होईल; व सरतेशेवटी त्या पानाचेही विघटन व विलगीकरण होईल. अमेरिकेतल्या येल या प्रसिद्ध विद्यापीठात स्टर्लिंग या नावाचे विश्वविख्यात ग्रंथालय आहे. या ग्रंथालयात सुमारे चाळीस हजार ग्रंथ आहेत. या ग्रंथांची संख्याशास्त्रीय पाहाणी केली असता पुढील गोष्टी आढळून आल्या. स्टर्लिंग ग्रंथालयातील एकंदर ग्रंथांपैकी ३७% ग्रंथांची पाने ही फारच तकलादू आहेत. यातील कोणत्याही एका ग्रंथातील एखाद्या पानाची घडी घालण्याचा कोणी प्रयत्न केल्यास त्या पानाचा तुकडा पडेल, इतकी ती तकलादू झाली आहेत. स्टर्लिंग ग्रंथालयातील ८३% ग्रंथ असे आहेत की त्या ग्रंथात वापरलेला कागद हा वातावरणातील दमटपणा आणि ॲलम-रोझिन या रासायनाची, रासायनिक प्रक्रिया होऊन त्याचे विघटन होईल, अशा प्रकारचा कागद असल्याकारणाने, त्याचे विघटन होणार हे ओघानेच आले. येल विद्यापीठातील स्टर्लिंग वाचनालयासंबंधी १९८७ साली एक अहवाल तयार करण्यात आला होता. या अहवालानुसार, 'सर्वच ग्रंथालयातील सर्वच ग्रंथ, हे विनाशक अशा टाईम-बॉम्बवर उभे आहेत'.

एवंच, ग्रंथ आणि ग्रंथवाचन या दोन्ही गोष्टी आता भूतकाळात जमा होत आहेत. भविष्याकाळ हा इलेक्ट्रॉनिक युगाचा. रसायनशास्त्र, त्याच्या जोडीला अर्थशास्त्र ही दोन्ही शास्त्रे ग्रंथसंस्कृतीऐवजी इलेक्ट्रॉनिक युगाला अधिक पसंती दर्शवीत आहेत असे दिसते. कोठच्याही ग्रंथालयाला प्रथम ग्रंथ विकत घ्यावे लागतात, नंतर त्याचे वर्गीकरण करावे लागते; वर्गीकरण केल्यानंतर ते वाचकाला उपलब्ध करून देणे, आणि अन्य प्रकारची देखभाल करणे या सर्व कामास चांगलेच द्रव्य खर्च करावे लागते. या आवश्यक खर्चात दिवसेंदिवस प्रचंड प्रमाणात वाढ होत आहे. या एका संकटाबरोबरच दुसरे एक संकट आहे. अमेरिकन सरकारने प्रकाशकांसमोर एक नवी अडचण उभी केली आहे. प्रकाशक ग्रंथ प्रसिद्ध करतो. वर्षअखेर या ग्रंथांच्या काही प्रती तरी गुदामातच राहातात; त्यावर अमेरिकन सरकारने आता कर बसविला आहे. म्हणजे प्रकाशकाने त्या ग्रंथांच्या प्रती नष्ट तरी करायच्या, अथवा फारच स्वस्त दरात त्या विकून टाकायच्या. गुदामाचे भाडे वाचवायचे असेल, सरकारी कर चुकवायचा असेल तर, प्रकाशकाला तेच दोन मार्ग – ग्रंथांच्या प्रती नष्ट करणे अथवा त्या कवडीमोलाने विकणे – उपलब्ध आहेत.

ग्रंथांना असलेल्या सामाजिक प्रतिष्ठेत आमूलाग्र असा बदल होत

असल्याकारणाने, त्या बदलाचा अनेक सामाजिक संस्थांवर परिणाम होणे अपरिहार्य आहे. विशेषकरून वाङ्मयीन जगतावर होणारा परिणाम हा खास करून नजरेत भरतो. कारण वाङ्मयीन जगत हे छापील पुस्तकांशी/ग्रंथांशी अतिशय संलग्न आहे.

• ग्रीक आणि युगोस्लाव या दोन भाषातील मौखिक काव्यावर या शतकात विस्तृत असे संशोधन झाले आहे. या संशोधनाने असे दाखवून दिले आहे की, काव्य या साहित्यप्रकाराचे सारेच पैलू हे काव्य कशाप्रकारे रचले जाते, रसिकांसमोर कसे मांडले जाते, यावर अवलंबून असतात. काव्यरचनेचा ढंग, काव्याचा विषय, निवेदनाची संरचना, काव्यातील उपमा, उत्प्रेक्षा, व्यंजना, इत्यादी अनेक गोष्टी काव्याच्या वेगवेगळ्या अंगात व पैलूत अंतर्भूत आहेत. ही काव्याची सारी अंगे, काव्य ज्या प्रकारे रचले जाते व रसिकांसमोर ठेवले जाते त्या पलीकडे फारशी जात नाहीत; ती अंगे व पैलू एकमेकात इतके गुंतलेले आहेत. मौखिक आणि लिखित साहित्याचा सांधा नीट जुळला नाही, पाश्चिमात्य वाङ्मयात ज्यांना रोमँटिक म्हणून संबोधतात, त्यांच्या कालखंडापासून एका विशिष्ट प्रकारच्या लिखाणास पाश्चिमात्य जगतात वाङ्मय ही संज्ञा प्राप्त झाली. आपली ही संज्ञा आता पाश्चिमात्य जगतात पार रुळली आहे. हे सारेच लिखाण मुद्रित पुस्तकाशी अगदी घनिष्ठपणे संलग्न आहे. वाङ्मय हे मूलतः व खास करून मुद्रित (हस्तलिखित नाही) पुस्तकांचा/ग्रंथांचा संच असते. ग्रंथ/पुस्तके यांचा संच याचा अर्थ इलिएड दि अमरेल, दि डिव्हाईन कॉमेडी, हॅमलेट (केशवसुतांची कविता, राजा शिवाजी, तुकारामाची गाथा, ज्ञानेश्वरी इत्यादी) ही सारी पुस्तके/ग्रंथ यांचा संच. याबरोबरच वाङ्मय या संकल्पनेस सीमित करणारे जे गुण समजले जातात, उदा. शब्दातून व्यक्त होणाऱ्या अर्थछटा (हस्त) लिखित/मुद्रित साहित्याची संरचना अथवा, अत्यंत रेखीव, आखीव व नेमकी अशी लेखनशैली इत्यादी – हे सारे गुण ही ग्रंथसंस्कृतीची अपत्ये आहेत. ग्रंथप्रेमी रसिक व्यक्ती ग्रंथ/पुस्तके वाचते. त्या क्रियेत कोणत्याही प्रकारचा अडथळा उत्पन्न झाला, तर त्याचा वाङ्मयावर परिणाम होणे हे क्रमप्राप्तच आहे. शिवाय हे सर्व परिणाम अगदी ताबडतोब व गंभीर असेच असतात, कारण सरतेशेवटी वाङ्मय हे ग्रंथ/पुस्तकांवरच अवलंबून आहे. समाज आणि त्या समाजातले विद्यमान असलेले तंत्रविज्ञान यातच त्या अडचणींना सुरुवात व्हावी असेच काही नाही. या शतकाच्या सुरुवातीला (पाश्चिमात्य) वाङ्मयात एक साहित्य-ढंग प्रचलित होता. वाचनीय असे जे जे काही साहित्य होते, असे साहित्य आणि त्याचे वाचक यांच्या विरोधी तो ढंग होता. तत्कालिन पाश्चिमात्य जगात साहित्य निर्माण करणारे लेखक होते, त्यातील बहुतेक, जे लिखाण वाचनीय नाही, जे कोणी वाचीत नाही, जे लिखाण अगदी गूढ (व मिस्टिक) स्वरूपाचे आहे, अशाच प्रकारचे साहित्य निर्माण करीत असल्याने वर उल्लेखिलेल्या प्रकाराचा साहित्य-ढंग प्रचलित होणे क्रमप्राप्तच होते. 'उच्चभ्रू' वाङ्मयाने, मध्यमवर्गीयांकडे पाठ फिरविली. वास्तविक या मध्यमवर्गाने १९ व्या शतकातील वाङ्मयाला उत्साहवर्धक आशावाद दिला होता, विस्तृत आणि दूरवर पोचणाऱ्या भावनांचा अनुभव दिला होता. हे होते बाल्झाक

व डिकन्स यांचे जगत. हे सारे आता भूतकाळात जमा होऊ लागले होते. मालारमे – प्रुस्ट, जॉइस यांचे हे नवे जग – हे सारेच विश्वविख्यात लेखक आहेत.... या साऱ्या लेखकांच्या विश्वात ज्यास रास्त अपेक्षाबद्दल सर्वसंमती (agreement) असे म्हटले जाईल, त्या सर्वसमंतीचे (agreement) विघटन झाले होते. ते जुने भावविश्व आता हळूहळू विनाश पावत आहे. आज समाजात कुणाला मान आहे? तर समाजात जे मध्यमवर्गीय समजले जातात, जे उमराव नाहीत, उच्चभ्रू नाहीत, कामगारवर्गीय नाहीत, शालीन नाहीत, मागासलेले नाहीत, अशा मध्यमवर्गीय व्यक्तीकडे जी उभारी असते, जी प्रतिभा असते, नवनिर्मिती-बाबतीत तिच्या ज्या आकांक्षा असतात, त्या सर्वांपासून ज्यांनी फारकत घेतलेली आहे, अशा व्यक्तींना आजकाल समाजात मान आहे. अगदी मुलखावेगळया 'एकला चला रे' या थाटात मार्गक्रमण करणाऱ्या, वाङ्मयात सर्वसामान्यपणे अनाकलनीय प्रयोग करू पाहाणाऱ्या एकांड्या शिलेदारांचे सध्या दिवस आहेत. या सर्वांनी मध्यमवर्गीय अशा निर्मिती ऊर्जेपासून फारकत करून घेतली आहे. ग्रंथ/पुस्तक वाचनयुगाची सुरुवात (पाश्चिमात्य जगतात) एका विशिष्ट कालखंडात झाली. त्या कालखंडात जी वाङ्मयीन मूल्ये मान्यता पावलेली होती, ती मूल्ये, एरॅस्मस, बेकन मोंतान्य या दिग्गजांच्याइतकी पुराणी व मान्यता पावलेली परंपरा होती. या दिग्गजांच्या कालखंडापासून पाश्चिमात्य जगतात, 'वाचना'च्या सुवर्ण-अक्षर (Classic) युगास आरंभ झाला. सध्या नेमके काय होत आहे? या प्रश्नाचे उत्तर पुढील शब्दात देता येईल : गुरुमंत्र (Initiate) ज्या कोणाला मिळालेला आहे, फक्त त्यांनाच आकलन होईल अशा एका गुप्त, सर्व सामान्यांपासून लपविलेल्या ग्रंथाच्या/पुस्तकाच्या शोधात ही सारी 'गुरुमंत्र' मिळालेली मंडळी आहेत. या ग्रंथवाचन चळवळीच्या आरंभापासून त्या चळवळीचे जे पाईक होते (मध्यमवर्गीय) त्यांना हे गुरुमंत्राने भारलेले – 'गुप्त-पुस्तक'/ग्रंथ समजले नाही, तरी काही हरकत नाही, अशी या गुरुमंत्र मिळालेल्या व्यक्तींची धारणा आहे. या अशा पुस्तकाचे (ग्रंथाचे) उदाहरण म्हणून जॉईस यांच्या 'Finnegans Wake' (फिन्नेगनस वेक) आणि Ulysses युलीस्सेस या पुस्तकाचे काही भाग यांचा नामनिर्देश करता येईल. विश्वविख्यात समीक्षक जॉर्ज स्टाईनर यांच्या लिखाणातला हा परिच्छेद आहे :

वाङ्मयीन क्षेत्रात जी निरक्षरता बुद्धिपुरस्सर पसरते आहे, त्या एका वेगळयाच प्रक्रियेकडे स्टाईनर लक्ष वेधू इच्छितात. सर्वसामान्य मनुष्य हा कोठचेही पुस्तक/ग्रंथ वाचण्याचे अगदी स्वाभाविकपणे नाकारतो, असे स्टाईनर यांना सांगायचे आहे. एकीकडे निरक्षरतेचे प्रमाण दिवसेंदिवस वाढते आहे. ग्रंथाची जागा परस्पर-संपर्क-साधनशास्त्रातील (Communication Science) तंत्रविज्ञानाने अधिक प्रमाणात व्यापावयास सुरुवात केली. हे सारे जसजसे अधिक प्रमाणात घडेल, तसतशी 'साक्षरता' दिवसेंदिवस अगदी निकडीची समस्या आहे असे वाटू लागेल. प्रत्यक्षात नसले, तरी आडवळणाने या साक्षरतासमस्येने वाङ्मयीन समीक्षेचे लक्ष आपल्याकडे खेचून घेतले. 'साक्षरता' ही वाङ्मयीन समीक्षेचे लक्ष्य बनली. 'साक्षरता'

ही वाङ्मयीन समीक्षेची प्रधान समस्या आहे हे अर्थातच कोणी मान्य करीत नाही, याचाही या ठिकाणी विसर पडू देता नये. एकोणिसाव्या शतकाची सुरुवात हा 'रोमॅंटिक' वाङ्मयाचा आरंभकाल. या प्रकारच्या वाङ्मयात लेखक केंद्रस्थानी असतो. म्हणूनच साहित्य-समीक्षेचा भार लेखकावर असतो. या उलट आधुनिकतावादाच्या काळात (Modernism) छापील संहितेवर भर असतो. तीच गोष्ट महत्त्वाची मानण्यात येते. गेली वीस वर्षे अथवा आधुनिकतावादानंतरचा कालखंड हे वाचकाचे युग आहे. लेखकाचे आणि छापील संहितेचे नाही. या कालखंडातील साहित्यसमीक्षक वाचकाच्या 'निरक्षरते' बद्दल क्षमायाचना करताना दिसतात. वाचक निरक्षर का राहिला आहे? या संबधी वेगवेगळी कारणे सांगतात. वाचक हा आपल्या स्वतःच्या 'निरक्षरते'बद्दल कसा दोषी नाही हे पटवून देण्याकडे या साहित्य-समीक्षकांचा कल असतो. हॅराल्ड ब्लूम या प्रसिद्ध साहित्य-समीक्षकाने, वाङ्मयाच्या प्रांतात लेखक हाच धीरोदात्त आहे असे ठासून सांगितले होते. ब्लूमनंतर संरचनावादी समीक्षक आले. त्यांनी लिखित - छापील संहितेपेक्षाही 'वाचकाभिमुख' अशी जी संहिता असेल त्यावर भर दिला व त्यास आपली पसंती दर्शविली. वाचकाभिमुख याचा अर्थ वाचक जे काही वाचतो – जे ग्रंथ / पुस्तक, कादंबरी वाचतो – त्याला तो आपला स्वतःचा असा अर्थ देतो. हा अर्थ तो मजकूर वाचीत असतानाचा वाचक रचीत असतो. आपण सर्वसामान्यपणे समजतो, तशी ही वाचनक्रिया नाही, हे येथे लक्षात ठेवले पाहिजे. आपण आपल्या नेहमीच्या समजुतीनुसार वाचक एखाद्या विशिष्ट लेखकाची एखादी अधिकृत साहित्यकृती वाचतो व त्याचा प्रचलित साक्षरतेच्या आधाराने अर्थ लावण्याचा प्रयत्न करतो, असे मानले जाते. तसे संरचनावादी सांगत नाहीत. वाचकाला पुस्तक / कादंबरी / ग्रंथ व त्यातील मजकूर वाचून जे काही भावते, समजते, मग ते अधिकृत मूळ संहितेबरहुकूम का नसेना, तेच बरोबर आहे असे संरचनावाद्यांचे सांगणे आहे. घटितशास्त्राच्या (Phenomenology) आधारे बसविलेल्या अशाच प्रकारच्या अनेक साहित्यसमीक्षाविषयक उपपत्ती उपलब्ध आहेत. वाचकाची ग्रंथमुद्रित मजकूर वाचून झालेली 'वाचक प्रतिक्रिया' अथवा ग्रंथ-मुद्रित मजकूर वाचल्यानंतर, वाचकाने केलेले 'सौंदर्यग्रहण' अशा पद्धतीच्या वाङ्मयीन समीक्षेचे अनेक प्रकार, घटितशास्त्राच्या मदतीने तयार करण्यात आलेले आहेत. या वाङ्मयीन समीक्षांच्या मदतीने आणि अनुषंगाने ग्रंथ – साहित्यकृती – मुद्रित मजकूर या सर्व प्रकारच्या मजकुरात अनेक गोष्टी नेहमीच गाळलेल्या, राहून गेलेल्या असतात असे दाखवून देण्यात येते. मुद्रित मजकुरातल्या वाचनातला आणि अर्थ लावण्यातला नेमकेपणा आता गेला आहे. वाचन आणि वाचलेल्या मजकुराचा अर्थ लावणे याचे स्वरूप इतःपर 'वैज्ञानिक' नाही. वाचन ही कृती तशी आता चांगलीच समस्यापूर्ण झाली आहे. या नवीन साहित्य-समीक्षापद्धतींच्या मते वाचलेल्या मुद्रित मजकुराचा अनेक प्रकारे अन्वयार्थ लावण्यात येतो, त्यावर अनेक प्रकारे भाष्य करता येते. हे अनेक अन्वयार्थ – भाष्ये यातील एकही भाष्य वा अन्वयार्थ निर्णायक नाही. त्यापैकी एकही अधिक अचूक असते असेही नाही. मुद्रित मजकूर



अनुक्रमणिका

वाचल्यानंतर जो काही अर्थ वाचक लावील तोच बरोबर. कोणाही वाचकाला असे सांगता येणार नाही की त्याने लावलेला अर्थ, अथवा त्याचे भाष्य हेच अधिक बरोबर आहे. कोठच्याही भाष्याला आपण अधिक बरोबर आहोत, अथवा तो आपला 'हक्क व खास अधिकार' असेही सांगता येणार नाही. कोणत्याही वाचकाने, कोठलाही अर्थ लावला तर तो दुसऱ्या कोठल्याही अर्थाइतकाच बरोबर, अचूक व सत्य आहे, या विचारास मान्यता देण्यात आलेली आहे. ही एक प्रकारे वाङ्मयीन क्षेत्रातील परमावधीची लोकशाही आहे. Hermeneutic हेरमनॉयटिक हे वाङ्मयीन भाष्याचे शास्त्र. या शास्त्रानुसारही परमावधीची लोकशाही अनस्यूत असलेल्या हा दृष्टीकोन वैध समजला जातो. या शास्त्रानुसार, वाचलेल्या साहित्याचा अर्थ, हा त्या वाचलेल्या साहित्याच्या मूळ संहितेत नसतोच. तो ते साहित्य वाचल्यानंतर, त्यावरचे भाष्य व त्या साहित्याचा अन्वयार्थ, आपण ज्या सिद्धांताच्या आधारे करतो, त्यातच तो अर्थ सापडतो. आधुनिक साहित्यसमीक्षा – सिद्धांतात विरचनावाद हा एक पराकोटीचा जहाल सिद्धांत समजला जातो. या जहाल सिद्धांतात असे गृहीत धरण्यात आलेले आहे की, सर्व भाषातच अर्थाच्या बाबतीत मूलगामी स्वरूपाची अनिश्चितता आहे. त्याचा परिणाम म्हणून, कोणत्याही संहितेला अर्थाच्या बाबतीत कमालीची आणि सर्वस्वी अशी अनिश्चितता असते, ते साहित्य अर्थाच्या बाबतीत, तसे सापेक्ष व समस्यापूर्ण असते. मूळ संहितेतच या सर्वांचे कारण अनुस्यूत आहे असे विरचनावाद सांगतो. मूळ संहितेत वाचल्यानंतर ताबडतोबीची प्रतिक्रिया म्हणून जो अर्थ प्रतीत होतो त्याच्या अगदी विरुद्ध टोकाला असलेला अर्थही त्या संहितेत अंतर्भूत असतो. आणि अगदी आत्यंतिक टोकाला जाऊन विचार करावयाचा झाल्यास, त्या संहितेत, सरतेशेवटी विचार करता, वाचण्यासारखे असे काही नसतेच. कोणत्याही साहित्यकृतीच्या अथवा मुद्रित साहित्याच्या वाचनाने जे प्रश्न निर्माण होतात, त्या प्रश्नास वाङ्मयीन समीक्षा ज्या प्रकारे सामोरी गेली आहे, त्या प्रक्रियेचा सारांश व मथितार्थ सांगावयाचा झाल्यास ते उत्तम प्रकारे पुढीलप्रमाणे सांगता येईल. वाङ्मयीन समीक्षेचे अनेक कालखंड कल्पिता येतात. उदा., रोमँटिक, प्रबोधनपूर्व, मध्ययुगीन इत्यादी. आधुनिकतावादी वाङ्मयीन समीक्षेचाही एक कालखंड होता. त्या कालखंडानंतर जो वाङ्मयीन समीक्षेचा कालखंड आला तो आधुनिकतावादोत्तर वाङ्मयीन समीक्षेचा कालखंड. आपण आजवर 'पुस्तक (ग्रंथ)' याची व्याख्या एक सुव्यवस्थित, नियमित, भविष्यकाळाचा वेध घेणारी, संदर्भासाठी आपण जे नेहमी वापरता येते आणि ज्याच्या वाचनाने, आपणास काही संदेश मिळतो, अर्थप्राप्ती होते – अशी जी निर्मिती ते पुस्तक (ग्रंथ). ग्रंथाची ही अशाप्रकारची व्याख्या ही आधुनिकतावादोत्तर समीक्षा कालखंडाला नामंजूर आहे. येथे ग्रंथ (पुस्तक) या संकल्पनेचे जे वर्णन केलेले आहे, हे त्याज्य ठरवून, त्याच्या ऐवजी 'संहिता' ही संकल्पना आणि ही संहिता लिखित, मौखिक अथवा मुद्रित स्वरूपात आपल्या समोर येईल. परंतु ही संहिता चिरफळ्या उडालेली, अंतर्विरोधी, अपूर्ण, सापेक्ष, लहरी आणि कल्पनाविलासात रमलेली असते. या 'संहिता' शद्बाच्या व्याख्येविरुद्ध

'ग्रंथ' हा सुनियंत्रित, व्यवस्थित, एक विशिष्ट हेतू वा उद्दिष्ट नजरेसमोर ठेवून रचलेली, संदर्भ म्हणून नेहमीच वापरता येणारी आणि अर्थपूर्ण अशी निर्मिती असते.

आपण हा सर्वच वाद-संवाद फारच उच्च पातळीवरून करीत आहोत. या वाद-संवादात वापरलेल्या प्रत्येक शब्दाचा तरल व सूक्ष्म अशा सर्व अर्थ-छटा लक्षात घेऊन तो वाद-संवाद करीत आहोत. हा वाद आपण या अशा उच्च पातळीवर करीत असल्याकारणाने 'निरक्षर' या शब्दाचा अर्थ शाळकरीपद्धतीप्रमाणे करावयाचा नाही. नेहमीचा अथवा सर्वसामान्य व्यवहारात त्या शब्दाचा जो अर्थ होतो, तो येथे अभिप्रेत नाही. आपण त्या शब्दाची व्याख्या वेगळीच केलेली आहे. लिहिता-वाचता न येणारी व्यक्ती, ती 'निरक्षर' असा त्याचा अर्थ येथे अभिप्रेत नसून एखादे पुस्तक/ग्रंथ वाचून त्याचा अर्थ लावू न शकणारी व्यक्ती ती 'निरक्षर' असा अर्थ येथे अभिप्रेत आहे. तीच गोष्ट Misprison या शब्दाची. या शब्दाचा या विवेचनात अभिप्रेत असलेला अर्थ हा व्यवहारी पातळीवरचा अथवा शब्दकोशात जो दिलेला आहे तो नाही. शब्दकोशात या शब्दाचा अर्थ 'चुकीची कृती', 'विश्वासघातकी योजनाबद्दल लपवाछपवी' असा देण्यात येतो. तो येथे अभिप्रेत नाही. ज्ञानाचा जो पाया समजण्यात येतो, त्याबद्दलचे सिद्धांत अथवा ज्ञान ज्या पद्धतीने प्राप्त करावयाचे त्याविषयीचे सिद्धांत, असा त्या शब्दाचा अर्थ या वादविवादात गृहीत धरण्यात आलेला आहे. 'चुकीची कृती', 'लपवाछपवी', याबद्दल ज्ञानप्राप्तीच्या क्षेत्रात ज्या समस्या आहेत, त्यांचा फारच उच्च पातळीवरून विचार केला असता अनेक आश्चर्यकारक गोष्टी आपल्याला आढळून येतात. 'निरक्षरतेचे काव्यशास्त्र'/काव्यात्मकता हा शब्दसमूह हा काहीसा विनोदी आहे हे खरे. परंतु तो सर्वस्वी विनोदी नाही. त्यात अनेक प्रकारचे – Misprison आहे. या शब्दसमूहाचे व त्याकरवी सूचित होणाऱ्या संकल्पनेचा अगदी मूलभूत पातळीवर जाऊन विचार केला असता, 'साक्षरते'चे विघटन का होत आहे याचे त्या संकल्पनेकरवी, एक उच्च व तरल पातळीवरचे समर्थन सादर करण्यात येत असते. खेदयुक्त क्षमायाचनेचा, तो एक लक्षणीय असा प्रकार आहे. 'वाङ्मयीन साक्षरते'चे विघटन होणे अपरिहार्य आहे, असे समर्थन ती संकल्पना आपणास सादर करते. तसे होणे हा काही ती संहिता वाचणाऱ्या वाचकावा आणि समाजाचा नैतिक अपयशाचा वा त्रुटीचा भाग नाही. भाषेच्या आणि त्या संहितेतील काही विशिष्ट त्रुटींचा तो परिणाम असतो, असे त्या संकल्पनेकरवी समर्थन करण्यात येते. निरक्षरता ही स्थिती समाजाच्या दृष्टीकोनातून पाहाता, फारच भयावह व उत्पाती आहे असे वाटावयास हवे. तथापी ही निरक्षरता, आत्यंतिक डाव्या व जहाल अशा साहित्यसमीक्षेच्या दृष्टीकोनातून पाहाता, अत्यंत महत्त्वाच्या अशा वाङ्मयीन कौशल्यांचा ती स्थिती हा पराभव नाही, अथवा ते विघटनही नाही. त्यांच्या मते या निरक्षरतेकडे एका वेगळ्याच दृष्टीकोनातून पाहावयास हवे. जुन्या व प्रस्थापित अशा वाङ्मयीन क्षेत्रातील अधिकारी वर्गाने काही यम-नियम रूढ केले होते. त्या बंधनातून या 'निरक्षरतेने' क्रांतिकारी अशी मुक्ती मिळवून दिली आहे. नवनिर्मिती विस्तारित होण्यास नवी संधी प्राप्त

करून दिली आहे. मानवाला नवे स्वातंत्र्य प्राप्त होऊन, व्यक्तीला अनिर्बंध असा संचार करण्यास मोकळिक मिळालेली आहे. अशा प्रकारच्या वाङ्मयीन समीक्षात्मक दृष्टीकोनाची राजकीय चाल व दिशा, ही उदारमतवादी व डावी असते. हे त्या दृष्टीकोनाचा प्रस्थापिताला आणि प्रस्थापितांना असलेला विरोध, अधिकारशाहीस विरोध, आणि व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर असलेला लोकशाहीवादी स्वरूपाचा भर, या साऱ्यावरून, ते स्पष्टपणे दिसून येते. याबरोबरच या दृष्टीकोनाला आणखी एक बाजू आहे. वाङ्मय ही एक सामाजिक संस्था आहे आणि तिला वैध स्वरूप प्राप्त करून देण्याचे काम वाङ्मयीन समीक्षा करते. यातून वाङ्मय आणि वाङ्मयीन समीक्षा या दोघांचे बाहेरच्या जगाशी असलले संबंध स्पष्ट होतात. परंतु हे संबंध तसे उदारमतवादी अथवा डावीकडे झुकणारे नाहीत. उलट डाव्यांच्या भाषेत सांगावयाचे झाल्यास तस ते परंपरावादीच आहेत. एकीकडे वाङ्मयीन समीक्षात्मक दृष्टीकोनाची उदारमतवादी व डावी राजकीय दिशा, आणि वर उल्लेखिलेले परंपरागत संबंध, या दोन परस्परविरोधी प्रवृत्तींच्या गोष्टी या डाव्या व उदारमतवादी दृष्टीकोनात आपणास पाहावयास मिळतात. वाङ्मय अथवा साहित्य याचा आपणास जो परिचय आहे, त्यातून एक गोष्ट दिसून येते. ती म्हणजे, छापील पुस्तक वा ग्रंथ, ही या 'साहित्य-वाङ्मय-सामाजिक' संस्थेचा पाया व आधार आहेत. छापील पुस्तक (ग्रंथ) वाचण्यासाठी, ग्रंथ (पुस्तक) लिहिणे, व ते वाचावयास येणे, ही दोन्ही कौशल्ये अत्यावश्यक आहेत. कोणी ग्रंथ (पुस्तक) लिहिल्याशिवाय ते छापता येत नाही. आणि छापलेले पुस्तक उपयोगात येण्यासाठी वाचन हे कौशल्य आवश्यक आहे. या दोन्हीही कौशल्यांना (लिहिणे - वाचणे) जर धोका उत्पन्न झाला, तर त्यामुळे वाङ्मय - साहित्य हेच मुळात धोक्यात येणार आहे. वाङ्मय - साहित्य यांच्या अस्तित्वास जे धोके उत्पन्न होतात, त्यांचा मुकाबला करणे, त्यांना दूर पिटाळून लावणे, अथवा अन्य दुसऱ्या काही मार्गांनी त्या धोक्यांचे निवारण करण्याचा प्रयत्न करणे, हे वाङ्मयीन - समीक्षेचे प्रमुख सामाजिक कार्य आहे. आजच्या या हळूहळू दिवसें-दिवस वाढत जाणाऱ्या, 'निरक्षरतेच्या' युगात, 'वाङ्मय - साहित्य' या सामाजिक संस्थेला धोका निर्माण होणार हे उघडच आहे. या धोक्याचा मुकाबला, वाङ्मयीन समीक्षा पुढीलप्रमाणे करते. या वाङ्मयीन - समीक्षेच्या प्रतिपादनाचे सार, वस्तुतः असे आहे की, 'होय, लोक दिवसेदिवस कमी वाचतात व जे काही वाचतात तेही कमी-बरोबर वाचतात'. जुन्या काळी, जे मुद्रित करण्यात आलेले आहे, त्या बरहुकूम अगदी काटेकोरपणे वाचून करायचे असा दंडक होता. तो दंडक आजकाल अनेकजण काटेकोरपणे पाळत नाहीत हे सत्य आहे. परंतु 'भाषेची' प्रकृती लक्षात घेता 'वाचन' ही क्रिया सर्वसामान्यपणे नेहमीच एक ढिसाळ व सैल असे परिमाण प्राप्त करून देणारी क्रिया होती. शिवाय 'वाचन' या क्रियेचा नेमका अर्थ काय, याबद्दलची समज, ही तशी सापेक्ष असण्याचेही काही फायदे खरोखरच असतात. 'वाचन' या क्रियेबद्दलच्या या सापेक्ष समजुतीत दिवसेंदिवस वाढत जाणारी 'निरक्षरता' या वस्तुस्थितीची जाणही अनुस्यूत आहे. या अशा प्रकारची सापेक्ष समज असली तर

मग, नवनिर्मिती, व्यक्तित्व आणि मानवी स्वातंत्र्य या सर्वास अनेक प्रकारच्या नवीन संधी प्राप्त होतील. आधुनिक समाजात हे सारेच गुण, फार महत्त्वाचे व हवेहवेसे वाटणारे गुण मानले जातात. 'वाङ्मयीन - समीक्षेचे' हे बचावात्मक प्रतिपादन, काहीसे मुलखावेगळे, चमत्कारिक व विचूक आहे असे भासेल. परंतु त्या प्रदिपादनाच्या विचूकतेत, चमत्कारिकपणात आपल्या अवतीभोवतीच्या सामाजिक जगतातले बदल, हे किती तपशीलाने भरलेले व विस्तीर्ण असू शकतील याची काहीशी कल्पना येईल. हे सारेच सामाजिक बदल, परस्परांशी संपर्क साधण्याचे जे नवे तंत्रविज्ञान आहे, त्याच्या दबावाखाली घडून आलेले आहेत, हेही या ठिकाणी लक्षात ठेवावयास हवे.

गतकाळाच्या आठवणी मधूर वाटतातच. पण हा एक मुद्दा सोडला तर वरील परिच्छेदात उल्लेखिलेल्या सामाजिक व तंत्रवैज्ञानिक बदलांमुळे खरोखरच काही बिघडले आहे का? इतके ते अगदी मनाला लावून घेण्याच्या स्वरूपाचे बदल आहेत का? पाश्चिमात्य संस्कृतीत ज्ञानाचे संवर्धन करण्याचे आणि ज्ञान एका पिढीकडून त्यानंतर येण्याऱ्या पिढीकडे, एका गटाकडून दुसऱ्या एखाद्या गटाकडे, एका व्यक्तीकडून दुसऱ्या व्यक्तीकडे पोचविले जाण्याचे मार्ग, या अगदी महत्त्वाच्या अशा परस्परांशी संपर्क साधण्याच्या पद्धतीत, आमूलाग्र स्वरूपाचे बदल प्रथमच होत आहेत असे नाही. आजवर तसे अनेक वेळा घडले आहे. ग्रीक सांस्कृतिक जगतात, इ.स. पूर्वी पाचव्या शतकात होमर या कवीच्या जागी प्लेटो हे तत्त्वज्ञ आले (मौखिक संस्कृतीऐवजी लिपिक संस्कृती आली) हा पहिला बदल. तोवर ज्ञानाचे संवर्धन, साठा, आदान-प्रदान हे मुखावाटे उच्चारलेल्या शद्बांमार्फतच होत होते. होमर कवीचा कालखंड हा मौखिक संस्कृतीचा कालखंड. इ.स. पूर्वी पाचव्या शतकात ग्रीकमध्ये प्रथमच ज्ञान लिपीबद्ध झाले होते. त्यानंतरचा पाश्चिमात्य संस्कृतीतील आणखी एक महत्त्वाचा बदल पंधराव्या शतकाच्या मध्यावर झाला. त्या सुमारास मुद्रणकला युरोपमध्ये अवतरली. आता विसाव्या शतकाच्या अखेरीस असे दिसते आहे की, मुद्रणसंस्कृती जाऊन तिच्या जागी इलेक्ट्रॉनिक संस्कृती येण्याची चिन्हे स्पष्टपणे दिसू लागली आहेत. आता ज्ञानाचे संवर्धन, साठा आणि प्रसार या साऱ्याच गोष्टी इलेक्ट्रॉनिक साधनांच्याकरवी होतात. तारायंत्र, दूरध्वनी, आकाशवाणी, दूरदर्शन आणि संगणक इत्यादी अनेक इलेक्ट्रॉनिक साधनांचा त्यात समावेश आहे. याचा अर्थ ज्ञानसंवर्धन, साठा व प्रसारण करण्याचे जे महत्त्वाचे मार्ग आहेत, त्यात वेळोवेळी बदल होतो. पाश्चिमात्य समाजातील लोक ज्या एका उच्च पातळीवरच्या तंत्रवैज्ञानिक संस्कृतीत राहातात त्या संस्कृतीत हे बदल फारच झपाट्याने व वेगाने होताना दिसतात. नव्या संस्कृतीत ज्या नव्या 'साक्षरते'ची आवश्यकता असते, ही नवी साक्षरता त्या नव्या संस्कृतीतील व्यक्ती तशी फारच झपाट्याने आत्मसात करताना आढळतात. तसेच सामाजिक संस्थाही ज्ञानसंवर्धन, साठा आणि प्रसार करण्याचे जे नवे तंत्रविज्ञान आहे त्याच्याशी झटकन जुळवून घेतात. म्हणून मुद्रणसंस्कृतीत – हिचे दुसरे नाव गुटेनबर्ग संस्कृती (कारण. गुटेनबर्गने

छापण्याच्या यंत्राचा शोध लावला) – साक्षरतेला ओहोटी लागलेली जरी आढळली, तरी त्या कारणाने डगमगण्याचे कारण नाही. साक्षरतेला ओहोटी लागल्याकारणाने, मानवी संस्कृतीचा अंत अगदी समीप येऊन ठेपला आहे असा त्याचा अर्थ नाही. हे जरी खरे असले तरी या ठिकाणी आणखी एका महत्त्वाच्या मुद्याकडे दुर्लक्ष होऊ देता नये. परस्परांशी संपर्क साधण्याच्या आणि ज्ञान प्रसारित करण्याच्या महत्त्वाच्या पद्धतीत आमूलाग्र स्वरूपाचा बदल झाला की त्याचा सामाजिक, राजकीय जीवनावर आणि व्यक्तीच्या आपल्या स्वतःच्या वैयक्तिक जीवनावर परिणाम जरूर होतो. हा जो परिणाम होतो, त्याचे महत्त्व व व्याप्ती आपण कमी लेखता कामा नये. या नव्या तंत्रविज्ञानाच्या मदतीने, त्या परिणामाशी आपणास जुळवून घेता येईल हे खरे. परंतु आपण ज्या मार्गाने व पद्धतीने ज्ञान मिळवितो, त्याचा प्रसार करतो, इतरांशी संपर्क साधतो, त्यात बदल झाला की मग त्याचा समाजातील दुसऱ्या अनेक अंगांवर परिणाम होतो, याचाही विसर पडू देता कामा नये. एकतर अशा प्रकारचे बदल झालेल्या समाजातील व्यक्ती, आपल्या सभोवतालचे जग, ज्या प्रकारे समजावून आणि जाणून घेतात, त्यातही बदल होतो. त्याचबरोबर त्या व्यक्ती स्वतःच स्वतःला ज्याप्रकारे समजावून आणि जाणून घेतात, त्यातही बदल होतो. कालांतराने आणि सरतेशेवटी ही इलेक्ट्रॉनिक क्रांती कोठच्या स्वरूपाने व कसले बदल घडवून आणील त्याबद्दल अगदी तंतोतंत खरे ठरेल असे भविष्य वर्तविणे, हे अगदी अशक्य असेच आहे. अर्थात हे माझे स्वतःचे मत झाले. परंतु आजवरच्या इतिहासावर दृष्टिक्षेप टाकून सर्वसामान्यपणे या संभाव्य बदलात, कोठचे घटक अंतर्भूत आहेत, याबद्दल आपणास ढोबळ स्वरूपाचा अंदाज करता येईल. अर्थात हा अंदाज हा अखेरीस अंदाजच आहे याचा विसर पडू देता नये.

आपल्या नजिकच्या भूतकाळात म्हणजे अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकात पाश्चिमात्य समाजात जे बदल झाले त्यावरून एक मुद्दा स्पष्ट होईल. जुन्या मौखिक-लिपिक संस्कृतीची जागा सरतेशेवटी मुद्रणसंस्कृतीने घेतली. डॉ. सॅम्युअल जॉनसन (इ.स. १७०२ ते इ.स. १७८४) हा ग्रंथ-पुस्तके वाचणारा मोठा प्रज्ञावान गृहस्थ. मौखिक-लिपिक संस्कृतीच्या जागी जी मुद्रण संस्कृती येऊ लागली होती, त्या कालखंडातील हा एक सर्वश्रेष्ठ असा वाचक. त्याचबरोबर नव्याने येऊ घातलेल्या छापखान्याला 'काम' मिळावे या हेतूने लेखन करणारा लेखक. परस्परांशी संपर्क साधण्याच्या महत्त्वाच्या साधनात आणि पद्धतीत, त्या काळी जो नुकताच ऐतिहासिक असा सांस्कृतिक बदल होत होता, त्यात अनुभवाच्या पातळीवर तसेच सामाजिक पातळीवर अनेक गोष्टी अंतर्भूत होत्या. डॉ. जॉनसन यांना एक वाचक म्हणून त्याकाळी जो अनुभव येत होता, तो अनुभव या होत असलेल्या सांस्कृतिक बदलाच्या प्रक्रियेत जे जे काही अनस्यूत होते त्या सर्वांचीच एक ठसठशीत व रेखीव अशी प्रतिमा होती.

पंधऱ्याव्या शतकाच्या मध्यावरती आरंभ झालेल्या मुद्रणक्रांतीने तत्कालिन, संस्कृतीवर तावडतोब परिणाम करावयास सुरुवात केली. हस्तलिखिते नकलणारा

लेखनिक एक वर्षात दोन ग्रंथ नकलीत असे. छापखाना अथवा मुद्रणकला अस्तित्वात आल्यानंतर, १० ते १५ हजार ग्रंथ प्रसिद्ध झाले. प्रत्येक ग्रंथाच्या किमान पाचशे प्रती प्रसिद्ध होत. याचा अर्थ ७५ लाख पुस्तके (ग्रंथ नव्हेत) १४५० नंतरच्या पन्नास वर्षात मुद्रित झाली. याचा अर्थ छापील पुस्तके सर्वत्र उपलब्ध झाली. कायद्याची पुस्तके आणि केवळ लॅटिन भाषेतीलच नव्हे, तर युरोपमधील स्थानिक भाषेत छापलेले बायबल आता सहज उपलब्ध झाले होते. या सर्वांचा अपरिहार्य असा सांस्कृतिक परिणाम अगदी उघडपणे सर्वत्र दिसू लागला. परंतु हे सारे अगदी मंदगतीने होत होते. अठरावे शतक उजाडेपर्यंत, मौखिक-लिखित संस्कृतीचे पूर्णपणे मुद्रणसंस्कृतीत परिवर्तन झाले नव्हते. त्यानंतरचा मुद्रणसंस्कृतीचा परिणाम इंग्लंडमध्ये दैनंदिन आयुष्यात दिसू लागला. हा परिणाम अगदी अतिसामान्य अशा गोष्टीतून प्रतीत होत असे, याचे कारण दैनंदिन जीवनातील अगदी साध्या गोष्टीही आता मुद्रित होऊ लागल्या. नाटकाची तिकिटे, विवाहाचे परवाने, (१७५० सालपर्यंत एका जागेपासून दुसऱ्या जागी सहजपणे नेता येणाऱ्या 'ओळी' (Lines) कोणीही निर्माण करीत नव्हता, करू शकत नव्हता.) करारपत्रे आणि करारनामे, अशा प्रकारच्या दैनंदिन जीवनातील गोष्टींचेही मुद्रण होऊ लागले होते. १७५० सालपर्यंत हे शक्य झाले नसते. १७५० सालानंतर मुद्रणकलेने दैनंदिन जीवनाच्या 'ताण्याबाण्यात' प्रवेश केला होता. अर्थशास्त्रीय भाषेत बोलावयाचे झाल्यास मुद्रणकलेने आता अठराव्या शतकात 'उड्डाण' केले होते. अठराव्या शतकात वृत्तपत्रे व मासिके प्रसिद्ध होऊ लागली. लिखित साहित्याची होत असलेली तपासणी व निर्बंध (सेन्सॉर) हे आता पूर्णपणे काढून घेण्यात आले होते. सर्वसामान्य मनुष्य आपल्या नजरेसमोर ठेवून, धंदेवाईक लेखक आता आम जनतेसमोर येऊ लागले. लंडनमध्ये, छापखान्यासाठी पूर्वी सरकारी परवाना आवश्यक आहे असा जो कायदा होता, तोच कायदा आता रद्दबादल झाल्याकारणाने, १६९५ साली ज्या छापखान्यांची संख्या (इंग्लडंमध्ये) २० (वीस) होती, ती इ.स. १७८५ साली १२४ वर येऊन पोचली.

संगणक आणि मायक्रोफिल्मस, यावर नोंदविलेल्या आकडयांवरून हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल. गंमतीची गोष्ट अशी की, छापील ग्रंथांच्या आधारे नव्हे, तर नव्या इलेक्ट्रॉनिक संस्कृतीच्या मदतीने हा मुद्दा आपण स्पष्ट करीत आहोत. अठराव्या शतकात प्रसिद्ध झालेले अगदी छोट्या पुस्तकांची सूची असे सूचित करते की, इंग्लंडमध्ये छापलेल्या पुस्तकांची संख्या दुप्पटीने वाढली. त्यांच्याबरोबर छापखान्यांची, मुद्रकांची आणि पुस्तके विकणारांची संख्याही वाढली. अठराव्या शतकात ही संख्या १७२० सालाच्या अखेरीस ९२६७ (इंग्लंडमध्ये) होती, ती १८०० साली २००९८८ झाली.

मुद्रित साहित्यात या अशा प्रकारे झालेल्या प्रचंड वाढीमुळे समाजात खळबळ माजली नसती, त्याबद्दल नापसंती व्यक्त झाली नसती तरच नवल. या सर्वांचा आविष्कार तत्कालीन 'साक्षरता पेचप्रसंगा'च्या द्वारा अत्यंत नाट्यपूर्ण पद्धतीने



अनुक्रमणिका

जगासमोर आला. पाश्चिमात्य जगातील विद्यमान साक्षरतासमस्या ही दिवसेंदिवस 'वाचन' ही क्रिया कमी होऊ लागल्याकारणाने निर्माण झाली आहे. या उलट अठराव्या शतकातील पाश्चिमात्य जगतात निर्माण झालेली 'साक्षरता समस्या' ही सर्वसामान्य जनता फार मोठ्या प्रमाणात 'वाचन' करू लागल्या कारणाने निर्माण झाली होती. अठराव्या शतकात 'वाचन' ही क्रिया प्रत्यक्षात किती प्रमाणात वाढली होती याबद्दल अजूनही वाद होतच असतो. गेली दोन शतके हा वाद सातत्याने चालू आहे. परंतु एका गोष्टीबाबत ऐतिहासिक पुरावा स्पष्टपणे आढळतो. ती गोष्ट म्हणजे प्रस्थापित व शासकीयवर्गाचा असा समज झाला होता की दिवसेदिवस समाजात वाचन ही क्रिया एकसारखी प्रमाणाबाहेर वाढते आहे. विषेशतः प्रस्थापितांच्या दृष्टीने जे लोक 'चुकीचे' होते त्या वर्गात हे 'प्रमाणाबाहेरचे' वाचन एकसारखे वाढत्या प्रमाणात होत होते. या ठिकाणी 'चुकीचे लोक' याच्या अर्थ तत्कालीन पाश्चिमात्य समाजातील तळागाळातले लोक. प्रस्थापितांच्या दृष्टीने ही सारी घटनाच अत्यंत धोकादायक अशी होती. 'गलीव्हर्स ट्रॅव्हल' या प्रख्यात पुस्तकाचे विख्यात लेखक स्वीफ्ट यांनी लिहलेल्या 'बॅटल ऑफ बुक्स' ('पुस्तकांची लढाई' – प्रकाशन काळ १६९६/९७) आणि पोप या कवीच्या 'दि डनसिआड' या काव्यात, या विचारसरणीचे पडसाद आढळतात. मुद्रित साहित्यावर त्या काळात जे अनेक हल्ले झाले, त्यातील ते सुरुवातीचे हल्ले होते. या दोन्हीही लेखकांचे असे म्हणजे होते की, तत्कालीन नवे लेखक आणि वाचक ही एक लोकशाहीवादी झुंड आहे. लोकांनी सतत वाचन करणे – आणि प्रमाणाबाहेर वाचकांची संख्या समाजात असणे – ही एक भीतीदायक गोष्ट होती. त्यांच्या मते, त्याचे कारण, हे असले वाचक प्रस्थापित समाजव्यवस्थेला सुरुंग लावतील आणि सामाजिक, धार्मिक आणि राजकीय अशा स्वरूपाची क्रांती घडवून आणतील. लॉक हा त्या काळातील एक प्रख्यात इंग्लिश तत्त्वज्ञ. लॉक समाजातील तळागाळातील लोकांना शिक्षण देण्याविरुद्ध होता. लॉकशी तुलना करता जे कोणी त्यांच्याइतकेही उदारमतवादी नव्हते, ते लोक याबाबतीत लॉक यांच्याही पुढे गेले होते. 'दूरदृष्टी'ने विचार करता, अज्ञान ही एक उपयुक्त अशी अफूची गोळी होती. या गोळीचे सेवन केल्यानंतर तळागाळातील लोकांना, आजूबाजूच्या प्राप्त दुःखद परिस्थितीची जाणीव होत नाही, असे प्रस्थापित वर्गातील अनेकांचे मत होते. अठराव्या शतकाच्या अखेरीला या परिस्थितीत फरक पडला. तळागाळातील लोकांना, समाजातील गरिबांना, लिहा-वाचावयास शिकविण्यासाठी समाजात सोई उपलब्ध झाल्या. हे असे धोरण अवलंबिण्यामागे, तळागाळातील लोकांना शहाणे करून सोडावे हा हेतू नव्हता. ख्रिश्चन धर्माची शिकवण त्यांना द्यावी हा त्या धोरणामागचा हेतू होता. असे होते तरी तळागाळातील लोक एकदा साक्षर झाले की मग अनर्थ ओढवणारच, ही समजूत प्रस्थापितांच्या मनात अगदी घट्ट रुतून बसलेली होती. हे खालच्या वर्गातील लोक एकदा साक्षर झाले की ते धार्मिक पुस्तके न वाचता, त्यांना वाटेल ती पुस्तके वाचतील हे ओघानेच आले. या अशा प्रकारचे जे वाचन होणार होते, त्यावर

हल्ला चढवून, प्रस्थापितांच्या मनात जी भीती होती तिला वाट मिळाली होती. विसाव्या शतकाच्या अखेरीस अमेरिकेत दूरचित्रवाणीवरचे कार्यक्रम प्रेक्षक फारच फाजिल वेळ खर्चून पाहातात, त्याचा परिणाम किती भयानक गोष्टी होण्यात होणार आहे, याच्या कुंडल्या अनेक समीक्षकांनी मांडल्या आहेत. अठराव्या शतकाच्या अखेरीस तळागाळातील लोक साक्षर झाल्यानंतर ते ज्या प्रकारचे वाचन करीत, त्याबद्दलही अशाच प्रकारची भीती व्यक्त करून, त्या वाचनावर तत्कालीन प्रस्थापितांनी चांगला जोरदार हल्ला चढविला होता. या संबंधात एका समीक्षकाने लिहिले आहे, 'जे कोणी (वाचन) ही कृती निषेधार्ह आहे असे सांगत होते, ते केवळ त्या कृतीचा नीती आणि राजकारण यावर जो (विपरीत) परिणाम होईल याचा निषेध करीत नव्हते. या वाचनाचा सामाजिक स्वास्थ्यावर परिणाम होऊन ते स्वास्थ्य बिघडेल अशी भीती त्या समीक्षकांना वाटत होती.' इ.स. १७९५ साली प्रसिद्ध झालेल्या एका पुस्तिकेत, प्रमाणाबाहेर वाचन केल्याने, पुढे नमूद केलेले शारीरिक अपाय होतात असे सांगितले आहे. या समीक्षकांनी पेश केलेली यादी येणेप्रमाणे: सर्दीपडसे, डोकेदुखी, डोळ्यांची कमजोरी, शरीरात ऊष्णता फार झाल्याने कातडीवर उठणाऱ्या गांधी, दृष्टीमांद्यत्व, पित्त उठणे, गाउट, संधीवात, मूळव्याध, दमा, पक्षघात, फुफ्फुसाचे रोग, अपचन, बद्धकोष्ठता, चेतीय विकृती, अर्धशिशी, अपस्मार, प्रकृती चिंताग्रस्तता, विषण्णता – हे सारे रोग अतिवाचनाने होतात.

'वाचना'विरुद्ध सातत्याने आणि अगदी अर्बुजपणे पुन्हा पुन्हा हाकाटी करण्यात येई. सर्वसामान्य लोकात ज्ञानाचा प्रसार सर्वत्र आणि सर्वसामान्यपणे झाला तर हे तळागाळातले संस्कृतीहीन लोक आपली पायरी सोडतील आणि वरच्या जागांवर अगदी बेशिस्तपणे येऊन बसतील हे त्या हाकाटीचे स्वरूप होते. डॉ. सॅम्युअल जॉनसन यांनी हे प्रतिपादन अगदी ठोसपणे त्याज्य ठरविले. डॉ. जॉनसन यांनी सांगितले 'सुरुवाती-सुरुवातीला नुसते लिहिता वाचता येणे, हे देखिल मानाचे व वैशिष्ट्यपूर्ण समजले जाते. पण एकदा लिहिणे व वाचणे हे सर्वसामान्य झाल्यानंतर, तळागाळातील माणसे आपली पायरी ओळखून वागतात'. या प्रकारच्या युक्तीवादावर डॉ. सॅम्युअल जॉनसन भर देत. लेखन हा डॉ. जॉनसन यांचा धंदा होता. आपली पुस्तके बाजारात खपावीत या हेतूनेच ते पुस्तके लिहीत. आपला उदरनिर्वाह, पुस्तके लिहिण्यापासून जे पैसे मिळत त्यावर करीत. डॉ. जॉनसन, छापखान्याचे मालक आणि पुस्तक विक्रेते, यांच्यासाठी लिहीत. डॉ. जॉनसन यांचे पुस्तक मालक छापणार, प्रकाशित करणार आणि विक्रेता ते विकून पैसे उभे करणार व त्यातले काही डॉ. जॉनसन यांना मिळणार अशी ती मालिका होती, या सर्वांचा विसर केव्हाही पडू देता नये. या कारणासाठीच डॉ. जॉनसन यांनी साक्षरतेला पाठिंबा दिला. तसे करण्यात त्यांचे आर्थिक हितसंबंध गुंतलेले होते. समाजात साक्षरतेचा जसा जसा प्रसार वाढेल, तसतशी वाचकांचीही संख्या वाढेल. अशा रीतीने वाचकांच्या संख्येत दिवसेंदिवस अधिकाधिक भर पडली, की त्यांना लागणाऱ्या पुस्तकांची संख्याही वाढेल. पुस्तकांची बाजारपेठ अशाप्रकारे साक्षरतेच्या मदतीने विस्तार पावेल. डॉ.



अनुक्रमणिका

जॉनसन या बाजारपेठेत आपली पुस्तके खपावीत म्हणून लिहीत व त्या प्रमाणात पुस्तकांची बाजारपेठ विकसित होण्यास हातभार लावीत. याचा अर्थ डॉ. जॉनसन यांचा साक्षरतेला असलेला पाठिंबा केवळ त्यांच्या आर्थिक हितसंबंधामुळे होता असा कोणी केल्यास तो चुकीचा आहे. गुटेनबर्गश्रद्धेशी त्यांची व्यक्तीगत अशी बांधिलकी होती व ती वरवरची नव्हती. अगदी आतून आलेली ती बांधिलकी होती. डॉ. जॉनसन यांनी ही गुटेनबर्गश्रद्धा समाजात बद्धमूल होण्यासाठी साहाय्य केले. डॉ. जॉनसन असे प्रतिपादन करीत की, तळागाळातील लोक शहाणे बनतील आणि समाज सुसंस्कृत होईल तो केवळ वाचन या क्रियेमुळे. हा युक्तिवाद डॉ. जॉनसन गुटेनबर्गश्रद्धेला साहाय्यभूत होण्यासाठीच करीत असत. त्यांच्या या दृष्टीकोनाचा आविष्कार अतिशय प्रसन्न अशाप्रकारे एका प्रसंगाकरवी जितका प्रकर्षाने झालेला आढळतो, तितका तो अन्य कोठच्याही प्रसंगातून झालेला आढळत नाही. तो प्रसंग येणेप्रमाणे डॉ. जॉनसन आणि त्यांचे विख्यात चरित्रकार बॉसवेल हे एकदा नौकाविहारास गेले होते. वातावरण अतिशय प्रसन्न होते. डॉ. जॉनसननी नौका वल्हविणाऱ्या मुलाला विचारले की, 'मुला आरगुनोटस याची गोष्ट वाचता यावी यासाठी तो काय त्याग करावयास तयार आहे'. त्या मुलाने उत्तर दिले 'महाराज, मी माझ्याकडे जे काही आहे ते सर्व काही देईन', हे उत्तर ऐकून डॉ. जॉनसन यांना आनंद झाला व ते फार खूष झाले हे सांगावयास पाहिजेच असे नाही.

डॉ. जॉनसन यांनी साक्षरताप्रसाराला जाहीर पाठिंबा दिलाच. त्याचबरोबर 'वाचन' या क्रियेची महती वाढावी यासाठी सातत्याने खटपट केली. 'वाचन' या क्रियेचाच केवळ विचार केला, तर ते त्या क्षेत्रातले 'हिरो' होते. डॉ. जॉनसन यांची वाचनाला बांधिलकी होती. अगदी आतून आलेली अशी बांधिलकी होती. 'वाचन' या क्रियेत पराकोटीचे कौशल्य प्राप्त करून घेण्यासाठी चौफेर वाचन करावे लागते. ते तर डॉ. जॉनसन लहानपणासून करीत होतेच. त्याकाळी जी अनेक पुस्तके बाजारात येत होती, प्रसिद्ध होत होती, दिवसेंदिवस ज्यांचे प्रमाण वाढत होते, जी सर्वत्र उपलब्ध होत होती, त्या सर्व पुस्तकांचा परिणामकारक उपयोग होण्यासाठी वाचनातील कौशल्याचा उपयोग होणार होता. डॉ. जॉनसन हे रांगते व नुकतेच चालावयास लागले होते, त्या काळातील एक प्रसंग डॉ. बॉसवेल यांनी नमूद केला आहे. त्यावेळी डॉ. जॉनसन यांच्या मातेने, त्यांना बायबलमधील एक परिच्छेद पाठ करण्यासाठी म्हणून दिला. डॉ. जॉनसन यांनी आपल्या आई पाठोपाठ जिन्हा चढताचढताच, त्याच क्षणी तो परिच्छेद म्हणून दाखविला. तो सुद्धा एकही चूक न करता. पाठांतराची कोणी परीक्षा घेतली असती, तर अगदी पैकीच्या पैकी गुण मिळतील अशा पद्धतीने. गुटेनबर्गश्रद्धेचा पाठपुरावा करणाऱ्या त्या प्रकांड पंडिताची ही गोष्ट एक महत्त्वाचा मुद्दा अधोरेखित करते. तो मुद्दा म्हणजे, डॉ. जॉनसन मोठेपणी नेटकेपणी, अचूकपणे, बंदिस्तपणे आणि एकाग्रतेने वाचन करीत होतेच. एवढेच नव्हे, तर डॉ. जॉनसन हे नुकतेच चालावयास लागले होते, शाळेतही त्यांनी प्रवेश केला नव्हता अशा वयातही ते त्याच पद्धतीने वाचन

करीत. या घटनेतून असेही सूचित होते की, गुटेनबर्गसंस्कृतीशी बांधिलकी असलेल्या या व्यक्तीची 'वाचन' ही सहजप्रवृत्ती बनली हेती. त्यांच्या वडिलांचे पुस्तकाचे दुकान होते. या पुस्तकाच्या दुकानात अनेक प्रकारच्या पुस्तकांचे वाचन करण्याची संधी डॉ. जॉनसनना मिळाली होती. डॉ. जॉनसन यांनी ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या पेमब्रोक कॉलेजमध्ये प्रवेश घेतला होता. नुकताच प्रवेश घेतलेल्या सर्व विद्यार्थ्यांपेक्षा डॉ. जॉनसन यांचे वाचन कितीतरी पटीने जास्त होते. एवढेच नव्हे तर हे वाचन अनेक विषयातील होते. ते आपल्या सर्व आयुष्यभर पद्धतशीर नसले तरी चौफेर आणि आधाश्यासारखे वाचन करीत असत. हातात पडेल ते प्रत्येक पुस्तक वाचीत. मग ते कोणत्याही विषयादरचे असो. हे करण्यास आवश्यक असलेले गुटेनबर्गी कौशल्य उपजतच त्यांच्या अंगी होते. ते एकही पुस्तक पहिल्या पानापासून शेवटच्या पानापर्यंत न वाचण्याकरताच प्रसिद्ध होते. कोणत्याही पुस्तकाची पहिली काही पाने वाचली आणि त्या पुस्तकाची अनुक्रमणिका पाहिली की त्या पुस्तकात जे काही सांगितले असेल यावर त्यांची अगदी पक्की पकड येई. त्या पुस्तकाचे मर्म कळण्यासाठी यापेक्षा अधिक वाचन करण्याची आवश्यकता त्यांना कधीही भासली नाही. छापील पुस्तकांबरोबर डॉ. जॉनसन यांची घसट अगदी घनिष्ट अशीच असल्याकारणाने, त्यांचा छापील शद्बावर पराकोटीचा विश्वास कधीही नव्हता. पुस्तके हस्तलिखित स्वरूपात होती त्या काळी पुस्तकातील लिखित शद्बावर लोकांचा पराकोटीचा विश्वास होता. तसाच ती पुस्तके छापावयास सुरुवात झाल्यानंतर, त्या सुरुवातीच्या काळातही होता. डॉ. जॉनसन यांना पुस्तकांबद्दलच एकंदर जाण जास्त असल्याकारणाने, त्यांनी लिखित वा छापील शद्ब कधीही वेदवाक्य आहे असे मानले नाही. याउलट पुस्तकांत त्रुटी किती व कशा प्रकारच्या असतात याबद्दलचे त्यांना पुष्कळच ज्ञान होते. म्हणूनच त्यांनी पुढील विधान केले. त्यांच्या मते पुस्तके ही मानवाच्या सदोष कल्पनाशक्तीची निर्मिती आहे. मर्मभेदी दृष्टीकोनाचा तो एक भाग असला, तरी तो अपूर्ण व अपुरा असतो, याकडेही दुर्लक्ष होता नये. अपुरा युक्तिवाद, उपलब्ध पुराव्याच्या पलीकडे जाणारे निष्कर्ष, चुकीच्या गोष्टींवर दिलेला भर, मनास येईल त्याप्रमाणे, कोठच्याही युक्तिवादावर व प्रतिपादनावर न आधारलेले दुवे व विकासाचे आकृतिबंध ही त्या पुस्तकांची व्यवच्छेदक लक्षणे होती. डॉ. जॉनसन यांच्या समजुतीनुसार कोठचेही 'लेखन हे नेहमीच जमवलेले असते आणि ते कधीही परिपूर्ण नसते!'

या नव्या मुद्रण जगतात डॉ. जॉनसन यांना अगदी घरच्यासारखे वाटत असे. डॉ. बॉसवेल यांनी तशा तऱ्हेचे त्यांचे व्यक्तिचित्रच उभे केले आहे. 'अनेक वाचनालये पूर्णतः आपल्या कवेत घेण्यासाठीच डॉ. जॉनसन यांचा जन्म झाला होता', असे उद्‌गार त्यांच्या एका चाहत्याने काढले होते. हारलेईअन (HARLEIAN) या वाचनालयात पन्नास हजार ग्रंथ, तीन लक्ष पन्नास हजार पुस्तिका व सात हजार हस्तलिखिते होती. या सर्व साहित्याचे वर्गीकरण करण्यासाठी आणि त्याची सूची बनविण्यासाठी डॉ. जॉनसन यांनी मदत केली होती. इतर वाचनालयातही,

सूर्या आणि संदर्भ ग्रंथ या दोन्हींच्या मदतीने, त्या वाचनालयांचा कार्यक्षमतेने वापर कसा करावा, हेही त्यांना चांगले माहीत होते. डॉ. जॉनसन यांची पुस्तकांबरोबर एवढी घनिष्ट मैत्री होती की ते वेळप्रसंगी त्या पुस्तकांची आबाळही करीत. एका संध्याकाळचे वर्णन करताना बॉसवेल यांनी लिहिले आहे, 'एका संध्याकाळी डॉ. जॉनसन पुस्तकांची चवड शेजारी ठेवून खुर्चीवर बसले होते. त्या पुस्तकांच्या चवडीतून ते एक पुस्तक दरवेळी उचलीत. थोडावेळ ते पुस्तक चाळण्यात खर्च करीत, मग ते पुस्तक बाजूला ठेवून दुसरे एक पुस्तक उचलीत. रॉबिनसन क्रुसो, पिलग्रिमस प्रोग्रेस आणि डॉन क्वीझओट, ही त्यांची तीन खास आवडीची पुस्तके. यातले डॉन क्विझोट हे पुस्तक विषेशकरून लक्षात घ्यावयास हवे. गुटेनबुर्ग युगात वाचन ही जी क्रिया होती, त्या क्रियेत येणाऱ्या 'अडचणीचे' ते प्रतिक आहे. डॉ. जॉनसन यांना अनेकवेळा नैराश्याचे झटके येत. अनेक वेळा या झटक्यामुळे त्यांना वेड लागणार की काय अशी त्यांच्या मित्रांना भीती वाटे. डॉ. जॉनसन यांनी एकदा असे सांगितले क़ी, फक्त एकच पुस्तक, बर्टन यांचे 'ॲनॉटमी ऑफ मेलांकली' हे वाचण्यासाठी आपण भल्या पहाटे उठू. डॉ. जॉनसन यांचा स्वतःचा तीन हजार पुस्तकांचा चांगला संग्रह होता. त्यांच्या मरणानंतर त्या काळी तो चांगला २९० (दोनशे नव्वद पौंड) पेक्षा थोडे अधिक पैसे देऊन कोणीतरी विकत घेतला. पण डॉ. जॉनसन यांनी या आपल्या ग्रंथसंग्रहाचा नियमितपणे वापर केलेला नसावा असे दिसते. डॉ. बॉसवेल यांनी डॉ. जॉनसन यांच्या या ग्रंथालयास एकदा भेट दिली. त्यांनी त्या भेटीचे वर्णन पुढील शब्दात केले आहे. "या ग्रंथालयात अनेक चांगली पुस्तके होती. पण या सर्वच पुस्तकांवर चांगलीच धूळ साचलेली होती. तसेच ही सर्व पुस्तके अजिबात नीट ठेवलेली नव्हती. काही पुस्तके इकडे, काही तिकडे. दुसरी अनेक आणखी कोणीकडे, असा तो सावळागोंधळ होता. या ग्रंथालयाच्या जमिनीवर, डॉ. जॉनसन यांच्या स्वतःच्या हस्ताक्षरातील हस्तलिखितांची अनेक पाने इकडे तिकडे सर्वत्र पसरलेली होती."

हस्तलिखितांच्या युगात आणि मुद्रणकलेला नुकताच आरंभ झाला होता त्या काळी, हस्तलिखित अथवा मुद्रित ग्रंथ वा संहितेला एक विशिष्ट महत्त्व होते. हस्तलिखित-मुद्रित अशा कोठच्याही स्वरूपातील ग्रंथातील मजकूर हा जणू ईश्वरी शब्दच मानला जाई. त्यातील प्रत्येक शब्द, हा जादूने मंतरलेला व भारलेला आहे अशी त्याकाळी भावना होती. ख्रिश्चन धर्माच्या आरंभीच्या काळात बायबल या धर्मग्रंथाला जे स्थान होते तेच या हस्तलिखित-मुद्रित स्वरूपातील ग्रंथांना होते. मिडराश आणि तालमूद, हे ज्यू धर्मातील प्रमुख ग्रंथ. त्यापैकी मिडराश (MIDRASH) हे खास करून ज्यू धर्मातील एका विशिष्ट पद्धतीचे लिखाण आहे. या लिखाणात बायबलच्या मूळ संहितेचा एका खास वेगळ्या पद्धतीने अभ्यास करण्यात येतो. या 'मिडराश' मध्ये हलाखा आणि हागदा या दोन महत्त्वाच्या पद्धती. इतरही दुसऱ्या आहेत. पण त्यांना या दोन पद्धतींइतके महत्त्व नाही. 'मिडराश' लिखाणात ज्या प्रकारच्या अभ्यासपद्धती अनस्यूत आहेत, तशा 'अभ्यास-

पद्धती' दुसऱ्या कोठच्याही संस्कृतीतील धर्मग्रंथात – ग्रीक-रोमन संस्कृतीच्या धर्मग्रंथातही आढळत नाहीत. 'मिशन्हा' या ज्यू धर्मातील प्रमुख ग्रंथावरील मल्लीनाथी 'तालमूद' या नावाने प्रसिद्ध आहे. 'तालमूद' या ग्रंथाचे पहिले संपादन इ.स. पूर्व चौथ्या शतकाअखेरचे. हे संपादन प्रथम जरूसलेम (पॅलेस्टाईन) येथे झाले. त्या नंतरची त्याची आवृत्ती बॅबिलोन येथील इ.स. पूर्वी तिसऱ्या शतकातील. हे सारे निरूपण करण्यामागे मुद्दा एकच. तो म्हणजे, मुद्रणकलेच्या आरंभीच्या काळात व त्या अगोदर अशी समजूत होती की, या ग्रंथातील मजकुराची अत्यंत एकाग्रतेने पारायणे केली, तरच मग तालमूद आणि मिडराश यासारखी ग्रंथनिर्मिती करता येईल, एरव्ही नाही. मध्ययुगापासून इ.स. १७५० नंतरची एक-दोन शतके, वाचक, हस्तलिखिते, मुद्रिते याच एकाग्रतेने वाचीत असत. एकतर त्याकाळी वाचनासाठी फारच थोडे हस्तलिखित-मुद्रित ग्रंथ उपलब्ध होते. उदा., बायबल, पंचांग – एखादे-दुसरे धार्मिक पुस्तक इतकाच त्या ग्रंथांचा आवाका होता. त्यांची संख्याही तशी अगदीच मर्यादित होती. ही सारी पुस्तके तत्कालीन वाचक पुन्हा पुन्हा वाचीत. सामान्यपणे वाचकाचे हे वाचन, 'जाहीर' स्वरूपाचे वाचन असे. एखाद्या गटासमोर हे वाचन होई. या अशा प्रकारच्या वाचनाचे काही परिणाम अपरिहार्य असेच होते. एकतर त्या गटाला आवडेल असेच साहित्य वाचले जाई. परिणामी परंपरागत वाङ्मयातील एक अगदी छोटासाच भाग प्रभावी ठरला. कारण त्याचेच वाचन – तो भाग श्रोत्याला अधिक पसंत असल्यामुळे होत असे. या हस्तलिखित-मुद्रित ग्रंथातील हा छोटासाच भाग, तो भाग वाचणाऱ्या अथवा श्रवण करणाऱ्या लोकांच्या सुप्त मनावर आणि अदृष्य अशा त्यांच्या विवेकबुद्धीवर फार मोठा परिणाम करणारा ठरला. इ.स. १८०० च्या आसपास पाश्चिमात्य जगतात जे कोणी हस्तलिखिते-मुद्रिते वाचीत, ते अगदी तपशिलात जाऊन, त्या लिखाणातील सर्व बारकावे लक्षात घेऊन वाचीत. याचा अर्थ, बायबल, पंचांग, धार्मिक पुस्तके, या पुस्तकांच्या पलिकडे जाऊन वाचन होऊ लागले होते. हे वाचक सर्व प्रकारचे मुद्रित-साहित्य वाचीत. त्यात विशेषकरून, दैनिके, साप्ताहिके आणि नियतकालिके यांचा समावेश असे. या प्रकारच्या मजकुरावर एकदा नजर टाकल्यानंतर हे वाचक ताबडतोब, पुढच्या बातमीकडे जात. या अशा प्रकारे विस्तृतपणे वाचन करणाऱ्या नव्या वाचकांचा उत्तम प्रतिनिधी जर कोणी असेल तर तो डॉ. जॉनसन. या नव्या प्रकारच्या वाचकांचा एक खास दृष्टीकोन होता. माहिती जमा करणारी कौशल्ये या वाचकांनी आपल्या अनुभवाच्या जोरावर हस्तगत केलेली असतात. या सर्वांचे उत्तम प्रतीक व प्रतिनिधी त्याकाळी कोणी असेल तर ते डॉ. जॉनसन. एखाद्या ग्रंथाचे 'भय' वा एखादा ग्रंथ पाहून बावरणे हे डॉ. जॉनसन यांच्या गावीही नव्हते. डॉ. जॉनसन यांनी पाहिलेल्या मुद्रित ग्रंथातील त्रुटी व कमतरता यांची चांगलीच जाण होती. परस्परविरोधी प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथांचा उपयोग कसा करायचा हे त्यांना चांगलेच माहीत होते. वाचलेल्या ग्रंथातील परस्परविरोधी युक्तिवाद वाचून ते अजिबात गोंधळून जात नसत. या उलट, अशा प्रकारच्या अनेक ग्रंथांचा उपयोग आपल्या लिखाणात

करण्याच्या बाबतीत ते अगदी समर्थ होते. तसा उपयोग त्यांनी केलाही आहे. अनेक ग्रंथ वाचताना त्यातून अनेक प्रकारचे युक्तिवाद त्यांना वाचावयास मिळत. अनेक नव्या नव्या कल्पनांचा त्यांना परिचय होई. या सर्वांतून नीरक्षीर न्यायाने काय घ्यायचे हेही त्यांना ठाऊक होते. थोडक्यात अनेक विषयांवरच्या अनेक ग्रंथातून डॉ. जॉनसन अगदी सहजपणे वावरत असत. ही त्यांच्या वाचनाची लौकिक बाजू झाली. मुद्रण-कलेमुळे नव्या प्रकारचे साहित्य वाचकाला उपलब्ध झाले होते. या साहित्याचा वापर करताना, नव्या कौशल्यांची व नव्या दृष्टीकोनाची आवश्यकता होती. मौखिक संस्कृतीत जे काही ऐकायचे त्याचे नीट अगदी बिनचूकपणे श्रवण करणे आणि ते लक्षात ठेवणे यावर भर असे, मुद्रणसंस्कृतीत लिहा-वाचावयास येण्याचे कौशल्य आवश्यक बनले होते. छापलेली पुस्तके हे ज्ञान मिळविण्याचे नवे साधन होते. या साधनामुळे, नवी कौशल्ये व नवे दृष्टीकोन निर्माण झाले. डॉ. जॉनसन यांची 'साक्षरता' हे त्या गुटेनबर्ग (मुद्रण) संस्कृतीत आवश्यक असलेल्या व्यावहारिक कौशल्यांचा आदर्श होता. नवे माध्यम (छापलेली पुस्तके), या नव्या साहित्याचा वापर करण्यासाठी निर्माण होणारी नवी कौशल्ये, या सर्व वस्तुस्थितीचा डॉ. जॉनसन हे स्वतःच प्रत्यक्ष असा पुरावा होते. मानवी मनाला अंगभूत असलेल्या सवयींची या नव्या ज्ञानमाध्यमाने फेरमांडणी केली. हा मुद्दा डॉ. जॉनसन यांच्या उदाहरणावरून स्पष्ट होतो. हे नवे साहित्य समजावून घेण्यासाठी नवे मार्ग आवश्यक असतात. मौखिक-संस्कृतीत एकाग्रतेने ऐकणे व ऐकलेले लक्षात ठेवणे, ही कौशल्ये जरूरी होती. आता भर लिहिण्या-वाचण्याच्या कौशल्यावर अधिककरून होता. याचा उल्लेख या अगोदरही आलेला आहे. या ज्ञान मिळविण्याच्या नव्या मार्गाशी व नव्या कौशल्याशी जुळवून घेण्याच्या क्रियेत आणि प्रक्रियेत, तत्कालीन व्यक्तीला प्रचंड अशा मानसिक तणावास सामोरे जाणे हेही त्या क्रिये-प्रक्रियेत अंगभूत होते.

एकमेकांशी नुसते बोलून, प्राथमिक स्वरूपाची ज्ञान व माहिती जमा करण्याच्या अवस्थेतून मानवी संस्कृती कधीतरी गेलेली आहे. या अवस्थेनंतर हेच ज्ञान व माहिती पुस्तकांच्या वाचनाने मिळवण्याचे युग आले. मौखिक संस्कृतीचे युग आणि मुद्रणसंस्कृतीचे युग या दोन्ही मानवी संस्कृतीच्या युगात, जमीन-अस्मानाचा फरक आहे. एकमेकांशी बोलून माहिती-ज्ञान मिळविण्याच्या युगात बोलणारा आणि ते बोलणे ऐकणारा हे अगदी आमने-सामने असतात. जे काही बोलले-ऐकले जात असे, ते एकमेकास समजते आहे याची पक्की खात्री करून घेता येते. ही अशा प्रकारची पक्की खात्री होण्यासाठी, बोलणारा व ते बोलणे ऐकणारा यांच्या दरम्यान होणाऱ्या क्रिया-प्रतिक्रियेत जरूर ते फेरफार करणे सहज शक्य असते. एखाद्याने काही बोलणे व ते बोलणे कोणी ऐकणे, हा त्या दोघांच्या दृष्टीने एक अगदी, या क्षणी, आता घडणारा असा एक ताबडतोबीचा असा जाहीर स्वरूपाचा प्रसंग असतो. बोलणे-ऐकणे, या क्रियेत व या क्रियेत अंतर्भूत असलेल्या प्रत्येक व्यक्तीची प्रतिक्रिया ही त्या बोलणाऱ्या व्यक्तीच्या अवतीभोवती असलेल्या लोकांनी

व्यक्त केलेल्या प्रतिक्रियेच्या अनुषंगाने पुढे सरकते. बोलणे-ऐकणे या क्रियेत अंतर्भूत असलेल्या गटात जी क्रिया-प्रतिक्रिया होते, त्याचा परिणाम, जे काही सामाजिक वागणुकीचे यम-नियम समाजाने मान्य केले आहेत, त्यांना झुकते माप देण्याकडे होतो. अगदी वैयक्तिक स्वरूपाची, तसेच ज्यास काहीवेळा चक्रमपणा म्हटले जाते, जगावेगळी अशी प्रतिक्रिया समजली जाते, अशा प्रकारच्या प्रतिक्रिया या त्याज्य ठरविल्या जातात. मौखिक संस्कृती ही समूहजीवनाला, समाजातील मोकळयाढाकळया, अगदी उघड्यावर, जाहीरपणे व्यतीत होणाऱ्या जीवनाला खास करून पोषक आहे. मौखिक संस्कृती ही अशा प्रकारच्या जीवनाला संजीवनीवत आहे. म्हणूनच समाजात मिळून-मिसळून वागण्याकडे तशा प्रकारच्या वागण्याच्या बाबतीत पुढाकार घेण्याकडे ज्या व्यक्तींचा कल असतो, अशी व्यक्ती मौखिक संस्कृती पसंत करते. या उलट लिपी-संस्कृतीचे आहे. ही संस्कृती वैयक्तिक, अंतर्मुख, आधुनिक समाजातील एकाकी अशा व्यक्तींच्या जमावात ज्या व्यक्ती अंतर्भूत असतात (Lonely Crowd) अशा समाजापासून फटकून वागणाऱ्या, दुरावलेल्या व्यक्तींची चहाती असल्याचे आढळते. लिपी-संस्कृतीनंतर मुद्रणसंस्कृती आली. या संस्कृतीत समाजात लेखक (ज्ञान व माहिती देणारा) आणि वाचक हे एकमेकांपासून अलग असतात. (मौखिक संस्कृतीत ते आमने-सामने असतात). ग्रंथ-पुस्तक वाचणारा वाचक, हा वाचनालयात अथवा आपल्या स्वतःच्या घरातील अभ्यासिकेत निवांतपणे, अगदी एकटा वाचन करतो. या उलट मौखिक संस्कृतीत ज्ञान देणारा-घेणारा मानवी-व्यक्तींच्या आवाजाच्या कल्लोळात ज्ञान संपादन करतो. मुद्रणसंस्कृतीतल्या वाचकांचे तसे नसते. तो अगदी एकाकी, एकटा, कसलाही आवाज न ऐकता, निवांतपणे, ज्ञान संपादन करतो. मुद्रणसंस्कृतीत वाचक ज्या संहितेला सामोरा जातो, ती संहिता अमूर्त अशा खुणांनी परिपूर्ण अशी असते. (अमूर्त खुणा याचा अर्थ, लिखाण लिपीबद्ध असते. लिपी ही अमूर्त खुणांची आहे. ठ – ठकीतला असे आपण शिकवितो. ठ ही तशी अमूर्त अशी खूणच आहे). या संहितेचा वाचक, त्या संहितेचा अन्वयार्थ लावतो. या उलट मौखिक संस्कृतीत अर्थ लावणे, ही जाहीर अशी प्रक्रिया असते. मुद्रितसंस्कृतीचे तसे नव्हते. अभ्यासिकेत आणि वाचनालयात उपलब्ध असलेल्या एकांतात वाचक ज्ञान आपलेसे करतो. विद्यमान वर्तमानकाळातून नव्हे, तर जे आता 'सांगितले जाते' म्हणजे, आता ज्या क्रिया पूर्ण झाल्या आहेत, अशा भूतकाळातून ते ज्ञान त्या वाचकाकडे येते. हेच दुसऱ्या शद्बात सांगावयाचे झाल्यास एखादी क्रिया होऊन गेल्यानंतर, त्या क्रियेपासून अगदी दूर अशा काळात व परिस्थितीत. हे असे असल्याकारणाने, जो वाचक त्यासंबंधी, अमूर्त अशा खुणांच्या मदतीने, एखाद्या घटनेबद्दल, क्रियेबद्दल ज्ञान संपादन करतो, या वाचकाला, वाचलेल्या त्या माहितीचे विवरण करणे, त्याचा योग्य अर्थ लावणे हे चांगलेच अवघड बनते. कशाप्रकारेही त्या घटनेचा कोणताही अर्थ लावला तरी त्यात काहीशी अनिश्चितता राहूनच जाते. म्हणूनच, एखाद्या वाचकाने, त्याने वाचलेल्या संहितेपासून मिळविलेले ज्ञान व माहिती व त्याचा त्या वाचकाने लावलेला अर्थ, हा एक अडचणी निर्माण

करणारे केंद्र बनतो. वाचन ही क्रिया केवळ दैनंदिन रोजगाराचे साधन आणि इतरांबरोबर संपर्क साधण्याचे साधन, या दोन्हीही दृष्टीने उपयुक्त नाही. परंतु तेवढाच त्याचा उपयोग नाही हेही लक्षात घ्यावयास हवे. अवतीभोवतीच्या जगाची एकंदर जडण-घडण कशा प्रकारची आहे आणि व्यक्तीचे त्यात स्थान नेमके कोठे आहे, याची वाचकाच्या मनात सुस्पष्ट व ठोस अशी प्रतिमा तयार होण्यासाठीही वाचन या कौशल्याचा उपयोग होतो. आम जनतेच्या दृष्टीने आपल्या अवतीभोवतीचे जग समजावून घेण्यासाठी आणि त्यास सामोरे जाण्यासाठीही वाचन हे एक प्रमुख व मुलभूत असे साधन होते. अठराव्या शतकात ही वस्तुस्थिती अधिक नक्की व स्पष्ट होऊ लागली होती. वाचन ही क्रिया कार्यक्षमतेने करण्यासाठी एकांत व शांतता यांची प्रामुख्याने व सामान्यपणे आवश्यकता आहे. ही क्रिया करताना आपण अमूर्त अशा खुणांचा वापर करतो. आपण जे काही वाचतो तो मजकूर आपल्याला समजत असलेल्या आणि माहीत असलेल्या एखाद्या लिपीद्वारा शद्बबद्ध झालेला असतो. थोडक्यात कोणतीही लिपी ही तशी अमूर्त खुणांनीच सिद्ध झालेली असते. या संबंधीचे त्रोटक विवेचन वर येऊन गेलेच आहे. कोणत्याही लिपीत या अमूर्त खुणा ज्या वस्तुस्थितीशी, घटनेशी, वस्तूशी, भावनेशी निगडीत असतात त्यापासून त्यांची फारकत झालेली असते. त्या खुणा, मूळ संदर्भापासून अलग झालेल्या असतात. उदा. क – कमळातला असे जेव्हा आपण समजतो, तेव्हा क या ध्वनीची व क या खुणेची कमळापासून केव्हाच फारकत झालेली असते. त्यांचा मूळ संदर्भ सुटून ती खूण अलग होऊन तिला स्वतःचे असे स्वतंत्र अस्तित्व प्राप्त झालेले असते. म्हणजेच वाचक जी खूण पाहातो, त्याला वस्तुतः तसा संदर्भ नसतो. अशा संदर्भापासून फारकत झालेल्या अमूर्त खुणांच्या बाबतीत अनेक प्रकारचे प्रश्न-उपप्रश्न उपस्थित होऊन तो एक कूट प्रश्नही बनण्याची शक्यता असते. थोडक्यात अशा प्रकारच्या वादग्रस्त खुणांच्या मदतीने वाचन ही क्रिया वाचकाला वास्तवाची जाण करून देते. एवंच, वाचन या क्रियेत, एकांत, शांतता आणि ही अशा प्रकारची वास्तवाची जाण या साऱ्याच गोष्टी अनस्यूत आहेत. हे असे असले तरी वाचन या क्रियेत आवश्यक असलेल्या पूर्वस्थितीने 'मानव' म्हणून जगण्यास आवश्यक असलेल्या पूर्वस्थितीच्या सीमारेषा स्पष्ट होऊ लागल्या. हे जग मानवापासून अलग व फार दूर 'अंतरावर' असलेले, पण त्याचबरोबर गूढ असे जग आहे. एकाकी, अशा व्यक्तीसमोर उभे ठाकलेले जग. या व्यक्तीस या जगास सामोरे जावयाचे असते. या जगाचे वास्तव्य घडविण्यात एखाद्या छापील ग्रंथातील पानाने हातभार लावल्याने, त्या जगास आकार येतो. या छापील ग्रंथातील पानात अनेक वैशिष्ट्ये अनस्यूत असतात. उदा., एकाच दिशेने सरळ रेषेत पुढे सरकणे आणि सुसंवाद ही त्या वैशिष्ट्यांपैकी तीन प्रधान वैशिष्ट्ये.

प्रामुख्याने मौखिक संस्कृती या अवस्थेत असलेल्या एखाद्या समाजाचे मुद्रणसंस्कृतीत सामान्यपणे परिवर्तन होते. या अशा समाजात 'साक्षर' होणे हा अतिशय गहिरा, अगदी खोलवर पोचणारा, अगदी वैयक्तिक अशा स्वरूपाचा अनुभव



अनुक्रमणिका

असतो. हा अनुभव आजवरच्या इतिहासात प्रत्येक व्यक्तीस आलेला आहे. आजही त्या अनुभवात फरक पडलेला नाही. आपण आजही ज्यावेळी वाचावयास शिकतो, तेव्हा आपणासही त्यावेळी तशाच प्रकारच्या अनुभवाचा प्रत्यय येतो, याचा विसर कोणाला कसा पडेल? आपण हा जो नवा – म्हणजे वाचून ज्ञान मिळविण्याचा अनुभव घेत असतो – त्या अनुभवामुळे आपल्या स्वतःसंबंधीच्या ज्या संकल्पना आपल्या मनात खोलवर अगदी घट्ट पाय रोवून बसलेल्या असतात त्या संकल्पनांना नवा आधार येतो. तसेच आपण या जगात जीवन व्यतीत करतानाही, त्या जगाबद्दल आपल्या ज्या संकल्पना असतात, त्यानाही नवा आकार प्राप्त होतो. सर जोशुआ रेनॉल्डस यांनी १७७५ साली डॉ. जॉनसन यांचे एक तैलचित्र काढले. हे तैलचित्र मोठे लक्षणीय आहे. या चित्राची प्रतिकृती येथे देण्यात आली आहे. डॉ. जॉनसन हे जन्मतःच जवळ जवळ आंधळे होते. या चित्रात डॉ. जॉनसन जवळ जवळ आंधळे असल्याकारणाने अगदी डोळ्याजवळ एक पुस्तक नेऊन वाचीत आहेत, असे चित्रित करण्यात आले आहे. डॉ. जॉनसन इतक्या एकाग्रतेने वाचताना दाखविण्यात आले आहे की, त्यावरून, ते मुद्रित पुस्तक आपलेसे करीत आहेत असे कोणास वाटेल. डॉ. जॉनसन यांना हे तैलचित्र अजिबात आवडत नव्हते. त्यांच्या मते या तैलचित्रात दाखविण्यात आलेला डॉ. जॉनसन हा 'मिचमिच्या सॅम' आहे. ते काहीही असो, या चित्रातून एकाचवेळी दोन परस्परविरोधी प्रवृत्ती चित्रित झालेल्या दिसतात. डॉ. जॉनसन, पुस्तक या वस्तूने मंत्रमुग्ध झाले आहेत, पण त्याचबरोबर त्याच वस्तूसंबंधीची डॉ. जॉनसन यांची घृणाही त्या चित्रातून व्यक्त झाली आहे. या दोन्हीही प्रवृत्ती, भावना व दृष्टीकोन त्या चित्रात आढळतात. डॉ. जॉनसन आणि त्यांचा कालखंड याचीच ती प्रवृत्ती होती, हे सर्वज्ञात आहे. डॉ. जॉनसन हे एका संक्रमण अवस्थेच्या कालखंडात जन्माला आले. मौखिक संस्कृतीचा कालखंड मागे पडून, एका नव्या मुद्रणसंस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेचा तो कालखंड. मौखिक संस्कृती इतिहासजमा झाली नसली तरी ती दुसऱ्या स्थानावर जाण्याचा तो कालखंड. एका सांस्कृतिक अवस्थेतून जात असताना, एक नवी मुद्रण संस्कृती – त्या मागे पडणाऱ्या संस्कृतीच्या जागी येण्याचा तो कालखंड. या जवळ जवळ, आमूलाग्र अशा परिवर्तनामुळे, त्या कालखंडातील पाश्चिमात्य जगातील मानवी संस्कृतीला जबरदस्त धक्का मिळाला होता. मौखिक संस्कृतीही आता कालबाह्य ठरली होती. ती एक इतिहासजमा झालेली वस्तू होती. आता तिची जागा मुद्रणसंस्कृतीने घेतली. या संक्रमणकालीन कालखंडात, 'वाचावयास शिकणे' या शद्बांनी सूचित होणाऱ्या कृतीतून, या संक्रमणकालीन व्यवस्थेत अनुस्यूत आणि कार्यरत असलेल्या मानसिक उर्ज्यांचे अत्यंत गहिरे, रेखीव व स्पष्ट असे चित्रण या डॉ. जॉनसन यांच्या प्रतिकृतीत आपल्या दृष्टोत्पत्तीस येते. कोठल्याही संस्कृतीतून मौखिकता (मौखिक संस्कृतीचा एक भाग) संपूर्णपणे कधीच नाहीशी होत नाही. सर्वाअगोदर व तशी सर्वकाळीच अस्तित्वात असलेली मौखिक संस्कृती, त्यानंतरच्या अनुक्रमे आलेल्या लिपी-हस्तलिखित संस्कृती आणि सरतेशेवटी आलेली

मुद्रणसंस्कृती – जी आता जाण्याच्या मार्गावर आहे – या अशा सांस्कृतिक अवस्थातून मानवी समाज गेलेला आहे. एकाने दुसऱ्यास, दुसऱ्याने तिसऱ्यास किंवा एखाद्या गटास अशा प्रकारे ज्ञानाचा प्रसार मौखिक संस्कृतीत होतो. मौखिक संस्कृतीत अनस्यूत असलेली ही मौखिकता, कोठच्याही संस्कृतीत कधीही पार नाहीशी होत नाही. मौखिक संस्कृतीनंतर आलेल्या लिपी-संस्कृती, हस्तलिखितसंस्कृती व मुद्रणसंस्कृती या सर्व कालखंडात मौखिकतेला जरूर स्थान आहे. आजच्या विद्यमान सांस्कृतिक अवस्थेत मौखिकतेला जे स्थान आहे, त्यापेक्षा कितीतरी अधिक प्रमाणात ते डॉ. जॉनसन यांच्या कालखंडात होते. म्हणूनच त्यांच्या कालखंडात मौखिक संस्कृती हा शब्द उच्चारल्यानंतर जी मूल्ये सूचित होतात, ज्ञानसंपादनाचे जे मार्ग गृहीत धरले जातात, ते सारे मार्ग व मूल्ये, सध्याच्या विद्यमान कालापेक्षाही, डॉ. जॉनसन यांच्या कालखंडात अधिक प्रस्तुत होती. आजकालच्या मुद्रणसंस्कृतीत ज्ञान मिळविण्याचा एकमेव मार्ग म्हणून वाचन ही क्रिया, सर्वसंमत झाली आहे. ती इतकी 'सर्वसंमत' झाली आहे की, वाचन ही क्रिया आता मौखिकतेच्या प्रदेशात आक्रमण करते आणि केवळ मौखिक अशा क्रियांनाही आकार देते व वळण देते. डॉ. जॉनसन यांची स्मरणशक्ती ही अतिशय विस्मयजनक अशी होती. सध्याच्या युगात आपण जी हुबेहूब अशी छबी मेंदूत काढून ठेवणारी अशी स्मरणशक्ती, असे तिचे वर्णन करता येईल. या प्रकारच्या विलक्षण स्मरणशक्तीच्या जोरावर त्यांनी जे काही ऐकले व वाचले, ते ते सारे ते मनात साठवून ठेवीत. ही डॉ. जॉनसन यांची अत्यंत आश्चर्यकारक अशी स्मरणशक्ती, ते तत्कालिन मौखिक संस्कृतीत अगदी आकंठ बडालेले होते, याची साक्ष व पुरावा आहे. मौखिक संस्कृतीत अत्यंत अचूक अशा स्मरणशक्तीच्या मदतीने 'शहाणपणा'ची साठवणूक करणे, ते शहाणपण टिकवून धरणे शक्य असते. तोच मार्ग त्या संस्कृतीला उपलब्ध असतो. या अचूक अशा स्मरणशक्तीला, काव्यातील यमके, अनुप्रास यांची मदत होते. हाच न्याय गद्य लेखनालाही लागू आहे. डॉ. जॉनसन यांना मुक्तछंद तितकासा आवडत नसे. त्यांना अनुप्रास-यमके असलेले काव्य अधिक पसंत होते. या सर्वांच्या मदतीने, 'शहाणपण' साठवणे ते टिकवून धरणे आणि त्याचे स्थान आपल्या मनात पक्के करणे हे शक्य होते, याची जाण त्यांना होती. मौखिक काळातील प्रार्थना आणि सामाजिक कायदे, यांना कायम टिकवून धरावयाचे असेल, त्यांची आठवण सदैव ताजी व जागरूक राहावी असे असेल, तर मानवी संस्कृतीत या साऱ्या गोष्टींचे स्थान पक्के करण्याचा व साठविण्याचा तोच एकमेव – स्मरणशक्तीत त्या अगदी अचूकपणे नोंदवून ठेवणे – मार्ग आहे. प्रार्थना आणि सामाजिक कायदे हे तंतोतंत स्वरूपात कायम राहावेत असे कोणास वाटत असेल, तर तोच एकमेव मार्ग त्या अवस्थेत उपलब्ध असतो. मौखिक संस्कृतीच्या अवस्थेतील कोणा एखाद्याकडे आश्चर्यकारक अशी स्मरणशक्ती असेल तर त्यास तत्कालीन सर्वच लोक मानीत. म्हणूनच स्मरणशक्ती ताजीतवानी राहावी, गत आठवणींचे जतन व्हावे, यासाठी त्या समाजातील लोक प्रयत्नशील असतात. परंतु मुद्रणसंस्कृतीच्या

अवस्थेत समाजाला 'स्मरणशक्ती' या गुणाची फारशी गरज नसते. याचा परिणाम 'स्मरणशक्ती'चे संवर्धन व्हावे, ती वाढीस लागावी इत्यादी गोष्टींकडे त्या समाजाचे दुर्लक्ष होण्यात होतो. याचे कारण, ज्या कोणास स्मरणशक्तीच्या जोरावर जे काही जपून व ताजे ठेवावे असे वाटते, ते सारे मुद्रितात बंदिस्त करता येते. थोडक्यात विलक्षण स्मरणशक्ती हा गुण एकप्रकारे कालबाह्य होतो. विद्यमान समाजात पाठांतरावर फारसा कोणी भर देत नाही, ते एक आवश्यक कौशल्य आहे असेही कोणी समजत नाही, याचेही कारण 'स्मरणशक्ती' हा गुण कालबाह्य ठरणे हेच आहे. आजकाल फारच थोडे विद्यार्थी, एखादी काव्यपंक्ती उधृत करताना आढळतात याचे कारणही तेच.

डॉ. जॉनसन यांची आश्चर्यकारक स्मरणशक्ती पाहिल्यानंतर आपणास आता इतिहासकाळात जमा झालेल्या मौखिक संस्कृतीच्या जुन्या कालखंडाची आठवण होतेच. पण त्याचबरोबर मुद्रित ग्रंथ मनात अगदी खोलवर पोचणारे असे जे समाधान देतात, त्याची अतिशयोक्त स्वरूपाने का होईना प्रचीती देतात. डॉ. जॉनसन हे जन्मतःच ब्लू बेबी (Blue Baby) होते. जन्माला आल्यानंतर थोडा काळ त्यांनी श्वासोच्छ्वास केला नाही. त्यांच्या संगोपनासाठी जी दाई ठेवलेली होती, तिच्याकडून (Scrofulla) गंडमाळा नावाच्या रोगाची लागण झाली. डॉ. जॉनसन हे एक सर्वसामान्य असे रोगट बालक होते. अगदी लहानपणीच त्यांना काही शारीरिक लकबी (Tics) प्राप्त झाल्या. त्या लकबींनी त्यांना जन्मभर साथ दिली. डॉ. जॉनसन यांची संगत त्यांनी कधीही सोडली नाही. या सर्व शारीरिक पंगूपणाबरोबरच ते लहानपणापासूनच जवळ जवळ अंध आणि काहीसे बहिरे होते हेही आपण लक्षात ठेवले पाहिजे. शारीरिक दृष्ट्या धडधाकट व्यक्तींना आजूबाजूचे जग हे त्यांच्या पचेंद्रियांच्या मदतीने सत्य व वास्तव जग बनते. परंतु डॉ. जॉनसन यांच्यासाठी त्यांच्या शारीरिक त्रुटी, कमतरता आणि व्यंगे या कारणांमुळे – ते जग तसे भरभक्कम असे कधीच उभे नव्हते. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, डॉ. जॉनसन हे जन्मतःच पंगू व अधू असल्याकारणाने, ते जैविकदृष्ट्या, रिंगणाच्या मध्यभागी कधीच नव्हते. ते नेहमीच काठावर असत. याच कारणामुळे ते सामाजिक दृष्ट्याही, समाजाच्याही काठावरच असत. समाजाच्या आतल्या वर्तुळात सामान्यपणे, ज्यांची पंचेंद्रिये कार्यक्षम आहेत, शरीराचे सर्व अवयव शाबूत व व्यवस्थित आहेत, अशाच धडधाकट व्यक्ती असतात. हे अशा प्रकारचे भाग्य ज्या व्यक्तीच्या वाट्याला येत नाही, त्या समाजाच्या मध्यभागी न राहाता कडेला लोटल्या जातात. या जगताच्या त्रुटीबद्दल डॉ. जॉनसन यांच्या काही समजुती व भावना होत्या. त्यात कमतरता व त्रुटी आहेत याची जाणीवही त्यांना होती. या सर्वांची भरपाई त्या समाजाच्या काठावर असलेल्या, जो समाजाबाहेर असे समजले जाई, अशा 'डॉ. जॉनसन'नी आपल्या विस्तृत अशा वाचनाने त्या सर्व कमतरतांची भरपाई केली होती. डॉ. जॉनसन हे प्रचंड आणि विस्तृत असे वाचन करून समाधान प्राप्त करून घेत होते. त्या वाचनाच्या जोरावर ते आपला स्वतःचा बचावही करीत



अनुक्रमणिका

असत. या समाधानाची व बचावाची सूचना त्यांच्या उद्‌गारातून मिळते. डॉ. जॉनसन यांनी डॉ. बॉसवेल यांच्याजवळ बोलताना जे उद्‌गार काढले, त्या उद्‌गारात या सर्व गोष्टींचे सूचन आहे. ते डॉ. बॉसवेलना म्हणाले 'आपल्या मनातले काळे विचार हद्दपार करण्याचे कमाल प्रयत्न सरतेशेवटी अपयशीच ठरणार. त्या ऐवजी दुसरेच काही करावयास पाहिजे असे ते म्हणत. त्यांचे सांगणे असे होते की, 'आपल्या शयनगृहात दिवा सातत्याने रात्रभर जळत असावयास हवा. झोपेतून जागे झाल्यानंतर पुन्हा झोप येणार नाही अशा प्रकारची काही कारणाने जाग आली, तर मग एखादे पुस्तक घ्यायचे व ते वाचावयाचे. अशा प्रकारे विश्रांती मिळविण्यासाठी पूर्वतयारी करायची'. हे उदाहरण, तसे एक अगदी नेमस्त असे उदाहरण आहे. परंतु या उदाहरणावरून एक गोष्ट निश्चितपणे सूचित होते. ती म्हणजे डॉ. जॉनसन यांनी आपल्या आयुष्यभर केलेले वाचन ही केवळ करमणूक नव्हती. अथवा या जगातून सुटका करून घ्यावी, आपल्या स्वतःपासून दूर व्हावे, यासाठी विरंगुळा म्हणून केलेला तो प्रयत्नही नव्हता. डॉ. जॉनसन यांच्या दृष्टीकोनातून पाहाता, वाचन ही क्रिया, हे एक कृत्रिम का होईना पण ते एक वास्तव होते. प्रत्यक्ष वास्तवाच्या जागी हे कृत्रिम वास्तव चालू शकेल असे डॉ. जॉनसन यांना वाटत होते. डॉ. जॉनसन यांचे मन हे सदैव 'खिन्न' असे याचा उल्लेख यापूर्वी आलाच आहे. तो त्यांचा मानसिक असा रोगच होता. त्यांच्या खिन्न मनाच्या दृष्टीकोनातून प्रत्यक्ष वास्तव हे तसे अर्थशून्यच होते. तसेच त्यात कोणताही सुसंवाद नव्हता. डॉ. जॉनसन यांना आपले मन रिते आहे असे वाटे, नव्हे त्यांना तसा प्रत्यक्ष अनुभवच होता. या 'रिते' पाणा विरुद्ध डॉ. जॉनसन सातत्याने संघर्ष करीत. त्या संघर्षाने त्यांचे जीवनच व्यापले होते. डॉ. बॉसवेल यांनी डॉ. जॉनसन यांच्या मनाचे वर्णन करताना एक उपमा दिली. कालांतराने ही उपमा चांगलीच गाजली आणि डॉ. जॉनसन यांच्या चाहत्यांच्या मनात या उपमेला कायमचे स्थान प्राप्त झाले. डॉ. बॉसवेल म्हणतात, 'डॉ. जॉनसन यांचे मन हे एका विस्तीर्ण वर्तुळाकार प्रेक्षागृहासारखे होते. रोम येथील कॉलसियम या प्रेक्षागृहाची आठवण करून देणारे. कॉलसियम या प्रेक्षागृहाच्या मध्यभागी द्वंद्वयोद्धे युद्ध करण्यासाठी हिंस्त्र पशूंसमोर उभे राहात. डॉ. जॉनसनही या द्वंद्वयोद्ध्यासारखे त्या विस्तीर्ण वर्तुळाकार प्रेक्षागृहात द्वंद्व करण्यासाठी उभे होते. अर्थात त्यांचे द्वंद्व हे वेगळ्या प्रकारचे होते. न्याय्य काय, अन्याय्य काय, चूक बरोबर काय हे त्या रणभूमीवर डॉ. जॉनसन ठरवीत. डॉ. जॉनसन यांची निवाडे करणारी न्यायबुद्धी एखाद्या सामर्थ्यशाली द्वंद्वयोद्ध्याप्रमाणे, जे जे काही अनिर्णित होते, चिंता वाटण्याजोगे होते, त्या सर्वांचा मुकाबला करण्यास समर्थ होती. रोममधील कॉलसियममध्ये द्वंद्वयोद्धा (Gladiator) मध्यभागी उभा राहिल्यानंतर त्यांच्या अंगावर भुकेने वखवखलेल्या हिंस्त्र पशूंना सोडण्यात येई. हे सारे भुकेने वखवखलेले पशू त्या वर्तुळाकार प्रेक्षागृहाच्या काठावर असलेल्या पिंजऱ्यात कोंडून ठेवलेले असत. त्यांना त्या द्वंद्वयोद्ध्याच्या अंगावर सोडण्यात येई. पराक्रमी द्वंद्वयोद्धा या सर्व भुकेने वखवखलेल्या

हिंस्त्र श्वापदांशी मुकाबला करून त्यांचे पारिपत्य करीत असे. डॉ. जॉनसन हेही, अनिर्णित कल्पना, त्यांना मंजूर नसलेले युक्तिवाद यांच्याशी दोन हात करीत. फरक फक्त एका गोष्टीबाबत होता. द्वंद्वयोद्धा त्या हिंस्त्र श्वापदांना ठार मारीत असे. डॉ. जॉनसन ज्या युक्तिवादाशी व कल्पनाबरोबर दोन हात करीत, त्या कल्पनांना व युक्तिवादाना 'यमसदनास' पाठवीत नसत. त्या कल्पना व ते युक्तिवाद ज्या गुहेतून बाहेर आले, त्याच ठिकाणी ते परत जातील याबद्दल ते खबरदारी घेत. ती श्वापदे डॉ. जॉनसन यांच्यावर हल्ले चढवीतच होती. अर्थशून्यता या हिंसक श्वापदावर प्रभुत्व मिळविण्यासाठी डॉ. जॉनसन यांनी अनेक वेगवेगळ्या मार्गांचा अवलंब केला. हे काम ते पराकोटीच्या कौशल्याने करीत. अर्थशून्यता जावी व त्या जागी कोठच्याना, कोठच्या तऱ्हेची व्यवस्था यावी यासाठी अनेक क्लृप्त्या मोठ्या हिकमतीने उपयोगात अणीत. ईश्वराची प्रार्थना करणे अगर कोणाची तरी मैत्री संपदान करणे, हे मार्ग सुपरिचित आणि सर्वसामान्य असे आहेत. या मार्गांशिवाय दुसऱ्याही अनेक मार्गांचा वापर ते करीत. उदा., संभाषण करीत असताना ते ज्या खुर्चीत बसलेले असत, त्यावर मागे-पुढे असे झोके घेत. घरी परतताना वाटेत लागणाऱ्या प्रत्येक खांबाला हात लावीत, एखाद्या दरवाजातून जाण्यापूर्वी ते स्वतःभोवतीच गिरकी घेत, आपण जणू एखाद्या दुभंगलेल्या भूभागावर उभे आहोत असे समजून ते नेहमी पाय फाकून उभे राहात. हे डॉ. जॉनसन यांचे वागणे. चमत्कारिक वाटण्यासारखेच आहे. ते न्यूराटिक आहेत असे कोणास वाटावे अशीच ही सारी लक्षणे आहेत. डॉ. जॉनसन आपण स्वतः न्यूराटिक होऊ नये, यासाठी अशी चमत्कारिक वागणूक करून आपले स्वतःचे संरक्षण करीत आहेत, असे कोणासही वाटणार नाही. जीवनाला अर्थ प्राप्त होईल असे कृत्रिम मनोरे वा सरंचना निर्माण करून त्यात जीवन व्यतीत करावयाचे व अशा प्रकारे डॉ. जॉनसन यांच्या जीवनात जो रितेपणा होता, त्याच्याशी मुकाबला करण्याचा तो एक मार्ग आहे असेही कोणी मानले नाही. थोडक्यात डॉ. जॉनसन Anomie या मानसिक रोगाने पछाडलेले होते. या रोगापासून बचाव करण्याकरता, त्यांनी आपल्या शस्त्रागारात जी शस्त्रे जमा केली होती त्यात वाचन व लेखन या दोन्ही क्रियांना अत्यंत महत्त्वाचे स्थान होते. डॉ. जॉनसन यांनी अगदी लहानपणीच, ते झबल्यात होते तेव्हापासून – हातात पडेल ते वाचावयास सुरुवात केली होती. ते जे काही वाचीत ते अगदी एकाग्रतेने. पुस्तकाच्या एखाद्या पानावर नजर टाकली की त्या पानावरचा सारा मजकूर त्यांच्या डोक्यात कायमचा जाऊन बसत असे. काही क्षणातच ते सर्व पुस्तक वाचून संपवीत. त्यांनी नजर टाकलेले प्रत्येक पान त्यांच्या स्मरणशक्तीत अगदी पक्केपणी व कायमचे राहात असे. अनेक प्रकारची पुस्तके त्यांच्या हाती पडत. अनेक विषयावरची ती असत. त्यातले प्रत्येक पुस्तक वाचून ते फस्त करीत. प्रख्यात अर्थशास्त्रज्ञ ॲडम स्मिथ यांनी डॉ. जॉनसन 'हे सर्व इंग्लडंमध्ये अत्यंत उत्तम वाचक होते', असे नमूद केले आहे. ॲडम स्मिथ यांच्या मते डॉ. जॉनसन यांच्याइतके सर्व इंग्लंडमध्ये कोणीही वाचन केलेले नव्हते.

या सर्व पुराव्यावरून डॉ. जॉनसन यांच्या मनोव्यापारात वाचन या क्रियेलं गंभीर व आगळेच (Critical) महत्त्व होते हे लक्षात येते. विषेशतः ते जेव्हा एखाद्या विचाराने, एखाद्या चिंतेने त्रस्त झालेले असत, तेव्हा ते पुस्तकासाठी अगदी वखवखलेले असत. हा त्यांचा पुस्तकासंबंधीचा अधाशीपणा, त्यांच्या अनेक प्रकारच्या चमत्कारिक वागणुकीतून दिसून येई. उदा. एका मेजवानीच्या प्रसंगी भोजनासाठी टेबलाजवळ जाण्यापूर्वी, मि. चार्लस शेरीडन यांनी लिहिलेल्या 'स्वीडनमधील गेल्या क्रांतीचा वृत्तांत' हे पुस्तक त्यांनी हस्तगत केले. ज्याची वाचनाची भूक अगदी तप्त झाली आहे, अशा वखवखलेल्या वाचकासारखे त्यांनी ते पुस्तक वाचून गिळंकृत केले. सर्वसामान्यपणे तीच त्यांची वाचनाची व अभ्यासाची पद्धत होती. त्यांच्या सर्व समकालीनांचे तरी तसे मत होते. श्रीमती जोलस या बाईनी पुढीलप्रमाणे लिहिले आहे, 'डॉ. जॉनसन यांना दुसऱ्या कोणापेक्षाही अधिक चांगले कसे वाचावे हे उत्तम प्रकारे माहीत होते. ते एखाद्या गंथ्राच्या मथितार्थाला अगदी लगेच जाऊन भिडतात. ते जणू एखाद्या ग्रंथाचे हृदयच हिसकावून घेत आहेत असे वाटते.' डॉ. जॉनसन जेवायला बसल्यानंतरही, ते एखादे पुस्तक जेवणाच्या टेबलावर घातलेल्या चादरीच्या आत लपवून ठेवीत. भोजनप्रसंगी जे मनोरंजन होत असे, त्यात यदाकदाचित खंड पडला, तर लगेच आपल्या स्वतःच्या मनोरंजनासाठी आणखी एक प्रकार उपलब्ध असावा, यासाठी ते तसे करीत. त्यांचा आधाशीपणा हा अशा प्रकारचा होता. या संबंधी, एक गावरान उपमा द्यावयाची झाल्यास, असे म्हणता येईल की एखाद्या कुत्र्यापुढे कोणी मांसाचा तुकडा अथवा हाडूक टाकले तरा तो कुत्रा ते हाडूक खाताना आपल्या पंजात आणखी एक हाडूक अगदी घट्ट पकडून ठेवतो. तो जे काही खातो ते संपल्यानंतर खाण्यासाठी आपल्यापाशी काहीतरी असावे, या करिता तो ते पंजातले हाडूक राखून ठेवतो. तसेच डॉ. जॉनसन यांचे होते, असे श्रीमती जोलस बाईंना सुचवायचे आहे. ते एकीकडे एका पुस्तकात सर्वस्वी गढून जात पण दुसरे पुस्तक हाताशी ठेवीत. दुसऱ्या एका प्रसंगाचे वर्णन डॉ. बॉसवेल यांनी केले आहे. तेही या ठिकाणी अगदी तंतोतंत लागू पडते. डॉ. जॉनसन हे कशा प्रकारे जेवत याचे वर्णन करताना, डॉ. बॉसवेल लिहितात 'डॉ. जॉनसन, आपल्या समोरच्या ताटावर (बशीवर) वाकत, ताटातले अन्न अक्षरशः तोंडात बकाबक कोंबत. असे करताना ते पार घामाघूम होत आणि डॉ. जॉनसन यांची खासियत समजली जाणारी दुर्गंधी त्यांच्या शरिरातून इतरत्र पसरे'. हेच वर्णन जॉनसन पुस्तक वाचीत, त्या क्रियेसही अगदी चपखलपणे बसते.

जीवनातील रितेपणा आणि गोंधळ हा धोका सर्वच व्यक्तींच्या बाबतीत संभाव्य असा धोका आहे. या धोक्याने 'डॉ. जॉनसन यांचा सतत पाठपुरावा केला. ज्ञान संपादन करणे ही क्रिया तिच्या अगदी प्राथमिक अवस्थेत अभ्यास – विषयाबद्दल माहिती देतेच, पण त्याचबरोबर ती क्रिया जीवनातील रितेपणा व गोंधळ यापासून कोणत्याही व्यक्तीचा बचाव करील. डॉ. जॉनसन यांचे वाचन ही एका अतिरेकी उदाहरणाचा – न्यूराटिक – नमुना आहे. हे उदाहरण आणखीही

काही आपणास सांगून जाते. कोणताही समाज अत्यंत धारदार अशा संक्रमण अवस्थेतून जेव्हा जात असतो, त्यावेळी जे सामाजिक बदल होत असतात ते त्या समाजातील सर्वांना चांगलेच जाणवतात ते बदल अतिशय दुःखदायक तणाव उत्पन्न करणारे, विसंवाद निर्माण करणारे, समाजात विलगीकरण उत्पन्न करणारे आहेत. असा अनुभव अनेक व्यक्तींना येतो. बोलणे आणि वाचणे या क्रिया एकमेकास पूरक आहेत असा डॉ. जॉनसन यांचा अनुभव नव्हता. त्या क्रिया एकमेकांशी स्पर्धा करणाऱ्या, वेळ प्रसंगी एकमेकांना विरोध करणाऱ्या आहेत असे डॉ. जॉनसन यांचे मत होते. तसेच ज्ञानसंपादन करणे आणि परस्परांशी संपर्क साधणे याचे अनेक मार्ग आहेत, पण त्यापैकी वाचन व संभाषण हे मार्ग anxiety निर्माण करणारे आहेत असे त्यांना वाटे. ते अगदी परिपूर्ण अशा एकाग्रतेने वाचन व लेखन करीत, कारण त्यावरच त्यांची 'भाकरी' अवलंबून होती. कारण, डॉ. जॉनसन यांनी लेखनाव्यतिरिक्त अन्य कोणताही व्यवसाय कधीही केला नाही. परंतु लेखन हे काम करावयाची वेळ आली की अखेरचा क्षण येईपर्यंत ते काम करण्याबाबत डॉ. जॉनसन टाळाटाळ करीत. त्यांना जेव्हा जेव्हा शक्य होई तेव्हा आपल्या अभ्यासिकेतल्या शांततेतून आणि एकाकीपणातून सुटका करून घेऊन ते मद्यपानगृहे, चहापानाचे समारंभ, भोजन समारंभ इत्यादी ठिकाणी हजर होत. त्या ठिकाणचे संभाषण त्यांना हवेहवेसे वाटे. पुस्तकांच्या दुकानात मागील बाजूस गप्पांची मैफल जमविणे त्यांना अधिक पसंत होते. डॉ. बॉसवेल, थ्रेलस, ॲना विल्यमस यासारख्या अनेक मित्र-मैत्रिणी आणि व्यक्तींबरोबर गप्पांचा अड्डा जमविण्यात, गावकुटाळक्या करण्यास ते सदैव उत्सुक असत. अनेक क्लब्समधले वातावरण व त्या ठिकाणी दीर्घकाळ चालणारे भोजनसमारंभ हे डॉ. जॉनसन यांच्या आवडीचे होते. त्या क्लब्समधील मोकळया वातावरणात ते रमत. एखादा 'वाचक' दुसऱ्यांच्या सहवासाला किती जबरदस्तपणे आसुसलेला असतो, याबद्दल खुद्द डॉ. जॉनसन यांनीच लिहून ठेवले आहे. ते दुसऱ्या कोणीही त्यांच्याइतके चांगल्या प्रकारे सांगितलेले नाही. डॉ. जॉनसन लिहितात 'एखाद्या व्यक्तीला अगदी एकट्याने काम करण्याची आवश्यकता निर्माण झाली म्हणजे मग ती व्यक्ती अगदी बाजूला फेकली जाते. दूरवरचे जे आवाज ऐकू येतात, ते सारे ती व्यक्ती आपल्या हृदयाचे ठोके मोजीत ऐकत असते. आपल्या सारख्याच अन्य जीवंत माणसात जाऊन मिसळावे यासाठी ती व्यक्ती आसुसलेली असते. आपणही यापुढे या सर्व विरंगुळयांचा पुरेपूर लाभ उठवावा, जगाच्या रंगभूमीवर आपल्या कौशल्यांचे प्रदर्शन करून, वहावा मिळवावी, टाळया घ्याव्यात, त्यापासून मिळणाऱ्या आनंदात मश्गुल राहावे असा निश्चय ती व्यक्ती त्यावेळी व तेथेच करते'.

डॉ. जॉनसन यांचे व्याख्यान, एका मोठ्या समुदायापुढे, एखादा नाणावलेला व्यक्ता जसे व्याख्यान देतो, त्या स्वरूपाचे नसे. ते उत्तम व्याख्याते नव्हते. त्यांचे व्याख्यान कधीही प्रभावी ठरले नाही. श्रोत्यांचे मन आपल्याकडे खेचून, त्यांचे मतपरिवर्तन करणारे, मन वळविणारे व्याख्याते म्हणून ते कमालीचे

अयशस्वी होते. स्वतः डॉ. जॉनसन यांनीच या सर्वांची कबुली दिलेली आहे. इंग्लंडमध्ये अठराव्या शतकात 'मौखिक संस्कृती' चे जग हे हळूहळू आकुंचित होत होते. याचा अर्थ, त्याकाळी प्रख्यात व्याख्याते नव्हते असा नाही. येस्टरफिल्ड, बर्क आणि विल्कस हे डॉ. जॉनसन यांचे समकालीन. ते तिघेही त्या काळचे अतिशय गाजलेले व्याख्याते. हे जरी खरे असले, तरी तत्कालिन सामाजिक जीवनात, समान आवड असलेल्या व्यक्तींचे अनेक गट दिवसेंदिवस अधिक प्रमाणात तयार होऊ लागले. हे गटच तत्कालिन समाज-जीवनाच्या केंद्रस्थानी होते. या अशा वातावरणात आणि परिस्थितीत डॉ. जॉनसन यांच्या संभाषणचातुर्यामुळे मोठाच बोलबाला झाला. डॉ. बॉसवेल यांनी डॉ. जॉनसन व त्यांचे मित्र यांच्या त्या संभाषणाची टाचणे ठेवून, आपणा सर्वांस उपकृत केले आहे. डॉ. बॉसवेल यांनी मागे ठेवलेल्या कागदपत्रांमुळेच, डॉ. जॉनसन हे महान लेखक आणि तितकेच मोठे संभाषणचतुर असे विद्वान गृहस्थ म्हणून आजतागायत सर्वांस माहीत आहेत.

डॉ. जॉनसन हे कोणाना कोणा परिचिताच्या, मित्राच्या सहवासासाठी नेहमीच अगदी आतुर असत. त्याजबरोबर वाचनही विस्तृत व भरपूर करावे याचीही त्यांना जबरदस्त ओढ होती. परंतु अन्य व्यक्तीच्या सहवासाच्या आतुरतेपेक्षाही डॉ. जॉनसन यांच्या वाचनाच्या ओढीने त्यांच्यापुढे वेगळयाच समस्या दत्त म्हणून उभ्या राहात. डॉ. बॉसवेल यांनी त्याबद्दल आपणास असे सांगितले आहे की, 'डॉ. जॉनसन हे जेव्हा केव्हा संभाषणात व्यग्र नसत, त्यावेळी खिन्न विचार त्यांच्या मनाचा कबजा घेत आणि केवळ याच कारणासाठी एकटे राहाण्यापेक्षाही कोणाचाही सहवास, कसलीही मानसिक अशी गुंतवणूक ते अधिक पसंत करीत. डॉ. जॉनसन एकदा असे म्हणाले होते की, आपल्या स्वतःपासून सुटका करून घ्यायची हीच त्यांच्या जीवनाची प्रमुख धडपड होती. हा अशा प्रकारचा दृष्टीकोन, हा त्यांच्या मनाचा रोग होता. या रोगाला त्यांच्या मते अन्य व्यक्तीच्या सहवासापेक्षा दुसरा कोठचाही उतारा नव्हता'. अर्थातच डॉ. जॉनसन यांची ही भीती बुद्धीला धरून नाही, ती तर्कसंगतही नाही. ती अतिशयोक्त होती. परंतु त्या भीतीच्या द्वारे सर्वस्वी व अत्यंत दुःखदायक अशा स्पष्टतेने त्यांच्या न्यूराटिक वागणुकीवर चांगलाच प्रकाश पडतो. वाचनक्रियाच मोठी उद्‌बोधक आहे. वाचन करणाऱ्या व्यक्तीचा जगाशी संबंध तुटलेला असतो. त्या व्यक्तीच्यासमोर जे पुस्तकाचे – हस्तलिखिताचे पान असते त्यावर काही अमूर्त चिन्हे असतात. कोणतीही लिपी ही विशिष्ट चिन्हांची असते. ती चिन्हे अमूर्तपणे कशाचे तरी प्रतीक असतात. ठ – ठकीतला. ठ हे अमूर्त चिन्ह त्या ध्वनीसाठी वापरतो. या अशा अमूर्त चिन्हांशी त्या वाचकाचा मुकाबला असतो. त्या चिन्हातून वाचक अर्थ निर्माण करतो. म्हणजेच वाचन या क्रियेत एक प्रकारची अस्तित्ववादी अस्वस्थता, एक प्रकारची अहंकारी, आत्मकेंद्री भीती या ना त्या स्वरूपात नेहमीच हजर असते. वाचनाच्या बाबतीतच केवळ नव्हे, तर माहिती-ज्ञान मिळविण्याची जी जी काही तंत्रविज्ञाने आहेत, त्या सर्वातच ही समस्या अनुस्यूत आहे. अवती-भवतीच्या जगताचे आपल्या स्वतःच्या पंचेंद्रियांच्या

प्रत्यक्ष संवेदनाकरवी ज्ञान घेण्याऐवजी आपण चिन्हांचा अर्थ लावून ज्ञान प्राप्त करून घेतो. डॉ. जॉनसन यांना जो अनुभव आला तो आपणा सर्वांनाच येतो. या अनुभवाचे थोडक्यात वर्णन करावयाचे झाल्यास असे म्हणता येईल की बाहेरच्या जगतातील वास्तवापासून दूर जाणे, अस्वस्थ करील अशा प्रकारे दूर जाणे, वाचन या क्रियेत अनुस्यूत आहे. डॉ. जॉनसन यांना हा अनुभव आला होता, आपणा सर्वांनाही तो येतो. ॲडम व ईव्ह यांनी सफरचंद खाल्यानंतर ईडन या स्वर्गीय बागेतून त्यांना भूलोकी यावे लागले. थोडक्यात तो एक प्रकारचा अध:पात होता. वाचन ही क्रिया तशीच अहे. निदान बॉसवेल यांनी वर्णन केल्याप्रमाणे, डॉ. जॉनसन यांच्या बाबतीत तरी ॲडम-ईव्ह यांच्या अध:पाताचा दाखला चांगलाच लागू पडतो. डॉ. जॉनसन यांना आपला धाकटा भाऊ नाथानिअल याच्याबद्दल जबरदस्त दु:स्वास होता. या नाथानिअलने सफरचंद लपवून ठेवले आहे, अशी त्यांची समजूत होती. त्या सफरचंदाचा शोध घेण्यासाठी ते आपल्या वडिलांच्या पुस्तकांच्या दुकानात गेले. पुस्तकाच्या मागे सफरचंद लपविले आहे अशी समजूत करून एक पुस्तक खाली काढले. आणि त्या पुस्तकाची पाने उलटावयास सुरुवात तेव्हा केली त्याचवेळी, त्याच ठिकाणी डॉ. जॉनसनच्या वाचनास आरंभ झाला .......!

मौखिक जगतातून, मुद्रणसंस्कृतीला अंगभूत असलेल्या वाचन जगतात संक्रमण होत असताना, प्रचंड अशी मानसिक घडण नव्याने व्हावी लागते. हे होण्यासाठी अनेक तडजोडी आवश्यक असतात. याचे कारण मौखिक जगत आणि वाचन जगत या दोन जगात व्यक्तीला स्वत:साठी आणि ज्ञान मिळविण्यासाठी, दोन अगदी भिन्न प्रकारच्या खुणांची व प्रतिमांची आवश्यकता असते. वाचनासाठी लिपीचा वापर होतो. लिपी ही खुणांच्या मदतीने तयार झालेली असते याचा उल्लेख वर येऊन गेलाच आहे. मौखिक संस्कृतीला लिपीची आवश्यकता असतेच असे नाही. त्या संस्कृतीत वेगळ्याच प्रतिमांची जरुरी असते. डॉ. जॉनसन यांच्या उदाहरणावरून हा मुद्दा अगदी स्पष्ट होतो. या सांस्कृतिक बदलाला एक सामाजिक परिमाणही आहे. हा जो नवी मानसिकता अनुस्यूत असलेला बदल होणार असतो. तो कमीतकमी सामाजिक विघटन होऊन आणि अत्यंत परिणामकारक मार्गाने व्हावा, यात समाजाचे हितसंबंध गुंतलेले असतात. इंग्लंडमध्ये अठराव्या शतकात ही सामाजिक समस्या, साक्षरतापेचप्रसंगरूपाने पुढे आली. त्यावेळी वाचकांच्या संख्येत वाढ झाली. ज्ञानाच्या कक्षा व क्षेत्र यांच्यात प्रचंड प्रमाणात विस्तार झाला. अठराव्या शतकापूर्वीचे वाचक वरिष्ठ वर्गातले होते. आता त्या वाचकांच्या संख्येत वाढ झाली होतीच, शिवाय ते फक्त वरिष्ठ वर्गातून न येता, समाजाच्या दुसऱ्याही अनेक थरातून आले होते. म्हणूनच ती वाढ लोकशाही विचारांना मुख्यत्वेकरून अधिक पोषक होती. याचा परिणाम वाचकांच्या कल्पना व विचार अधिक मोकळेपणे व उत्तमपणे प्रसार पावण्यात झाला. शिवाय या स्वरूपात, वाचकाला आता पुस्तकांच्या बाजारपेठेवर परिणाम करणे शक्य झाले होते. एका प्रकारे वाचकाला आपल्या ताकदीची जाणीव झाली होती. काय छापले जावे यावर या वाचकांचे

नियंत्रण अधिक अधिक प्रमाणात येऊ लागले. ज्या पुस्तकास ग्राहक नाहीत अथवा वाचक नाहीत, ते पुस्तक चांगले असले तरी त्या पुस्तकास काही अर्थ नाही, अशा प्रकारची भावना व विचार डॉ. जॉनसन यांनी अनेक प्रकारे व्यक्त केले होते. हा विचार अत्यंत मोजक्या शद्घात, अत्यंत जोरदारपणे वाचक या समुदायाची ताकद सांगून जातो. राजाची सेन्सॉरशिप, उमराववर्गातील आश्रयदात्यांचा गट, यांच्यापेक्षाही वाचक या समुदायाची ताकद मोठी होती. पहिले दोन्ही गटही काय छापले जावे हे ठरवीत. पण वाचक काय छापले जावे हे ठरवितात. तेव्हा त्याचा परिणाम व प्रभाव हे दोन्हीही प्रचंड असतात. अठराव्या शतकापासून 'वाचक' या गटाने, पुस्तकांच्या बाजारपेठेवरील आपली हुकूमत दाखविण्यास आरंभ केला.

या अशा प्रकारच्या नव्या परिस्थितीत समाजातील परंपरावादी, उजव्या गटातील लोक आणि राजकीय अधिकारी चांगलेच भयभीत झाले होते. प्रथम सेन्सॉरशिप वापरून, त्यांच्या जोडीला शाळेत कोणी जावे, कोणी जाऊ नये यावर नियंत्रण ठेवून, या वाढत्या साक्षरतेला बांध घालण्याचे प्रयत्न झाले. परंतु दूरवरच्या भविष्यकाळातील प्रतिसाद, याच्या अगदी विरुद्ध होता. प्राप्त परिस्थितीत जास्तीत जास्त पदरात पाडून घेण्याकडेच समाजाचा कल होता. डॉ. जॉनसन यांनी या झपाट्याने वाढणाऱ्या साक्षरतेला सातत्याने पाठिंबा दिला. इतकेच नाही, तर साहित्य आणि वाङ्मयीन क्षेत्रात वाचक-जनतेचा अधिकार हाच सर्वश्रेष्ठ, वैध व योग्य असा अधिकार आहे हेही डॉ. जॉनसन यांना मान्य होते. डॉ. जॉनसन यांच्या (IRENE) आयरिन या नाटकाचा प्रयोग झाला. तो नाट्यप्रयोग अयशस्वी होऊन ते नाटक चांगलेच आपटले. लोकांचा हा निर्णय डॉ. जॉनसन यांनी स्वीकारला. हे असे करताना त्यांना मरणप्राय दुःख झाले असणार याबद्दल शंका नाही. 'जी कोणी व्यक्ती पुस्तक लिहिते, ती आपण स्वतः इतरांपेक्षा जास्त शहाणे अथवा चतुर आहोत असे समजते; आपण इतरांचे लोकशिक्षण करीत आहोत, त्यांचे मनोरंजन करीत आहोत असे गृहीत धरते आणि हे गृहीत धरूनच ती व्यक्ती वाचकांना आवाहन करते. त्या वाचकांनीच सरतेशेवटी त्या लेखकाची बढाई किती योग्य वा अयोग्य याचा न्याय निवाडा करावयाचा असतो', असे डॉ. जॉनसन यांनी एकदा म्हटल्याचे डॉ. बॉसवेल यांनी नमूद केले आहे. डॉ. जॉनसन आणखी एकदा असेही म्हणाले होते की 'वाचक-जनता ही कधीही भ्रष्ट होत नाही, फारशी कधी फसवली जात नाही. अशी जनता कोणा एखाद्या लेखकाने साहित्यक्षेत्रात आपण श्रेष्ठ आहोत असा दावा केला तर त्याबद्दल अखेरचा निर्णय देईल'. डॉ. जॉनसन यांना असेही वाटत होते की वाचक-जनतेचा हा वैध असा अधिकार आहे, त्याजबरोबर ते सारे प्रत्यक्ष वस्तुस्थितीलाही धरून आहे. वाचक-जनता ही कधीही चूक करीत नाही अशी डॉ. जॉनसन यांची खात्री होती.

डॉ. जॉनसन यांच्या या युक्तिवादात आणि प्रदिपादनात, लेखन हा धंदा म्हणून ज्या व्यक्तींनी पत्करला होता, त्यांचा दृष्टीकोन अनुस्यूत आहे. लेखन हा धंदा म्हणून ज्यांनी पत्करला आहे, ते ज्या वाचकावर आपल्या उपजीविकेसाठी



अनुक्रमणिका

अवलंबून असतात, त्या वाचकाच्या हाती रांगडी अशी अर्थसत्ता असते. म्हणूनच वाचकाला रिझवणे, हे लेखकाला आवश्यक होऊन बसते. या अशा प्रकारच्या सर्व विचारासंबंधीची वाढलेली जाण डॉ. जॉनसन यांच्या साहित्य आणि लेखन-विषयक मतात आढळून येते. त्याजबरोबर मुद्रणाच्या क्षेत्रातील परिस्थितीत अगदी मूलभूतपणे फरक खरोखरीच झालेला आहे ही वस्तुस्थितीही डॉ. जॉनसन यांनी हेरली होती. म्हणूनच जे शद्ब आणि ग्रंथ यांच्याबरोबर 'व्यापार' करतात, त्यांच्यातही बदल झाला पाहिजे असे ते सांगत. त्यांनी यासंबंधी ज्या काही तडजोडी केल्या, त्याचे अधिक उठावदार व चांगले असे चित्र आपणास त्यांच्या वाङ्मयीन टीका लेखनात पाहावयास सापडते. वाङ्मयीन टीकेच्या बाबतीत तोवर मान्यवर ठरलेले परंपरागत व अभिजात असे जे मानदंड होते, ते त्यांनी त्याज्य ठरविले. त्यांच्या ऐवजी वाङ्मयाचा जो वाचकवर्ग होता, त्याच्या चोखंदळ प्रतिक्रिया केंद्रीभूत मानून, तयार झालेली संवेदनाक्षम अशी साहित्यटीका, त्या जुन्या परंपरागत व अभिजात मानदंडाच्या जागी यावी असे त्यांचे मत होते. ते यापुढे जाऊन असेही सांगतात की, अत्यंत तल्लख बुद्धी अथवा एका विशिष्ट प्रकारचे वाङ्मयीन गुण असले की लौकिक प्राप्त होतो असे नाही. या उलट तो लौकिक योग्य व खरा आहे हे ठरविण्यासाठी तो लौकिक किती सातत्याने आणि किती काळ टिकला हीच कसोटी योग्य आहे. या कसोटीच्या आधारानेच 'लौकिकां'ची प्रत ठरते. मानवाकडे जे जे काही अनेक शतके वारसा व परंपरेने असते, ते ते सारे त्याने अनेकवेळा पारखलेले असते, तपासलेले असते, त्याची इतर अनेक गोष्टीबरोबर तुलनाही केलेली असते. मानवजातीला आपल्यापाशी जे जे काही अनेक वर्षे असते त्याचे मोल पटलेले असते. याचा अर्थ मानवाने त्या सर्व गोष्टी अनेक वेळा दुसऱ्या गोष्टींबरोबर ताडून व तोलून पाहिलेल्या असल्याकारणाने, त्या सर्व गोष्टी मौल्यवान आहेत याबद्दल त्याची खात्री पटलेली असते. इंग्लंडमध्ये अठराव्या शतकात जो नवा वाचकवर्ग तयार होत होता, त्याच्या अभिरुचीला योग्य वळण लागावे, या हेतूनेच डॉ. जॉनसन वाङ्मयीन टीका या विषयासंबंधी लिहीत होते. ती टीका, एकीकडे वाचकाच्या अभिरुचीला वळण लावीत असताना, वाचकाचे शिक्षण करीत होतीच. पण त्याचबरोबर वाचकाचे सामर्थ्य किती प्रचंड आहे, यालाही मान्यता देत होती. हे नवे वाचक जी पुस्तके वाचीत, त्या पुस्तकांसंबंधी त्या वाचकांच्या ज्या ज्या प्रतिक्रिया होत्या आणि ज्या भावना होत्या, त्यावर त्या पुस्तकासंबंधीचे त्या वाचकांचे निदान अवलंबून होते. एखादा ग्रंथ चांगला, वाईट वा सुमार आहे, हा निवाडा तो वाचक, त्या ग्रंथासंबंधीच्या आपल्या भावनांच्या व प्रतिक्रियांच्या अनुषंगाने करीत असे. आपली आवड-निवड तो सर्वसामान्य वाचक, ज्या प्रकारे ठरवीत असे, त्यातच वाचकवर्गाला जी सत्ता प्राप्त झाली होती त्याचे रहस्य व कारणही होते. डॉ. जॉनसन यांची वाङ्मयीन समीक्षा ही मूलतः भावनात्मक अशी लोकशाहीवादी टीका होती. लोकशाहीवादी या अर्थाने, एखाद्या पुस्तकाबद्दल त्या पुस्तकाच्या बहुसंख्य वाचकांचे जे मत आहे, तेच बरोबर असे डॉ. जॉनसन यांचे म्हणणे होते. त्यांच्या

काळी मान्यता पावलेले व बुजुर्ग असे जे साहित्यसिद्धांत होते ते सारेच त्यांनी त्याज्य ठरविले होते. अठराव्या शतकातील वाङ्मयीन समीक्षक सिद्धांत बसविताना, सर्वसामान्यपणे पुढील पद्धतीचा अवलंब करीत. या समीक्षकांच्या मते जे अभिजात व आदर्श असे ग्रंथ होते, त्या ग्रंथात दिसून येणाऱ्या समान गोष्टी आणि साहित्यशैली यांचा आधार घेऊन ते आपले वाङ्मयीन समीक्षासिद्धांत तयार करीत. डॉ. जॉनसन-व्यतिरिक्त तत्कालीन इतर बुजुर्ग वाङ्मयीन समीक्षकांच्या मते, अभिजात काव्यशास्त्रांच्या नियमानुसार, शोक, हास्य आणि आनंद यांचे साहित्य-वाङ्मयीन कृतीत मिश्रण करण्यावर बंदी होती. डॉ. जॉनसन म्हणत 'हा साहित्यसिद्धांत पूर्णतः अर्थशून्य आहे. याचे कारण, 'सुष्ट आणि दुष्ट, आनंद आणि दुःख, यात सहभागी असलेल्या उन्मनी प्रकृतीतील खऱ्या अवस्थेत कोण आहे, याविषयी कोणासही, खरोखरीच कधीही कर्तव्य नसते'. दुसऱ्या एका ठिकाणी डॉ. जॉनसन यांनी असे म्हटले आहे की, 'एखाद्या पुस्तकाचा वा लिखाणाचा काय परिणाम झाला आहे हे चांगल्या समीक्षेच्या मदतीने दाखवून देता येईल. किती नाटकात, किती भूते आहेत, आणि त्यातले एखाद्या नाटकातले भूत, दुसऱ्या एखाद्या नाटकातील भूतापेक्षा कसे व किती चांगले आहे हे सांगण्यात काही मोठेसे भूषण नाही. मानवी हृदयावर भीतीने, किती व कशी छाप टाकली, किती व कशा प्रकारचा परिणाम केला हे दाखविली पाहिजे'.

एखादा समाज, त्या समाजातील व्यक्तींची वागणूक व चाल-चालणूक यावर नियंत्रण ठेवतो, त्याला आकार व वळण देण्याचा नेहमीच प्रयत्न करतो. ही उद्दिष्टे साध्य करण्याचे मार्गही ठरलेले आहेत. समाजात काही महत्त्वाचे व समाजाला आदर्श वाटावेत असे नमुने व भूमिका यांना मान्यता द्यावयाची, त्यांचा प्रसार करावयाचा हा त्यापैकी एक मार्ग, माता-पिता, शिक्षक, तरूण, बालक, पती-पत्नी, लेखक, कलावंत, प्रेमिक इत्यादी. हे त्या आदर्श नमुना व भूमिका-पैकींचे काही नमुने व भूमिका. प्रत्येक व्यक्तीला आपण स्वतः समाजात कोण आहोत हे माहीत असते आणि एखाद्या अथवा हरएक क्षणी आपण कसे वागायचे हेही ठाऊक असते. आपणास ज्यातून निवड करता येईल अशी सामाजिक आदर्शांची व भूमिकांची एक भली मोठी रांगच आपल्यासमोर समाजाने उभी केलेली असल्या-कारणाने, आपणास त्यातून निवड करणे सुलभ जाते. म्हणूनच आपणा सर्वांचा दैनंदिन सामाजिक व्यवहार सुरळीतपणे चालतो. या भूमिका व आदर्श अनेक प्रकारचे आहेत. उदा., व्यापारी, बँकर, डॉक्टर, लेखक, भिकारी, चोर .... इत्यादी. या सामाजिक भूमिकातून आपण निवड करतो. समाज इतके करून थांबत नाही, त्यापुढे जाऊन, या भूमिका आपण कशाप्रकारे पार पाडावयाच्या आहेत, याबद्दलही बरेच काही सांगतो. प्रत्येक समाजात 'ग्रंथाचा वाचक' या संबोधनाचीही एक सामाजिक भूमिका आहे. डॉ. जॉनसन हे त्या भूमिकेसाठी एक आदर्श अशी व्यक्ती होते. त्यांनी आपल्या उमेदवारीच्या काळात केलेले वाचन आणि त्यांचा प्रचंड असा वाङ्मयीन अधिकार, या दोन्ही गुणांचा ते 'वाचक' या भूमिकेचा

एक 'आदर्श नमुना ठरण्याच्या कामात उपयोग झाला. 'वाचक' या सामाजिक भूमिकेसाठी, डॉ. जॉनसन हे अत्यंत यशस्वी असा आदर्श नमुना होते, याबद्दल वादच होणार नाही. समाजात 'वाचक' म्हणून एक 'आदर्श नमुना - भूमिका' असते. ही भूमिका घडविण्याच्या कामातही ते अत्यंत क्रियाशीलपणे सामील होत. त्यांनी 'वाचक' या आदर्श नमुन्याने समाजात कोणती 'भूमिका' कशाप्रकारे वठवावयाची आहे, याचे अगदी तपशीलवारपणे वर्णन केले आहे. साहित्य वाचणाऱ्या आमजनतेची प्रतिमाही, त्यांनी मोठ्या नाट्यपूर्णपणे उभी केली. डॉ. जॉनसन यांनी आपल्या लिखाणात 'सामान्य वाचक' या कल्पित व्यक्तीचे चित्रण केले आहे. त्यांच्या साहित्यात 'सामान्य वाचक' ही एक लक्षणीय व महत्त्वाची अशी व्यक्ती आहे. तसे चित्रण करणारे ते पहिले साहित्यसमीक्षक. डॉ. जॉनसन ज्या वाचकवर्गाला प्रत्यक्ष आवाहन करीत होते, तो वाचकवर्ग मध्यमवर्गीय होता. पूर्वी फक्त उमराववर्गातले लोक ग्रंथ वाचीत असत. आता दिवसेंदिवस अधिक प्रमाणात मध्यमवर्गिय व्यक्ती ग्रंथ वाचू लागल्या. त्यांच्या काळातील वाचक ही एक जगावेगळी व्यक्ती नव्हती. ती तशी एक सर्व सामान्य व्यक्ती होती. 'सामान्य वाचक' या प्रतिमेने मध्यमवर्गीय वाचकाला प्रतिष्ठा प्राप्त झाली. त्या प्रतिमेने या नव्या वाचक-वर्गाचे उदात्तीकरण झाले होते. हे नवे वाचक काहीतरी भव्य-दिव्य करीत आहेत असे डॉ. जॉनसन सांगत होते. या नव्या वाचकवर्गाबद्दल ते असे म्हणते होते की, ज्ञान युगातील वैश्विक मानवाचे जे मूलभूत व महत्त्वाचे असे गुण समजले जातात, ते सर्वच त्या 'सामान्य वाचकां'चे गुण होते. डॉ. जॉनसन यांच्याच शद्वात सांगावयाचे झाल्यास 'सतराव्या आणि अठराव्या शतकातील विचारवंत 'मूलभूत मानव' म्हणजे काय या संकल्पनेबद्दल विचार करण्यात मग्न होते. या 'मूलभूत मानवा'पाशी त्याच्या जन्माबरोबरच, उपजतपणे आलेल्या काहीही विचार - कल्पना नसत. परंपरा आणि काल, भौगोलिक स्थान आणि संस्कृती यामुळे माणसा - माणसात जे फरक आढळून येतात, त्यातले काहीही नव्हते. सर्व व्यक्तींची मने, एकाच प्रकारे विचार आणि कार्य करतील अशा पातळीइतका तो 'मूलभूत मानव' खाली आलेला होता. 'सामान्य वाचक' या संकल्पनेत अनुस्यूत असलेली सर्वव्यापकता – वैश्विकता, ही अनेक दृष्टीने मोठी सोईची होती. 'सामान्य वाचकाच्या' पसंतीला जे उतरेल, त्याला जे आवडेल ते सर्वांनाच, सर्वठिकाणी पसंत पडेल आणि आवडेलही. या नियमास एकच अपवाद होता. तो म्हणजे ज्या वाचकांना आपले वैयक्तिक पूर्वग्रह आणि क्षणभंगुर हितसंबंध दूर ठेवता येत नव्हते त्या वाचकाचा. सामान्य वाचकाचा हा जो सर्वसामान्यपणा होता तो डॉ. जॉनसन यांच्या मते एक चांगला गुण होता. त्यांच्या समकालिन वाचकांच्या अंगी तो आहे, असे त्यांचे मत होते. डॉ. जॉनसन आपल्या वाचकाला नेहमी सांगत की, यदाकदाचित वाङ्मयीन बाबतीतली त्याची जाण बेताची असेल, फारशा उच्च पातळीवर जाऊन विचार करणे त्याला जमत नसेल, त्याची अभिरुची विकसित झालेली नसेल, 'पूर्वसुरींकडून अथवा दुसऱ्यांच्या उदाहरणावरून त्यांना शिक्षण मिळालेले नसेल' आणि सामाजिक

अधिकारातून तयार होणारे पूर्वग्रह त्यांच्यापाशी नसतील. परंतु या कारणामुळे, त्या वाचकांपुढे जे सादर केले जाते, ते वाचण्याच्या व समजण्याच्या क्षमतेला त्यांना शिक्षण नसल्याकारणाने कोठलीच व कसलीच आडकाठी येणार नव्हती. डॉ. जॉनसन सातत्याने असे प्रतिपादन करीत की आम वाचकजनतेची समान अशी मानवी प्रकृती ही वाङ्मयीन समीक्षा आणि निर्णय या दोन्ही बाबतीत शिक्षणापेक्षाही अधिक निर्णायक असते. याचे कारण, ती जनता ही सटरफटर गोष्टींवर आपले लक्ष केंद्रित न करता, मानवी हृदयाशी संबंधित असलेल्या प्रश्नांवर केंद्रित करते. 'सामान्य वाचक' या संकल्पनेद्वारा डॉ. जॉनसन यांनी आम वाचकजनतेची सामाजिक भूमिका नक्की केली होती. त्या जनतेला त्यांनी समाजात विधायक अशी प्रतिमा प्राप्त करून दिली. डॉ. जॉनसन 'सामान्य वाचक' या संकल्पनेद्वारा तत्कालिन आम वाचकजनतेला शिक्षण नव्हते, हे एकीकडे मान्य करून, त्याचवेळी त्या जनतेला ग्रंथ, कल्पना आणि विचार यासंबंधी जी नवी ताकद व सत्ता प्राप्त झाली होती, त्याचाही ते स्वीकार करीत होते. ही नवी सत्ता शक्य असेल तितक्या जास्तीत जास्त उत्तमप्रकारे जनतेने वापरावी यासाठी ते तिला प्रोत्साहन देत. हे साध्य होण्यासाठी या जनतेने अमूर्त अशा नियमसंचाचा वापर न करता, आपली स्वतःची मूलभूत स्वरूपाची जी समज व जाण असेल, त्याचा वापर करावयाचा होता. या जनतेने आपण स्वतः वाचलेल्या पुस्तकातून मानवी जीवनाबद्दल शाश्वत व मूलभूत असे जे काही असेल त्याचा शोध घ्यायचा होता. समाजात बदल होतात आणि अनेकवेळा हे बदल आपल्याबरोबर अनेक नव्या चिंता व प्रश्न घेऊन येतात. अशा वेळी या नव्या प्राप्त परिस्थितीत जास्तीत जास्त सामाजिक सुसंवाद निर्माण करायचा असेल, तर मग त्यासाठी नव्या सामाजिक 'भूमिका' निर्माण करणे भाग असते. तसे केले तरच त्या नव्या सामाजिक बदलातून उपस्थित झालेले प्रश्न व चिंता हाताळता येतात. सामान्य वाचक ही संकल्पना डॉ. जॉनसन यांनी मांडली. 'वाचक' ही नवी भूमिका निर्माण झाली. तत्कालीन साक्षरता पेचप्रसंगाची सोडवणूक होण्यास त्याची मदतच झाली होती. नवे सामाजिक बदल व त्यातून निर्माण होणाऱ्या चिंता व प्रश्न कसे हाताळावेत या संबंधीचे ते एक प्रमुख व महत्त्वाचे असे उदाहरण आहे. डॉ. जॉनसन यांचे हे कर्तृत्व कोणासही नाकारता येणार नाही.

इतिहास काहीही शिकवत नाही हाच एक धडा इतिहास ही ज्ञान शाखा शिकविते, या विधानात वरवर जरी विरोधाभास दिसत असला, तरी हे विधान बहुधा सत्य ठरेल. कारण, इतिहासाची सामान्यपणे – बहुधा, पुनरावृत्ती अगदी जशीच्या तशी कधीच होत नाही. अठराव्या शतकातील इंग्लंडमधील पेचप्रसंगामुळे डॉ. जॉनसन यांची वाचन आणि वाचक या दोन्ही गोष्टींबद्दल असलेली प्रखर अशी गुंतवणूक अधिक अधिक केंद्रित झाली. या अठराव्या शतकातील पेचप्रसंगावरून विसाव्या शतकातील पेचप्रसंगाच्या व्याप्तीचे सर्वसामान्य स्वरूप कळावयास मदत होईल. विसाव्या शतकातील हा पेचप्रसंग, मुद्रणसंस्कृतीचे इलेक्ट्रॉनिक संस्कृतीत परिवर्तन होत असल्याकारणाने निर्माण झाला आहे. ज्ञान मिळविणे,

परस्परांशी संपर्क साधणे, स्वतःला मिळालेले ज्ञान दुसऱ्याकडे पोचविणे, या सर्व गोष्टी करण्याच्या ज्या मूलभूत पद्धती व मार्ग आहेत, त्यातच क्रांतिकारी आणि आमूलाग्र बदल होतात. तेव्हा ते बदल ही केवळ एक तंत्रवैज्ञानिक स्वरूपाची नवी बसाबस नसते. या उलट ते बदल, विद्यमान संस्कृतीत संरचनात्मक असे बदल घडवून आणतात. हा सांस्कृतिक बदल झाले आहे याचा अनुभव व जाण एखाद्या सामाजिक पेचप्रसंगाद्वारे होते. काहीवेळा हे सांस्कृतिक बदल मोठे नाट्यपूर्ण स्वरूप धारण करतात. या बदलांचा अनुभव आणि ही नाट्यपूर्णता अनेक प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष मार्गांनी दृष्टोत्पत्तीस येते. इंग्लंडमध्ये अठराव्या शतकात वाचकांची संख्या वाढली. शिवाय संख्येने वाढलेले वाचक व्यापक आणि विस्तारित स्वरूपात वाचन करीत होते. त्यामुळे विद्यमान सामाजिक व्यवस्थतेला धोका निर्माण झाला आहे, असे त्यावेळी जे कोणी प्रस्थापित होते त्यांना वाटत होते. विसाव्या शतकात पाश्चिमात्य देशात तरी – भारतात तशी वाचनास नुसतीच कोठे सुरुवात होत आहे – काय व कसे वाचावे याचे कौशल्य आज लुप्त होऊ लागले आहे. त्यात विघटन होत आहे. या पाश्चिमात्य जगातील 'साक्षरता पेचप्रसगा'ने एका अधिक व्यापक व विस्तृत अशा (पाश्चिमात्य देशात) राष्ट्रीय अस्वस्थतेला, मोठे नाट्यपूर्ण स्वरूप प्राप्त करून दिलेले आहे. ही राष्ट्रीय अस्वस्थता निर्माण होण्याची कारणे अनेक आहेत. एकतर मुद्रणसंस्कृतीचे इलेक्ट्रॉनिक संस्कृतीत परिवर्तन झाले आहे. या इलेक्ट्रॉनिक संस्कृतीने राजकारण व धर्म यात अगोदरच परिवर्तन केले आहे. आपण आता वृत्तपत्रात बातम्या वाचीत नाही. दूरचित्रवाणीवर नाट्यपूर्ण पद्धतीने वाचलेल्या बातम्या आपण ऐकतो. 'बातमी'चे आता नाट्यात रूपांतर झाले आहे. ग्रंथ व पुस्तकांची जागा संगणकाने घेतली आहे. वाचनालयांच्या ऐवजी नव्या नव्या माहिती साठविणाऱ्या, ती हवी असेल तेव्हा झटकन उपलब्ध करून देणाऱ्या, इतर साठविलेली माहिती नाना प्रकारे एकत्र आणणाऱ्या, नव्या नव्या प्रकारच्या माहिती – पेढ्या आता तयार झाल्या आहेत.

विसाव्या शतकात, आपण माहिती कशी मिळवतो, ज्ञान कसे संपादन करतो, परस्परांशी संपर्क कसा साधतो, या संबंधात होत असलेल्या परिवर्तनाची व्यापकता प्रचंड आहे. याच प्रकारचे प्रचंड व व्यापक असे परिवर्तन अठराव्या शतकातील इंग्लंडमध्ये झाले होते. त्या उदाहरणावरून हे अशा प्रकारचे परिवर्तन समजावून घेणे, त्याचा स्वीकार करणे, त्याच्याशी जुळवून घेणे व ते आटोक्यात ठेवणे हे सहजपणे शक्य नसते असे आढळून आलेले आहे. या परिवर्तनाशी मुकाबला करताना नवी कौशल्ये शिकावी लागतात, ती आत्मसात करावी लागतात. तसेच आमूलाग्रपणे बदललेल्या स्वरूपात, नवी सामाजिक बसाबस करणे भाग असते. परस्परांशी संपर्क कसा साधावा आणि माहिती, ज्ञान कसे मिळवावे, यासंबंधातील प्राथमिक अशा साधनांनी सर्वच सामाजिक जगताला आकार येतोच, पण त्याचबरोबर ती साधने व्यक्तिगत जीवन आणि जाणीव या जीवनवस्त्राचा भाग होऊन बसतात. जीवनदायी अशा वस्तुस्थितीचा अत्यंत महत्त्वाचा असा भाग ठरतात. व्यक्तीची

या जगतातील प्राथमिक अशी प्रतिमा तयार करण्याच्या कामी ही साधने, निर्णायक असतात. माहिती जमा करणे आणि ज्ञान मिळविणे, या संबंधीच्या प्राथमिक माध्यमात, जेव्हा महत्त्वाचे परिवर्तन होत असते, अशा काळी विद्यमान असलेल्या व्यक्तींना, आपले स्वतःचे जीवन, व्यतीत करण्याच्या पद्धतीत होत असलेला बदल आढळतोच. पण त्याजबरोबर पुस्तक कसे वाचावे यापासून, तो दूरचित्रवाणी कशाप्रकारे पाहावी, यासारख्या गोष्टीत होत असलेले बदलही अनुभवास येतात. उदा. एखादी गोष्ट कोठे आहे, ती कशी आहे, तिचे स्वरूप काय आहे, याबद्दल व्यक्तीच्या ज्या जाणिवा असतात, त्या संबंधाबाबत व्यक्तीची जी अटकळ असते आणि त्या गोष्टींच्या संबंधात त्या व्यक्तीचे स्थान नेमके कोठे आहे, या सर्वात अत्यंत त्रासदायक ठरेल अशी अस्थिरता निर्माण होते. या अशा प्रकारच्या परिस्थितीत सापडलेल्या व्यक्ती डॉ. जॉनसन यांच्याप्रमाणेच जुन्या साधनाचा त्याग करून, ज्ञानसंपादन करण्याच्या आपल्या नव्या समकालीन अशा साधनात अत्यंत अस्वस्थ चित्ताने जाताना दिसतीलही. उदा., डॉ. जॉनसन, वाचन या क्रियेस मागे ठेवून संभाषण कलेला सामोरे गेले. वाचन आणि संभाषण या दोन्हीही क्षेत्रात डॉ. जॉनसन तसे अस्वस्थच असत. ते त्यातल्या एकातही तसे रमले नव्हते. माहिती व ज्ञान मिळविण्यासाठी एखाद्या स्थिर स्वरूपाचे केंद्र असले, तर त्या केंद्राचा वापर करणारांना एका सुव्यवस्थित व अर्थपूर्ण अशा जगताकडून दिलासा प्राप्त करून घेता येतो. पण डॉ. जॉनसन यांना असा दिलासा प्राप्त करून घेता येत नव्हता, कारण ते परिवर्तन संक्रमणावस्थेत आहे, अशा जगात वावरत असल्याकारणाने, वाचन आणि संभाषण यापैकी एका अथवा दोन्ही क्रियातून दिलासा प्राप्त करून घेणे, डॉ. जॉनसनना अशक्य होते. ग्रंथसंस्कृतीच्या जगात सर्वच गोष्टी अगदी ठरलेल्या जागी व स्थिर असतात. इलेक्ट्रॉनिक जग हे दुय्यम स्वरूपाची दुःख आणि श्रुती यांचे आहे. आपण सारेच अजूनही, एक पाय ग्रंथ संस्कृतीच्या जगात, तर दुसरा इलेक्ट्रॉनिक संस्कृतीच्या जगात, या अशा प्रकारच्या दुहेरी जगात वावरत आहोत. या अशा प्रकारच्या जगात, प्रतिमांची बसावस झालेली नसते, आणि त्या अथकपणे कायम प्रवाही असतात. म्हणूनच या अशा प्रकारच्या दुहेरी जगात विद्यमान असणारांना फार मोठी मानसिक किंमत मोजावी लागते.

इंग्लंडमधील अठराव्या शतकातील 'साक्षरता पेचप्रसंगा'ने आणखीही एक गोष्ट सूचित होते. या नव्या ज्ञानसंपादन करण्याच्या तंत्रविज्ञानात प्रचंड ताकद आहे; त्याचा प्रतिकार करता येणार नाही. म्हणूनच या अशा परिस्थितीत सामाजिकदृष्ट्या शहाणपणाचे, निश्चितपणे अधिक व्यवहारी धोरण कोठचे असेल, तर ते त्या नव्या प्रकारच्या 'साक्षरते' बरोबर 'जुळवून घेणे' आणि तिच्या पावलावर पाऊल टाकून पुढे जाणे. डॉ. जॉनसन यांच्या उदाहरणावरून बोध घ्यावयाचा झाल्यास ते 'जुळवून घेणे' योजनाबद्ध असावयास हवे हाच. डॉ. जॉनसन यांच्या प्रमाणे कसलाही विचार अगोदर न करता, काहीही संकल्पचित्र मनात न काढता क्रिया करू नयेत. जे जे काही समोर येईल त्याचा स्वीकार केलाच पाहिजे असे

नाही. या उलट योजनाबद्ध पद्धतीने विचार करून पावले उचलली, तर विसाव्या शतकातील आपणा सर्वांनाच ते फायद्याचे ठरेल. अनेक प्रकारच्या ज्या नव्या संधी मानवास या इलेक्ट्रॉनिक युगात प्राप्त होणार आहेत, त्यांचा जास्तीत जास्त चांगल्या प्रकारे उपयोग करून घेण्यासाठी, नवे शिक्षण घ्यावे लागेल. मानवी उद्दिष्टे साध्य करण्याच्या हेतूने, या नव्या साधनांच्या सुप्तशक्तीचा पुरेपूर फायदा उठविणे शक्य व्हावे, यासाठी नवी कौशल्ये विकसित करावी लागतील. 'सामान्य वाचक' ही प्रतिमा व भूमिका डॉ. जॉनसन यांनी निर्माण केली. त्याच चालीवर सामान्य प्रेक्षक यासारखी संकल्पना आणि एक नवी 'सामाजिक भूमिका' समाजाला विकसित करणे शक्य होईल का? हे आता लगेच सांगता येणे अशक्य आहे. 'सामान्य प्रेक्षक' या संकल्पनेद्वारा दूरचित्रवाणीच्या छोट्या पडद्यावरचे कार्यक्रम पाहून, त्यातून जास्तीत जास्त चांगले माप पदरात कसे पाडून घेता येईल, हे 'सामान्य प्रेक्षक' या संकल्पनेद्वारा सूचित होते. 'सामान्य वाचक' या संकल्पनेने वाचन या क्रियेसंबंधी काही कामगिरी बजाविली, तशीच अथवा त्याहूनही अधिक चांगली कामगिरी 'सामान्य प्रेक्षक' या संकल्पनेने करावी अशी अपेक्षा आहे. आजवरच्या इतिहासावरून असे सूचित होते की, नव्या बदलांना विरोध करण्याऐवजी, त्यांचा प्रतिकार न करता, त्यांचा स्वीकार करण्याच्या दिशेने पावले उचलली तरच प्राप्त पेचप्रसंगातून मार्ग काढता येईल. नव्या बदलातून उपस्थित झालेल्या प्रश्नांचे उत्तर, या बदलांचा स्वीकार केल्यानंतर अतिशय व्यापक अशा अर्थाने मिळेल, असा आपला आजवरचा अनुभव आपणास सांगतो. म्हणजेच गुटेनबर्ग (मुद्रण) संस्कृतीत अनुस्यूत असलेली सार्वत्रिक साक्षरतेची कल्पना बहुधा आपणास सोडून द्यावी लागेल. तसेच साक्षरतेचे प्रमाण खाली घसरले हा एक नैतिक अध:पात आहे, नव्या मोगलाईला आमंत्रण देणारे ते एक सामाजिक संकट आहे, असे या प्राप्त पेचप्रसंगाचे वर्णन करून, अत्यंत कर्णकटू आवाजात सर्व जगाला ओरडून सांगणारे जे अनेक लोक आहेत, त्यांचा आरडाओरडा लक्षात न घेता, ते मूल्यमापन त्याज्य ठरवावे लागेल. त्याऐवजी इंग्लंडच्या अठराव्या शतकाच्या उदाहरणावरून, आपणास असे सूचित होते की, हे असे आमूलाग्र स्वरूपाचे बदल होत असणाऱ्या सामाजिक परिस्थितीत, या बदलांना प्रतिसाद देणाऱ्या अत्यंत मनोवेधक व लाभदायी प्रतिसादांचे वर्णन पुढील शब्दात करता येईल: आजवरचा इतिहास लक्षात घेता हे होणारे सांस्कृतिक बदल इतिहासाच्या वाटचालीत अटळ असेच आहेत, याची स्पष्ट जाणीव असली पाहिजे. तसेच मौखिक- मुद्रण आणि तंत्रवैज्ञानिक संस्कृती हे कालानुक्रमाने झालेले सांस्कृतिक बदल हे सांस्कृतिकदृष्ट्या व्यापक परिणाम करणारे आहेत. त्यांचा परिणाम सामाजिक आणि व्यक्तिगत जीवनावर तर फार प्रचंड प्रमाणात होतो. तसाच तो तंत्रवैज्ञानिक जीवनावरही होतो. हे सारे लक्षात घेऊन दिलेले प्रतिसाद हेच प्राप्त परिस्थितीत जास्तीत जास्त फलदाई ठरतील. अर्थात प्रतिसाद देताना, या बदलातले कोठचे स्वीकारार्ह ठरवायचे ते नीरक्षीर न्यायाने.

*(प्रिन्सटन विद्यापिठातील प्रा. आलाव्हेन केरनान यांच्या एका लेखावरून)*

---

# नोंदवही

## दोन कोळसेवाले

### नाना जोशी

'प्रकाशक रा. ज. देशमुख' या नुकत्याच प्रकाशित झालेल्या ग्रंथातील जया दडकर यांना लिहिलेला भाग वाचीत असताना जुनी आठवण झाली. जया दडकर यांनी रा. ज. देशमुखांची व्यक्तिरेखा फार समर्थपणे रेखाटून मराठी भाषिकाला उपकृत केले आहे. आठवण त्याबद्दलची नाही. आठवण झाली ती प्रख्यात इंग्रजी लेखक एच. इ. बेटस यांच्या आत्मचरित्रातील एका व्यक्तिरेखेची. एच इ. बेटस, यांनी अनेक कादंबऱ्या लिहिल्या आहेत, त्यांचे अनेक कथासंग्रह, अनेक निबंध-संग्रह प्रसिद्ध आहेत. एक नाटक व एक समीक्षाग्रंथ आणि लहान मुलांसाठी काही पुस्तके इतकी प्रचंड साहित्यनिर्मिती त्यांनी केलेली आहे. त्यांच्या 'दि व्हनिश्ड वर्ल्ड' या आत्मचरित्रात पुढील व्यक्तिरेखा आढळते.

एच इ. बेटस (१९०६–१९७४) यांचे आजोबा – आईचे वडील – तसे निरक्षरच होते, पण जुनाट विचारसरणीचे नव्हते. नॉर्दम्पृनशायर या परगण्याच्या परिसरातील लोकोत्तर व्यक्तींविषयी त्यांना कमालीचा आदर होता. त्यांच्या लेखी अशा व्यक्ती म्हणजे 'पुरुषोत्तम'च. त्यांच्याच शद्बात सांगायच तर 'मास्टर पिस ऑफ मॅन'. अशा 'पुरुषोत्तमां'च्या घराजवळून जाताना आपला छकडा (TRAP) ते थांबवत आणि चाबकाच्या काठीने 'पुरुषोत्तमा'च्या वास्तव्याने पुनीत झालेल्या स्थळाकडे निर्देश करत, त्याच्या आख्यायिका आपल्या नातवंडांना आवर्जून सांगत.

चेल्वेस्टनच्या वेशीवर आले की आपला छकडा ते हमखास थांबवत आणि त्या भागात कधीकाळी होऊन गेलेल्या 'पुरुषोत्तमा'च्या नावाचा पुकारा करत. प्रथम त्याचा उल्लेख 'कोळसेवाला' असा केला जाई, नंतर 'संगीतकार', मिनिटभराने 'इंग्लंड', सरतेशेवटी ब्रिटन (BRITTON). आपण ज्याला इंग्लंड समजतो त्यात थोडा घोटाळा आहे. स्कॉटलंड, वेल्स व इंग्लंड – यांनी मिळून युनायटेड किंगडम झाले, आपण त्याला 'इंग्लंड' समजतो. एखाद्या स्कॉट माणसाची ओळख इंग्लंडवासी अशी करून दिलीत, तर तो ओळख करून देणाऱ्याचा गळाच धरील! छोट्या बेटसला, आजोबांनी उच्चारलेल्या या नावांवरून काहीही अर्थबोध होत नसे. हे चारही उल्लेख एकाच व्यक्तीचे होते आणि तिचे नाव होते थॉमस ब्रिटन (१६४४ – १७१४). हे त्याला आढळून आले, त्यानं तारुण्यात पदार्पण केलं तेव्हा. ब्रिटन हा नार्दम्पृनशायरच्या नामवंत पुत्रांपैकी एक होता. तो कोळसेवाला होता, संगीतकार होता, अमीर-उमरावांशी त्याचा परिचय होता आणि प्रख्यात संगीतकार हॅन्डेलचा तो स्नेही होता.



अनुक्रमणिका

चेल्वेस्टनच्या वेशीवर ब्रिटनच्या नावाने पुकारा होत असे याच कारण त्याचा जन्म तिथे झाला होता असा समज होता आणि बेटसच्या काळातही त्या भागात ब्रिटन या आडनावाची बरीच कुटुंबं राहात होती. साहाजिकच थॉमस ब्रिटनचा जन्मही तिथलाच हा समज दृढ झाला. पण 'द डिक्शनरी ऑफ नॅशनल बायोग्राफी' (राष्ट्रीय चरित्रांची सूची) मध्ये ब्रिटनचे जन्मस्थळ वेल्लींग (WELLING BOROUGH) किंवा हिगहॅम फेरर्स (HIGHAM FERRERS) असाव असं म्हटलं आहे. तर 'ग्रोव्हज डिक्शनरी ऑफ म्युझिक' मध्ये (ग्रोव्हज यांची संगीतविषयक सूची) रशडेन (RUSHDEN) हे त्याचे जन्मस्थळ असल्याच नमूद करण्यात आल आहे. त्याच जन्मस्थळ कुठंही असो, एवढ बरिक खरं होत की लहान वयातच ब्रिटन, इंग्लंडला गेला आणि क्लार्केनवेल (CLERKENWELL) येथील कोळशाच्या व्यापाऱ्याकडे त्याने सात वर्षे उमेदवारी केली आणि त्यानंतर स्वतःचा कोळशाचा धंदा काढला. त्यासाठी जागा भाड्यानं घेतली. ही जागा अतिशय लहान होती. कॅनरी पक्षाच घरट त्या जागेहून उंचीने जास्त असेल आणि त्याच्या दिवाणखान्याची खिडकी दारूच्या पिंपाच्या तोंडाहून फारशी मोठी नसावी, असे त्याच वर्णन केल जात असे. तथापि इथंच १६७८ पासून ब्रिटनने, आपल्या संगीतांच्या जलश्यांच्या सायंसभांना प्रारंभ केला. या जलश्यांच आकर्षण गुणी (TALENTED) संगीतकारांना वाटत असे. अशा संगीतकारात थोर ऑर्गनवादक हेन्डलही होता. एका पेनीला, एक कप कॉफी दिली जात असे. संगीताचे लक्षणीय असे बरेच कार्यक्रम इथं झाले असावेत. संगीतापुरतंच कोळशेवाल्या ब्रिटनच कार्यक्षेत्र मर्यादित नव्हते. त्यानं रसायनशास्त्राचा अभ्यास केला. पुढ तो (OCCULT SCIENCE) ऑकल्ट सायन्सकडे वळला. (OCCULT या शब्दाचे इंग्रजीत अर्थ अनेक आहेत. गुप्त ठेवले गेलेले, जगावेगळे, गूढ, सामान्यज्ञानाच्या कक्षेपलीकडील, नैसर्गिक प्रक्रियांपलीकडील गूढ, जादू इत्यादी गोष्टी अंर्तभूत असलेले.) या विषयावरील बरीच पुस्तकं त्याने प्रयत्नपूर्वक मिळविली. या कामात ऑक्सफर्ड, सदरलंडचे अर्ल, डेव्होन शायरचे ड्यूक यांच्यासारख्या ग्रंथप्रेमी उमरावांनी त्याला साहाय्य केले आणि हे सारे व्याप चालू असतानाच, रस्त्यावर कोळसे विकणेही चालूच होत. त्याच्यासारख्या सामान्य कुळात जन्मलेला माणूस, अमीर-उमरावांच्या वर्तुळात वावरताना पाहून काहीजणांच्या मनात किंतू उत्पन्न होणे हेही स्वाभाविक असेच होते. ते म्हणत कुठलातरी दुष्ट हेतू मनी बाळगून तो थोरामोठ्यांची संगत बाळगून असावा. परिणामी तो नास्तिक आहे, जेसुईट या रोमन कॅथलिक पंथाचा एक उपपंथ आहे, प्रेसबिटेरियन आहे, जादूटोणा करणारा आहे, इत्यादी आरोप त्याच्यावर करण्यात येऊ लागले. वर ज्या सूचीचा उल्लेख आला आहे त्या सूचीचा लेखक सांगतो की, हे सारे आरोप बिनबुडाचे होते, त्यांच्या मते 'ब्रिटन हा सीधासाधा, प्रामाणिक माणूस होता.' पण एक गोष्ट मात्र निश्चित असावी. तो अतिशय सुपरस्टिशस – (जादूटोणा, मंत्र, थोडक्यात – सामान्यज्ञानाच्या पलिकडे असलेले जे विषय आहेत, त्यावर श्रद्धा असलेला कोळशातला मनुष्य होता. त्याची अंधश्रद्धाच, अखेर १७१४

मध्ये त्याच्या मृत्युला कारणीभूत झाली. झाल असं – एका संगीतसभेचा त्याच्याकडे (HONEYMEN) हानमेन आला होता. हनिमेन हा प्रख्यात VENTRILOQ होता. व्हेन्ट्रीलोक्वीस्ट या शद्बाचा अर्थ ऑक्सफर्ड शद्बकोशानुसार येणेप्रमाणे आहे. प्रत्यक्षात एक व्यक्ती बोलते आहे, पण तीच्याकडून शद्ब उच्चारले जात नसून, ते वेगवेगळ्या व्यक्तींच्याकडून उच्चारले जात आहेत असा आभास निर्माण करणे. हे सारे करण्याचे कौशल्य ज्या कलावंताकडे आहे तो व्हेन्ट्रिलॉक्सीस्ट – हनिमेन हा प्रख्यात व्हेन्ट्रीलोक्वीस्ट, पेशान लोहार होता. काहीशा उपहासान, त्यान ब्रिटनला सांगितल की, त्याने तत्काळ गुढघे टेकून, परमेश्वराची प्रार्थना केली नाही, तर तास दोन तासात त्याचे मरण अटळ आहे. भयभीत झालेल्या ब्रिटनने लागलीच सांगितल्याप्रमाणे केले. पण हनिमनच्या उद्गारांचा त्यानं एवढा धसका घेतला की त्यानंतर काही दिवसातच त्याचे निधन झाले. त्यांच्या मृत्यूनंतर, चौदा-एक हजारांच्या त्याच्या ग्रंथांचा लिलाव झाला आणि त्या लिलाव झालेल्या ग्रंथाची सूची (CATALOGUE) आजही उपलब्ध आहे.

बेटसच्या 'द व्हनिस्ड वर्ल्ड' (नाहीसे झालेले जग) या आत्मचरित्रातील वरील मजकूर वाचला होता, त्यावेळी तरी मला मराठी साहित्य जगतातील कोणतेही नाव आठवले नव्हते व खरे म्हणजे ठाऊकही नव्हते. कालांतराने प्रकाशक श्री. रा. ज. देशमुख यांच्या स्वभावामुळेच त्यांचा व माझा परिचय होण्याचा योग आला. त्यांच्याबद्दल जे जे काही 'ऐकले' होते, ते किती चुकीचे होते, हे त्यांच्याबरोबरच्या संभाषणातून स्पष्ट झाले होते. 'प्रकाशक रा. ज. देशमुख' हा ग्रंथ वाचीत असताना थॉमस ब्रिटन या माणसाचे स्मरण झाले. आपल्या जीवनाला 'कोळसेवाला' म्हणून आरंभ करणारी व्यक्ती, पुढे एक थोर प्रकाशक झाली, याचे स्मरण मला ठिकाणी होतेच. पण जया दडकरांनी लिहिलेला भाग वाचताना बेटसच्या आत्मचरित्राची आठवण होणे स्वाभाविकच होते. प्रकाशक रा. ज. देशमुख यांचा ग्रंथसंग्रह अफाट होता. त्यांचं वाचनही साक्षेपी, चौफेर व दांडग होते. मोठमोठे साहित्यिक व राजकारणी यांच्याबरोबर ते जेवढ्या आपुलकीने वावरत, तीच सहजता व आपुलकी खालच्या थरातील लोकांबरोबरच्या त्यांच्या वागणुकीत आढळत असे. सुदैवाने ते थॉमस ब्रिटनप्रमाणे सुपरस्टिशिस नव्हते. कालांतराने ते स्वकर्तृत्वाने रा. ज. देशमुख म्हणून ख्याती पावले, तरी 'कोळसेवाला' हा किताब त्यांनी आयुष्यभर अभिमानान मिरवला.

